# HISTORY OF ENGLAND



Translated into Marathi.

CORRECTED FOR THE PRESS BY

KESHAVA SAKHÁRAM SHÁSTRI

VOL. I.

THIRD EDITION.

BOMBAY:

PRINTED BY THOMAS GRAHAM.

1857.

*Price, One Rupee.*

# इंग्लंड देशाची बखर.

भाग १.

आवृत्ति तिसरी.

---

केशव सखाराम शास्त्री यानीं तपासून शुद्ध केली

ती,

मुंबईमध्यें;

टामस ग्राहाम यानीं छापिली. संन् १८५७.

किंमत १ रुपया.

# सूचना.

मोठे अक्षरांनीं जे शब्द लिहिले आहेत ते इंग्रेजी असें समजावें.

इंग्रेजी शब्दांचा अर्थ बहुधा पृष्ठाचे खालचे बाजूस खुणा करून बारीक अक्षरांनीं लिहिला आहे. पहिल्या आवृत्तींत ग्रंथाच्या शेवटीं कोश घातला होता तो एथें गाळला.

# इंग्लंड देशाची बखर.

## प्रकरण

जुलियस सीझर, रोमन* लोकांचा राजा, याचे चढावापासून रोमन लोकांनीं ब्रिटन† बेट सोडल्यापर्यंत‡ कथा.

**रोमन** लोकांचा अधिकार होण्याचे पूर्वीं **ब्रिटन** बेट पृथ्वीवर दुसरे ठिकाणीं विशेष प्रसिद्ध नव्हतें. त्या बेटांतील लोक जे जिन्नस उत्पन्न करीत, त्यांचा व्यापार करायाकरितां, बहुत व्यापारी **गाल**§ देशचे समोरचे समुद्रकांठास जात येत असत. प्रथम ज्या ज्या बंदरीं त्या व्यापाऱ्यांस राहायास मात्र परमाणगी होती, तीं सर्व ठिकाणें, त्यांहीं पुढें कांहीं दिवसांनंतर घेतलीं. तो देश

---

* रोमन ह्मणून लोक होऊन गेले. त्यांचें राज्य त्या वेळेस प्रबळ आणि मोठें होतें. त्यांची राजधानी रूम शहर.

† ब्रिटेन ह्मणून बेट आहे; तेथें राहणारे लोकांचें नांव ब्रिटन. त्या बेटाचे दोन भाग आहेत. त्यांचीं नांवें, इंग्लंड, आणि स्काटलंड. इंग्लंड देशांतले लोकांचें नांव इंग्लिश. त्यासच हिंदू लोक इंग्रेज असें ह्मणतात; त्या देशाची ही बखर. ब्रिटेन बेटाजवळच दुसरें एक अयर्लंड ह्मणून बेट आहे.

‡ इसवी सनाचे पूर्वीं ५५ वर्षांपासून इसवी सनानंतर ४३० वर्षेंपर्यंत.

§ गाल देश ब्रिटेन बेटाच्या समोर आहे; त्यास हल्लीं फ्रान्स, ह्मणजे फ्रान्सिस लोकांचा देश असें ह्मणतात.

लागवडीचा आणि व्यापार करायास योग्य असें पाहून, त्या व्यापाऱ्यांनीं समुद्राचे कांठीं वस्ती करून तेथील लोकांत कृषिकर्म प्रवृत्त केलें. परंतु जे लोक मध्यदेशीं राहात होते त्यांस असा अभिमान होता कीं, या भूमीचे वास्तविक धनी आह्मी आहों, आणि हे नवे आले आहेत, यांनीं आमची भूमि लबाडीनें घेतली; असा विचार करून त्यांनीं त्यांशीं अगदीं व्यवहार सोडून दिला होता.

मध्यदेशांत, पुष्कळ लोक गवताचे झोंपड्यांतून राहात असत, आणि गुरें बाळगीत असत. ते दुधावर किंवा पारधीवर उपजीविका करीत. ते आपले अंगावर पशूंचीं चर्में धारण करीत; परंतु हात, पाय, मांड्या, इत्यादि अंगें त्यांचीं उघडींच असत; त्यांस ते निळा रंग लावीत. त्यांचे डोक्याचे केश, लांब वाढून पाठीवर आणि खांद्यावर लोंबत असत; ते आपले दाढीचे केश काढीत, परंतु मिशा लांब वाढवीत असत. पशुतुल्य लोकांचा पेहराव बहुत-करून एकसारखाच असतो; त्यांकडे पाहिलें असतां मनांत प्रीति किंवा संतोष उत्पन्न होत नाहीं; परंतु उलटें भय वाटतें.

त्यांच्या राज्यांत अनेक लहान लहान परगणे होते, आणि एकएक परगण्यांत एकएक मुख्य असे— यावरून असें वाटतें कीं, प्रथम मनुष्यांस अशी राज्य करण्याची रीति ठाऊक होती; आणि कुटुंबामध्यें एका वडिलाची सत्ता असती, तीपासून मुळीं या रीतीची उत्पत्ति झाली असेल, असा तर्क दिसतो.

त्यांस कांहीं मोठें भय प्राप्त झालें ह्मणजे सभा करून सर्वांच्या संमतानें ते एक सेनाधिपति नेमीत; आणि त्यास

साधारण कामकाज करण्याविषयीं मुखत्यारी देत; मग तो आपल्या मर्जीप्रमाणें युद्ध किंवा तह करी.

त्या लोकांच्या फौजेंत बहुतकरून पायदळ फार असे, परंतु कारण पडलें असतां युद्धामध्यें ते घोडेस्वारही आणीत; त्यांचे युद्धांत रथ असत, त्यांचा प्रकार असा कीं, चाकाच्या मांदळ्याचे शेवटीं मोठे विळे बांधिले असत. त्यामुळें ते रथ जिकडे जात तिकडे धामधूम, आणि भय उत्पन्न होऊन समोरच्यांस जखमा होत असत. ज्या समयीं या रीतीनें रथ सैन्याचा विध्वंस करीत, तेव्हां आंतील योद्धे कांहीं उगीच बसत नसत; तेही आपले तीक्ष्ण भाले शत्रूंवर टाकीत, धांवत, रथाचे **पोलांवर*** उड्या मारीत, पुनः आपले जागीं येऊन बसत, आपले घोडे थांबवीत, आणि समयीं नेटानें फिरवीत; आणि एकादे समयीं शत्रूला भुलथाप द्यायाकरितां सावधगिरीनें मागें येत.

**ब्रिटन** देशचे लोकांच्या धर्माची व्यवस्था हें एक, त्यांचे राज्यकारभाराचें मोठें अंग होतें, आणि **ड्रूद** ह्मणून धर्माचे व्यवस्थापक असत त्यांचा त्यांजवर मोठा अंमल चालत असे. ड्रुदांसारिखें भयंकर ढोंग दुसऱ्या कोणत्या लोकांत नव्हतें, ते लोकांस अनेक रीतींचीं शासनें करीत; जीवास देहांतर प्राप्ति आहे हा उपदेश करीत; आणि त्यांचे मतानुसारी जसे जसे त्यांस अधिक भीत, तसे तसे ते आपले कर अधिक वाढवीत असत. ते नरमेध करीत असत; त्यांची पद्धति अशी होती.– एक वेतकाठ्यांची मनुष्यासारिखी आकृति करावी, अशी कीं तींत बहुत मनुष्य

---

*पोल ह्मणजे रथास जोडलेल्या दोन काठ्या असतात, त्यांत घोडा भडकवितात.

एकदां जाळायाचे असले तरी जाळतां यावे, मग त्या मूर्तींत मनुष्यें घालून आग लावून द्यावी, ह्मणजे ते एकदांच मरून जात. त्या **द्रुदांनीं** उपदिष्ट जे धर्म, त्यांच्या आचरणानें ते लोक सर्वदा भयभीत आणि मूर्ख असे असत. त्या लोकांचे धर्मस्थापक **द्रुद** आपण मोठमोठ्या अवघड नेमनिष्ठा करीत असत, तशीच त्यांची लोकांत वागण्याची रीतिही फार साधी* होती, ह्मणून लोक त्यांवर विश्वास ठेवीत, त्यामुळें लोकांचे मनांत भय आणि अज्ञान यांची उत्तरोत्तर वृद्धि होत जाई.

ते रानांत, गुहांत, आणि वृक्षांचे ढोलींत राहात; कंदमूळें, फळें, खात, आणि पाणी पीत; अशा आचरणामुळें लोक त्यांस मानीत होते इतकेंच केवळ नाहीं, तर ते त्यांची पूजा देखील करीत असत.

त्या लोकांचा व्यवहार त्यांचे गुरूंच्या आचरणासारिखा झाला होता. त्यांचें आचरण स्वच्छ असे, परंतु ते क्रूरत्वाविषयीं आणि दांडगाईविषयीं मोठे प्रसिद्ध होते. त्यांचें साहस मोठें होतें. त्यांमध्यें दया किंवा स्थैर्य हे गुण नव्हते.

**ब्रिटन** देशचे लोक या रीतीनें बहुत दिवस अज्ञान दशेंत स्वेच्छाचारी होते, तेव्हां **सीझर**[1] राजानें **गाल** देश घेऊन, आपली कीर्त्ति अधिक वाढावी या इच्छेनें आणि **ब्रिटन** देश अनायासेंकरून प्राप्त होईल असें समजून, तो घ्यायाचा निश्चय केला; मग एके दिवशीं आपली सगळी फौज

---

* साधी ह्मणजे जींत वस्त्रं अलंकार भूषणें यांचा नीटनेटकेपणा नाहीं.

[1] हा रूम शहराचा राजा.

गलबतावर चढवून, मध्यरात्रीचे सुमारें आपणही वर चढून, **ब्रिटेन** देशाकडे गलबत हाकारून, दुसरें दिवशीं सकाळीं **दोवर** शहराचे जवळचे तिरीं पोंहचला. त्या समयीं त्यानें पाहिलें कीं, हातांत शस्त्रें घेऊन लढाई करायाकरितां मनुष्यें कांठावरचे खडपांवर उभीं आहेत.

इसवी सनाचे पूर्वी पंचावन्नावे वर्षी.

त्या वेळेस **ब्रिटन** लोकांनीं **कासिबलानस** या नांवाचा एक मनुष्य आपला सेनापति केला होता, परंतु लहान लहान राजे होते ते त्याचे आज्ञेखालीं न राहावें अशा बेतानें अथवा तो विश्वासू नाहीं असा संशय मानून त्यास सोडून निघाले, कितीएक आपलें सैन्य घेऊन राज्याचे मध्यभागीं पळून गेले, कितीएक **सीझर** राजास जाऊन मिळाले. शेवटीं या रीतीनें सैन्य गेलें त्यामुळें **कासिबलानस** दुर्बळ झाला. मग त्यानें असा निश्चय केला कीं ज्या रीतीनें तह होईल त्या रीतीनें करावा; नाहींतर थोडे दिवसांनंतर तोही करायास शक्ति राहणार नाहीं. त्या समयीं **सीझर** राजानें जो करार सांगितला तो **कासिबलानसानें** मान्य केला; तो असा कीं, **सीझर** राजाच्या राज्यास पहिल्या करारापेक्षां दुप्पट मनुष्य ओलीस पाठवावे, आणि आपण **रोमन** लोकांच्या ताब्याखालीं असें ह्मणवावें. पुढें **सीझर** निघून गेल्यावर **ब्रिटन** लोकांकडून तहांत अंतर पडलें, तें पुनः यथास्थित चालवायाकरितां त्यास एकवेळ तेथें आणखी यावें लागलें.

**आगसटस**, **रोमन** लोकांमध्यें राज्य करूं लागला तेव्हां त्यानें **ब्रिटन** बेटांत जायाचा बेत केला होता; परंतु

**पान्नोनियन** लोकांनीं पुनः अकस्मात् युद्धाचा उद्योग आरंभिला, त्यामुळें त्यांचा बेत तडीस गेला नाहीं.

नंतर **तिबिरियस** ह्मणून रोमन लोकांचा राजा झाला, त्यानें आपलें राज्य अतिशय मोठें आहे असा विचार करून **ब्रिटना**विषयीं उद्योग केला नाहीं, तेव्हांपासून तेथचे लोक नानाप्रकारचे विद्यांचा अभ्यास करूं लागले.

कांहीं दिवशीं **कालिग्युला** ह्मणून **रोमन** लोकांचा राजा झाला; त्यानें उगीच वेडेपणानें चढाव करून **ब्रिटन** देशांत येऊन लोकांस भय दाखविलें; तेणेंकरून तो लोकांस भयकारक तर झाला नाहींच, परंतु थट्टेस मात्र पात्र झाला. शेवटीं **क्लादियसाचे** राज्यांत **रोमन, ब्रिटन** देशचे लोक आपल्या अमलाखालीं कोणत्या उपायानें आणावे, हा विचार नीटपणीं करूं लागले; आणि युद्धाची तयारी करून तेथें गेले. नंतर त्यांचे **पांतियस** इत्यादि सरदार युद्ध करून विजयी झाले.

मोठा प्रयत्न करून आपला देश दुष्ट शत्रूंचे अमलापासून मुक्त करावा, असा बेत प्रथम **क्यारिक्टकस** ह्मणून **ब्रिटन** होता, त्यानें केला. त्याचें सैन्य थोडें असतांही, त्यानें **रोमनाशीं** नऊ वर्षें पर्यंत युद्ध केलें; शेवटीं त्याचा पराभव करून त्यास **आस्तोरियस स्क्यापिलानें** धरून मोठ्या उत्साहानें **रूम** शहरास पाठविलें. त्याला शहरांतून नेत होते त्या समयीं मौज पाहायास लोकांचा मोठा जमाव जमला होता; त्याकडे पाहून तो विस्मित झाला नाहीं; आणि शहराची शोभा पाहून बोलला कीं, "ज्यांच्या घरीं इतकी संपत्ति आहे त्यांनीं माझ्या झोंपड्याकरितां मत्सर कांबरें करावा!" राजास त्याची ती दशा

पाहून दया आली, आणि त्याचें भाषण ऐकून त्याला आणि दुसरे बंदिवानांला त्यानें मोकळीक दिली.

**ऐसिने*** लोकांची राणी **बोदिसिया** ह्मणून होती, तिचे **रोमन** लोकांनीं हाल केले याकरितां **ब्रिटन** लोकांचें आणि त्यांचें पुनः एकवेळ युद्ध झालें. **ऐसिने** लोकांचा **प्रासाटेगस** नामें राजा होता, त्यानें मरणसमयीं आपलें अर्ध राज्य **रोमनांस** दिलें, आणि दुसरें अर्ध आपल्या मुलींस ठेविलें; कारण, असें केलें असतां राज्याचा अर्ध भाग आपल्या कुटुंबाजवळ अविछिन्न राहील, असें त्यास वाटलें, परंतु ती गोष्ट विपरीत झाली. ती अशी. **रोमनांचा प्राक्युरेटर**† होता त्यानें तें सगळें राज्य जबरदस्तीनें घेतलें. तेव्हां ती विधवा **बोदिसिया** फिर्याद करूं लागली, ते समयीं त्यानें तिला बटकीसारिखें मारायास हुकूम केला, आणि तिच्या मुली बाटविल्या. या जुलुमामुळें सर्व बेटभर बंड उत्पन्न झालें. ती विधवा ज्यांची मुळीं राणी होती, ते **ऐसिने** लोक सैन्यें घेऊन प्रथम लढाई करूं लागले; त्यांचे मागून सर्व दुसरे मुलखांतील लोकांनींहि तसेंच केलें. **बोदिसिया** मोठी सुंदर आणि शूर होती. याकरितां तिला सैन्याची सरदारी दिली. त्या सैन्यांत २३०००० योद्धे होते. त्यांनीं पूर्वीं उपद्रव सोशिला होता, तेणेंकरून संतप्त होऊन **रोमन** लोकांचीं कितीएक संस्थानें आणि ठाणीं यांजवर हला करून त्यांस जिंकिलें. **रोमन** लोकांच्या सैन्याचा सरदार **पालैनस** नामें होता, तो जें आपलें मोठें शहर **लंडन** तें रा-

---

* हे ऐसिने लोक इंग्लंड देशांतले एके प्रांतीं राहत असत.

† जो दुसऱ्याचा काम कारभार चालवितो तो— कारभाऱ्यासारिखा.

खायाकरितां तेथें त्वरेनें गेला; परंतु तेथें गेल्यानंतर त्यानें पाहिलें कीं आपलें सैन्य सुखी राहावें याकरितां या एका शहराचें, शत्रु जें करितील तें करूं दिलें पाहिजे. मग **ब्रिटनांनीं** तें शहर जाळिलें; आणि जे लोक बाकी राहिले होते ते मारिले. या रीतीनें ७० हजार **रोमन** लोक आणि जे दुसरे फरकी होते त्या सर्वांचा विध्वंस केला.

हीं फत्ते झाली तेणेंकरून **ब्रिटन** लोक चढून गेले आणि शत्रूंची वाट पाहात न राहातां मोठ्या धैर्यानें, **वालैनसाचें** सैन्य होतें त्या ठिकाणीं गेले. त्यानें दहा हजार फौज घेऊन चांगले जागीं तळ दिला होता. नंतर **ब्रिटनांचें** आणि त्याचें मोठें भयंकर युद्ध झालें. **बोदिसिया** राणी आपल्या दोन मुली बरोबर घेऊन रथांत बसून तेथें आली, आणि मोठ्या शूरपणानें सैन्यास धीर देऊं लागली, परंतु तिच्या सैन्यांत कांहीं बंदोबस्त नव्हता, आणि **रोमन** लोक धिमे, मसलतदार, असे होते, ह्मणून त्यांस जय प्राप्त झाला. त्या लढाईंत **ब्रिटन** लोक ८०००० पडले. दुसरे बहुत लोक **रोमनांनीं** धरून बंदीस घातले. राणीनें शत्रूंच्या हातीं सांपडायाचे भयामुळें आपल्या हातीं आपणास मारून घेतलें.

ज्या सरदारानें शेवटीं **रोमन** लोकांचें राज्य त्या बेटांत दृढ केलें, त्याचें नांव **जुलियस आग्रिकोला**. त्यानें, **वेस्पेशियन**, **टैटस**, आणि **डोमिशियन**, हे तिघे **रूम** शहरांत जोंपर्यंत राज्य करीत होते तोंपर्यंत शौर्यानें आणि ममतेनें **ब्रिटन** बेटांतला अधिकार चालविला.

**आग्रिकोला** याचे राज्याचे पुढें कितीएक वर्षांनंतर **ब्रिटन** देशांत फार दिवस स्वास्थ्य होतें. त्या समयाचें

कामकारभाराचें वर्तमान कोणी ग्रंथकारांनीं लिहिलें नाहीं.

शेवटीं **रूम** शहराची बढती अधिक झाली. सर्व पृथ्वीवर बहुत दिवस त्या राजाचा हुकूम चालला होता, आणि सर्वत्र गुलामगिरी आणि जबरदस्ती प्रसृत झाली होती, त्यामुळें सर्व लोक आपण स्वतंत्र व्हायास यत्न करूं लागले.

हे यत्न चालले होते त्या समयीं **ब्रिटेन** देशांतून कितीएक उमेदवार पुरुष **रोमनांचे** शत्रूंस सहाय व्हायाकारितां **गाल** देशांत जात असत; परंतु त्यांचे सहायापासून फळ होत नव्हतें. मग जशी जशी **रोमन** लोकांची फौज कमी होत चालली तसे तसे, **पिक्त*** आणि **स्काट**† लोक मोठा धीर करून उत्तरेकडील प्रदेश लुटूं लागले. ते चामड्यानें मढविलेले टोंकरांत बसून ज्या समुद्रतिराजवळ **रोमन** लोकांचा पाहारा नव्हता, तेथें उतरून आले, आणि सर्व लोकांस मारून भय प्रदर्शन करायास लागले.

शेवटीं **रोमन** लोक, **ब्रिटेनांत** राहावयाचा उपाय नाहीं असें पाहून तेथून अगदीं निघाले. ते त्या बेटांत सुमारें ४०० वर्षेपर्यंत राहिले होते. त्या समयीं **बेलेटिझन** नामें त्यांचा बादशाह होता. त्यांनीं जाते समयीं **ब्रिटनांस** जो पाहिजे तो राजा करायास, आणि मर्जीप्रमाणें राज्य करायास मुखत्यारी दिली. तसेंच आपल्या बुद्धीप्रमाणें त्यांस राज्यादि करायाची मसलत सांगितली; आणि सैन्याचा बंदोबस्त वगैरे करायास, तसेंच किल्ले नीट करायास त्यांस शिकविलें. सर्व बेटाभोंवतीं

इसवी सन् ४३०

---

* पिक्त आणि स्काट हे लोक ब्रिटेन देशाचे उत्तरेकडच्या प्रदेशांत राहत होते.

† स्काट्लंड देशांत राहणारे लोकांचें नांव स्काट.

दगडांची भिंत **सिविरस** बादशाहाचे वेळची बांधलेली पडून गेली होती, ती नीट करायास त्यांजपाशीं कुशल कारागीर नव्हते, याकरितां **रोमनांनीं** ती नीट करायास मदतही केली.

## प्रकरण २.

### साक्सन* लोकांची कथा.

संन् ४३० पासून ८२७ पर्यंत.

**ब्रिटन** लोक, स्वतंत्र होतांच त्यांला स्वतंत्रपणा प्राप्त झाला हा आपला मोठा घात झाला असें वाटूं लागलें. पुढें **पिक्त** आणि **स्काट** लोक एकत्र मिळून, त्यांनीं **ब्रिटन** देश आपलाच आहे, आणि तो आपण सहज घेऊं असा मनांत अभिमान धरून **रोमनांनीं** उत्तरेकडचे अंगास जी भिंत बांधिली होती तेथें येऊन, ती मोडिली; आणि ते त्या वाटेनें येऊन सर्व मुलूख लुटूं लागले. त्या समयीं **ब्रिटनांनीं** रानांचा आणि डोंगरांचा आश्रय केला.

अशा विपत्तींत **ब्रिटनांस साक्सन** लोकांचे सहाय्याचें अगत्य पडलें. **साक्सन** लोक मोठे शूर होते; ते बळानें आणि शौर्यानें दुसरे **जर्मन** लोकांस अजिंक होते. त्यांस लोक केवळ देवासमान मोजीत. त्यांस स्वस्थ राहायाची आवड नव्हती. युद्ध करणें हा आपला धंदा होय असें त्यांस वाटत असे. ज्या लोकांस नेहमीं युद्धाची प्रीति असते, ते क्रूर असतातच, याकरितां **साक्सन** लोक

---

* जर्मनी ह्मणून ब्रिटेनाच्या पूर्वेस देश आहे, त्यांत साक्सनी ह्मणून एक परगणा आहे तेथील लोकांचें नांव साक्सन.

मोठे दुष्ट होते असें त्यांच्या शत्रूंनीं वर्णन केलें आहे.

**वार्टिजर्न** नामें त्या समयीं **ब्रिटन** देशाचा राजा होता त्यानें सत्कारानें बोलाविलें, असें पाहून ते लोभी लोक फार आनंद पावले, आणि १५०० माणसें घेऊन, **हेंजिस्त,** आणि **हार्सा**, या नांवांचे दोन भाऊ होते त्यांस सरदार करून, **थनेट** बेटास गेले. तेथें जाऊन ते फार दिवस निरुद्योगी न राहातां **ब्रिटनांचीं** फौज बरोबर घेऊन **पिक्त** आणि **स्काट** लोकांसमोर गेले. त्यांनीं शत्रूंस **लिंकोल** प्रांतांत गांठलें, आणि तेथें त्यांचा पराभव केला.

**साक्सन** लोकांनीं या देशचीं शेतकी पाहून, आणि आपला मुळचा देश ओसाड असें मनांत आणून आपल्या नव्या संपत्तीचा विभाग आपले भाऊबंदांस मिळावा या इच्छेनें, तेथून आपले पुष्कळ लोक बोलावून आणिले. तेव्हां त्याचे देशांतून ५००० लोक सत्रा गलबतांत बसून आले, आणि तेथें नेहमीचें एक ठाणें करून राहिले.

**ब्रिटन** ग्रंथकारांनीं, आपल्या देशाचा सहज पराभव झाला याचें कारण असें लिहिलें आहे कीं, **साक्सन** लोक जसे शूर होते तसे ते दगलबाजही होते. याविषयीं त्यांनीं एक गोष्ट सांगितली आहे कीं, **हेंजिस्ताची** मुलगी **रोइना** नामें होती तीविषयीं **वार्टिजर्न** राजा सकाम झाला; तिशीं लग्न करायाकरितां त्यानें लागवडीचा **केंत** प्रांत तिच्या बापाला दिला. मग तो **साक्सनां** लोकांच्या हातांतून कधीं सुटला नाहीं. आणि दुसरें असें लिहिलें आहे कीं, **एग्लस् फांल्ड** शहराजवळ **वार्टिमर** राजा जय मिळवून पुढें लवकरच मेला; मग **वार्टिजर्न** त्याचा बाप होता त्यास तक्तावर बसविलें. त्या

भोळ्या राजास **हेंजिस्तानें** मेजवानीस बोलावून नेऊन त्याचे ३०० दरबारी लोक दगलबाजीनें मारिले; आणि

सन् ४५५ त्यास धरून बंदीस घातलें. त्यानें **केंताचें** संस्थान स्थापिलें आणि तें आपण घेतलें.

**हेंजिस्त** मेल्यानंतर, दुसऱ्या कितीएक जातीचे लोक आपले भाऊबंदांचा मोठेपणा पाहून आपणही जमून तेथें गेले. त्याचे पूर्वी **एला** आणि त्याचे तीन पुत्र यांचे आ-

ज्ञेनें **साक्सनी** फौजेनें कांहीं दिवस दक्षिण

सन् ४७७ **साक्सनी** संस्थानाचा पाया घातला होता, परंतु तें करायास मोठा यत्न लागला, आणि कितीएक खूनही पडले. त्या नव्या संस्थानांत **सरे**, **ससेक्स**, आणि **न्युफारेष्ट** हे प्रांत होते, आणि **केंत** प्रांताचे हद्दीपर्यंत त्यांची मर्यदा होती.

दुसऱ्या जागचे **साक्सन** लोक **सर्दिक** आणि त्याचा पुत्र **केनरिक** या दोघांच्या आज्ञेखालीं पश्चिमेकडे गेले; त्यांनीं पश्चिम **साक्सन** असें आपलें नांव ठेविलें. **ब्रिट-नांनीं** त्यांचें निवारण केलें; परंतु **जर्मनी** देशांतून त्यांस मदत आली, आणि त्या बेटांत जे त्यांचे जातीचे होते ते-ही त्यांत सहाय झाले, ह्मणून त्यांनीं **ब्रिटनांस** पळविलें. पुढें मोठा विख्यात असा जो **आर्थर** राजा झाला त्यानें त्यांचें चालूं दिलें नाहीं, तथापि जें त्यांनीं मिळविलें तें रा-खायास ते समर्थ होते. **सर्दिक** आणि त्याचा पुत्र **केन-रिक** यांनीं, त्या बेटांत तिसरें एक **साक्सनी** संस्थान केलें,

त्यांचें नांव **पश्चिमसाक्सनी** संस्थान असें

सन् ५१९ पडलें, त्यांत **हांत्स**, **डार्सेत**, **विल्ट्स**, **बर्क्स**, आणि **एलआवबेट**, हे प्रांत होते.

**आर्थर** राजानें या **साक्सनी** सरदारांशीं युद्ध केलें त्यामुळें त्याची मोठी कीर्त्ति झाली. शेवटीं त्याचें धैर्य जरी निष्फळ झालें तथापि, त्या समयींचे कथांत त्याचें फार वर्णन केलें आहे, ह्मणून त्याची थोडीशी गोष्ट एथें सांगितली पाहिजे. त्याचे वडील कोणते होते याविषयीं ग्रंथकरांचा सिद्धांत नाहीं, अनेक मतें आहेत. तें कसेंही असो, तथापि तो मोठा शूर होता ही गोष्ट खरी आहे; आणि नुस्त्या शौर्यानेंच जर **ब्रिटनाचे** हाल दूर व्हावयाजोगे असते, तर त्याचा गुण सफळ झाला असता. त्यानें **साक्सनांस** अनुक्रमानें बारा लढायांत जिंकिलें. **वर्क्स्** प्रांतांतले **कार्बेदन** गांवाजवळ एक लढाई झाली तींत चारशें चाळीस, शत्रूंचे योद्धे त्यानें आपल्या हातानें मारिले, अशी कथा सांगतात; परंतु **साक्सनी** लोक बहुत आणि बळवान होते, त्यामुळें एके शूर पुरूषाच्यानें ते देशांतून बाहेर काढले गेले नाहींत; त्याचे जयापासून चांगलें फळ होत नसे, परंतु त्यापासून तह मात्र होई. या रीतीनें शत्रूंची बढती होत चालली आणि राजा ह्मातारा झाला तेव्हां कांहीं गृहसंबंधी दुःखांत पडल्यामुळें त्यांचे वृद्धीचा प्रतीकार त्याचे हातानें झाला नाहीं. त्याची पहिली बायको **सामर्सेट** शहराचा राजा **मिलनास** होता, त्यानें पळवून नेली. नंतर ती त्यानें लपवून ठेविली होती तें ठिकाण **आर्थर** राजास कळलें, आणि तो तेथें सैन्यासुद्धां जाऊन त्या लबाडाकडून बळानें तिला घेऊन आला. त्याचे दुसरे बायकोची कांहीं गोष्ट लिहिलेली नाहीं. परंतु त्याचे तिसरे बायकोजवळ त्याचा पुतण्या **मार्द्रेड** नामें होता त्यानें लबाडी केली, यामुळें त्या

दोघांत कलह उत्पन्न झाला. आणि त्यांचें युद्ध होऊन त्या दोघांनीं आपले हातानें आपणांस मारून
संन् ५४२ घेतलें.

त्या **साक्सनांची** या रीतीनें **पश्चिमे**कडे बढती होत होती, तेव्हां दुसरे **साक्सनी** लोक, बेटाचे दुसरेकडून येऊन तसेच उद्योग करीत, ते त्यांचे सफळ होत असत. तसेच **जर्मनी** मुलखांतून पुष्कळ मुशाफर येत असत. त्यांचा **अफा** ह्मणून एक सरदार मोठी फौज जमवून आला त्यानें **केम्-रीज, सफोक** आणि **नार्फोक** हे प्रांत घेतले.
संन् ५७१ तेव्हां त्या सरदारास फौजेनें **ईष्टआंग्लाचा** राजा अशी पदवी दिली. हें **ब्रिटन** देशांत **साक्सनाचें** चवथें संस्थान झालें.

दुसऱ्या एके फौजेनें एक नवें संस्थान स्थापिलें,
संन् ५२७ त्याचें नांव **एसेक्स** ह्मणजे **ईष्टसाक्सनी** ठेविलें. त्यांत **एसक्स** प्रांत, **मिडल्सक्स** प्रांत, आणि **हार्तफोर्द** प्रांताचा एक भाग इतका मुलूख होता. हें संस्थान **केंताचे** संस्थानापासून वेगळें पांचवें संस्थान झालें.

सहावें संस्थान **मर्शियाचें** होतें, त्यांत सर्व
संन् ५८४ मध्यदेश **सेवर्न** नदीचे तीरापासून वर सांगितले दोन राज्यांपर्यंत होते.

सातवें संस्थान **नर्थंबर्लंड**, तें सर्वांहून मोठें
संन् ५४७ आणि बळकट होतें. तें दोन लहान **साक्सनी** संस्थानें मिळून झालें. त्यांत एकाचें नांव **बोनाशिया** (ह्मणजे **नर्थंबर्लंड** आणि **बिशाप्रिक आवडर्म** हे दोन प्रांत.) दुसऱ्या संस्थानांतले लोकांचें नांव **दैरि**, ते सांप्रतचे **लांका** प्रांत आणि **यार्क** प्रांत एथें राहात होते. **एथेल्रेड** ह्मणून

**नर्थंबलैंडाचा** राजा होता, त्यानें आपला मेहुणा **दैरोचे** राज्यांतून बाहेर काढून दिला; आणि त्याचा मुलूख घेऊन हीं दोन राज्यें एकत्र केलीं– या रीतीनें **ब्रिटन** लोक अगदीं बुडाले गेले, त्यामुळें हीं सात संस्थानें दृढ झालीं तेव्हांपासून तीं **साक्सन हेप्तार्कि*** या नांवानें प्रसिद्ध आहेत.

बेटांतील सर्व प्रदेशांत **साक्सनी** लोक या रीतीनें निर्भय झाले; आणि **ब्रिटन** लोकांशीं लढाई करायास मिळेनाशी झाली ह्मणून ते आपापल्यांत कज्जा करूं लागले. ज्यां मुलखांत राज्याचीं लहान लहान संस्थानें झालीं तेथें भांडण व्हायाचेंच. मग पुष्कळ लढाया, दंगे, आणि बंडें झाल्यानंतर शेवटीं सर्व लहान संस्थानें **एग्बर्ट** नामें **वेसेक्साचा** राजा होता त्याचे हाताखालीं आलीं, त्याचे गुणांस तें राज्य योग्य होतें; आणि जें मिळविलें तें त्यानें आपले चातुर्यानें राखिलें. **एग्बर्टानें** सर्व **हेप्तार्कीचे** मुलूख एका अमलाखालीं आणिले, आणि आपले सन् ८०८ शक्तीस शोभा आणायाकरितां **विंचीस्तर** शहरांत धर्मपक्षपाती आणि इतर सर्व लोक जमा करून मोठ्या उत्साहानें आपणास **इंग्लंडाचा** राज्याभिषेक करून घेतला. तेव्हांपासून त्या एक झालेल्या मुलखास **इंग्लंड** हें नांव चालत आहे.

**साक्सनी** लोक पहिल्यानें **ब्रिटनांत** आले तेव्हांपासून चारशें वर्षांच्या सुमारें त्यांचीं सर्व धाकटीं संस्थानें मिळून एक मोठें राज्य झालें; पुढें त्या राज्याची अबादानी, आणि चढती होईल असा योग त्या समयीं दिसत होता.

---

* हेप्तार्कि ह्मणजे सात संस्थानांचा समुदाय.

त्या काळीं **संटग्रेगरी*** ह्मणून एक **क्रैस्ताचा** संप्रदायी होता; त्यानें **साक्सनी** लोकांस **क्रैस्ती** धर्मांत आणावयाकरितां, **ब्रिटेनांत** धर्मोपदेशक पाठविले. अशी कथा आहे कीं, तो पोप† व्हायाचे पूर्वी एके दिवशीं, **रूम** शहरांत जेथें दास आणि दासी विकत असत त्या वाटेनें जात होता; त्या वेळेस त्यानें कितीएक सुंदर मुलें विकायास दमविलीं होतीं, तीं कोणत्या देशचीं याचा शोध केला, तेव्हां तीं **इंग्लंड** देशांतलीं आहेत, असें त्यास समजतांच तो **लातिन**‡ भाषेत बोलिला. **नन आंग्लै, सेड आंजिलै फारेंट सैएसेंट क्रिस्तियानै**, याचा अर्थ असा कीं जर हीं **क्रिस्तियन** होतील तर यांस **इंग्लिशांची** तर काय परंतु देवदूतांची योग्यता येईल – तेव्हांपासून त्या अज्ञानी लोकांस **क्रैस्ती** धर्मांत आणावें अशी इच्छा त्याचे मनांत फार उत्पन्न झाली आणि त्याकरितां त्यानें **आगुस्तिन** या नांवाचा महंत, तसेच त्या सांप्रदायाचे कितीएक दुसरे लोक **ब्रिटेन** देशांत पाठविले.

हा भक्तिमान् महंत§ **थानेट** बेटांत जातांच, यानें **केंत** प्रांताचा राजा **एथेल्बर्ट** होता त्याला आपल्या एके दुभाष्याबरोबर निरोप सांगून पाठविला कीं, मी **रूम** शहरांतून तुमचा उद्धार करायाकरितां आलों आहें. राजानें

* संट ह्मणजे जो धर्माचरणेंकरून श्रेष्ठ तो.

† रूम शहरांत जो क्रिस्तियन धर्माचा मुख्य व्यवस्थापक असे त्याचें नांव.

‡ बहुतकरून सर्व युरोप देशांत ज्या भाषा बोलतात त्यांची मूळ संस्कृतासारिखी एक भाषा आहे तिचें नाम लातिन.

§ जो विषयोपभोग करीत नाहीं व जो आपलें आयुष्य बहुतकरून पुण्य कर्मांत घालवितो तो.

तें ऐकून लागलेंच त्यांस जें काय साहित्य पाहिजे होतें तें देवविलें; आणि आपण त्यांचा धर्म घेणार कीं नाहीं हें कांहींच त्यांस न सांगतां त्यांचे भेटीस गेला. राजानें आपला उत्कृष्ट सत्कार केला हें पाहून **आगुस्तिनाच्या** मनांत आपला बेत सिद्धीस जाईल असा धीर आला; आणि तो पहिल्यापेक्षां अधिक उत्साहानें लोकांमध्यें **गास्पिल*** सांगूं लागला. नंतर त्या राजानें मोठा समारंभ करून **क्रैस्ती** धर्म घेतला, मग त्याचें तें कर्म पाहून लोकांच्याही मनांत ती गोष्ट भरली, आणि शेंकडों लोक स्वेच्छेनें **क्रिस्तियन** व्हायाकरितां येऊं लागले, त्यांस तो उपदेशक सांगूं लागला कीं, आह्मी **क्रैस्ती** धर्मांत आणायासाठीं कोणावर जुलूम करीत नाहीं; ज्याची इच्छा असेल त्यानें यावें. या रीतीनें दुसऱ्या राज्यांतही तो धर्म अनुक्रमानें प्रसृत झाला. आणि इंग्लिश जसे पूर्वी **क्रैस्ती** धर्माचा द्वेष करीत असत, तसेच ते पुढें **पोपाच्या** सर्व आज्ञा मानूं लागले.

# प्रकरण ३.

## डेन† लोकांच्या स्वाऱ्या.

संन् ८२७ पासून १०६६ पर्यंत.

**इंग्लंड** देशांत स्वस्थता, आणि एकमत नुकतें झालें होतें; इतक्यांत **डेन** या नांवाचे लोकांची मोठी जमात

---

* गास्पिल ह्मणून ग्रंथ आहे. त्यांत सर्व इंग्लिशांच्या धर्माचें कथन केलें आहे.

† डेन्मार्क ह्मणून ब्रिटेनाचे ईशानी दिशेस देश आहे तेथें राहणारे लोक ते डेन.

**बाल्टिक** समुद्राचे तिरींचा देश घेऊन **इंग्लंड** देश लुटूं लागली. तो देश कसा आहे याचा शोध करायाकरितां पहिल्यानें ते थोडीशी फौज घेऊन तिरीं आले, आणि थोडेसें लुटून गलवतावर पळून गेले. या पहिल्या यत्नानंतर सात वर्षांनीं ते पुनः **नर्थंबर्लंड** राज्यांत येऊन उतरले; आणि त्यांनीं एक मठ* लुटला; ते वेळीं त्यांचीं गलवतें वादळामुळें खराब झालीं होतीं ह्मणून त्यांचा सहज पराभव झाला, आणि देशचे लोकांनींही त्यांस मारिलें. **इंग्लंडांत एग्बर्ट** राजा झाल्यानंतर पांच वर्षांनीं त्यांनीं येऊन मोठा हल्ला केला; तेव्हांपासून ते सतत धट्टाईनें हल्ले करीत गेले, शेवटीं सर्व मुलूख त्यांचे स्वाधीन झाला.

जरी त्यांचा पराभव होत असे, तरी नेहमीं त्यांचा बेत सिद्धीस जाई. ते मुलूख लुटून, लूट घेऊन जात. जोंपर्यंत लढाईवांचून चालेल तोंपर्यंत युद्ध करूं नये, आणि साऱ्या मुलुखभर फिरून जें न्यायाजोगें सांपडेल तें स्वदेशीं घेऊन जावें, अशी त्यांची पद्धत होती.

सन ५३९ शेवटीं त्या मुलखांत आपण एक ठाणें करावें, असा त्यांनीं निश्चय केला, आणि **थाटेन** बेटांत येऊन तेथें वस्ती केली. नंतर तेथें **एथेल् बुल्फ** राजानें जाऊन युद्ध करून जय मिळविला, तरी त्यांनीं आपलें संस्थान राखिलें. त्या **एथेल् बुल्फ** राजानंतर **एथेल्बाल्ड** राजा झाला त्यानें फार दिवस राज्य केलें नाहीं; परंतु पुढें

* महंत ह्मणून जे मागें सांगितले त्यांचे राहायाच्या ठिकाणास मठ असें ह्मटलें आहे.

लोकांनीं निंदा करावी अशी योग्यता प्राप्त व्हायापुरतीं दुष्कर्में मात्र त्यानें थोडक्या काळांत पुष्कळ केलीं.

या राजाच्या राज्यानंतर **एथेल्रेड** ह्मणून राजा झाला तो मोठा शूर होता, परंतु **डेन** लोकांचा दगा बंद करायास तो समर्थ झाला नाहीं. त्या उद्योगास राजाचा धाकटा भाऊ **आल्फ्रेड** नामें होता तो मदत करीत असे, ह्मणून त्याचें नाम **आल्फ्रेड दिग्रेट*** असें पडलें. त्यास राजानें बापाचे वेळची संपत्ति दिली नव्हती, त्या आवेशानें लोकांचें बरें करण्याविषयीं तो फार प्रवृत्त होत असे; **एथेल्रेडाचे** राज्यांत **डेन** लोकांनीं **मर्शिया** प्रांतपर्यंत येऊन, हिंवाळ्याचे दिवशीं **नाटिंगम** शहराजवळ तळ दिला; तेथून त्यांस काढून द्यायाचा उद्योग राजा करीत होता. त्या समयीं एके लढाईंत घाय लागून तो मेला. मग त्याचा भाऊ त्या राज्याचा अधिकारी झाला. तें राज्य त्या समयीं अगदीं मोडत आलें होतें. संन् ८६७ संन् ८७३

**डेन** लोक, **नर्थंबर्लंड**, आणि **ईष्टआंग्लिया** हे तालुके घेऊन **वेसेक्स** तालुक्याचे मध्यापर्यंत येऊन पोंहचले. त्या समयीं **मर्शिया** देशांतले लोक जमून **आल्फ्रेड** राजाशीं द्वेष करूं लागले; त्या राजास दुसऱ्या प्रांतांतले लोकांवर भरंवसा ठेवितां नये; त्या समयीं दंग्याचे भयामुळें जमिनीची कोणी लागवड करीना असें झालें; आणि सर्व देवालयें आणि मठ जळून गेले. अशा भयंकर दशेंत सर्वत्र संकटें दिसूं लागलीं; आणि लोक केवळ निराश

* दिग्रेट ह्मणजे महान्. राजाचे गुण आणि कर्में यांवरून अशीं नावें पडत असनात.

झाले.' परंतु एका पुरुषाचे चातुर्य आणि सदाचरण यांहींकरून त्या समयीं सुख, स्वास्थ्य आणि बंदोबस्त हीं राज्यांत पूर्वींसारखीं झालीं. त्या समयींचा सर्व संकटांचा परिहार **आल्फ्रेड** राजानें केला.

या राजाचा जन्म आपला दुःखी देश राखावयासच केवळ झाला नाहीं; तर मनुष्यमात्रास ही सुशोभित करायाकरितां झाला. त्यानें लहान वयांतच आपले सत्गुणांची प्रचीति दाखविली. त्याचे बापानें त्यास **रूम** शहरास विद्याभ्यासाकरितां पाठविला होता, तेव्हांच **पोप लिओ** यानें हा पुढें राजा होईल असें ह्मणून त्यास अभिषेक केला. तो तेथून परत आल्यानंतर प्रतिदिवशीं त्याजवर बापाची प्रीति अधिक होत चालली. अशा लाडांनींच प्रथम वयांत त्यास विद्याभ्यास झाला नाहीं असें दिसतें. त्याचें वय १२ वर्षांचें झालें त्यावेळेस त्यास विद्यांचीं सामन्य स्वरूपेंहीं ठाऊक नव्हतीं. त्यानंतर एके समयीं त्यानें कांहीं **साक्सनी** पद्यरूप ग्रंथ ऐकिले, त्यांत शूरांची प्रशंसा होती; ती ऐकून त्याचें चित्त व्यग्र झालें; आणि त्या शूरांसारखी आपण कीर्त्ति मिळवावी, आणि ती पुढें लोकांनीं गावी ह्मणून ग्रंथही आपणास करिता यावे अशी त्यास इच्छा झाली. त्याचे आईनें त्यास धीर दिला आणि त्याची बुद्धि त्यास सहाय झाली ह्मणून तो ते ग्रंथ वाचायास लवकर शिकला. त्यानंतर तो **लातीन** पुस्तकेंही वाचूं लागला; नंतर त्यास विद्येविषयीं अभिरुचि उत्पन्न झाली.

तो तक्तावर बसतांच त्यास **डेन** लोकांचा परभव करणें प्राप्त झालें. ते लोक **बिल्टन** शहर घेऊन सर्व मुलूख लुटीत होते. त्यानें घाईनें जितकी फौज मिळाली तितकी

घेऊन त्यांशीं मोठें भयंकर युद्ध केलें, परंतु त्या समयीं **डेन** लोकांचाच जय झाला. आपला पराभव झाला ह्मणून राजाचा उत्साह कमी झाला नाहीं, आणि थोडके दिवसांनीं त्यानें दुसरी लढाई करायाची हिम्मत धरली. तेव्हां त्याचें धैर्य आणि उद्योग पाहून शत्रु भयानें तहाचें बोलणें करूं लागले, तें त्यानें मान्य केलें. त्या तहनाम्यांत शत्रूंनीं मुलूख सोडून जायाचा करार केला होता; परंतु त्यांनीं तो मोडला, आणि इतकें मात्र केलें कीं, एके ठिकाणापासून जाळीत आणि विध्वंस करीत दुसरे ठिकाणीं गेले.

ते समयीं राजास असें वाटलें कीं ज्यांचें निवारण एके ठिकाणीं राहिलेले फौजेचे हातून झालें नाहीं; जे तहाचे प्रतिबंधास मोजीनात, आणि जे चारही दिशांकडून येऊन हल्ला करितात, त्यांचे यत्न चालू न देणें हें माझे हातून होणें कठिण. प्रतिवर्षीं शत्रूंच्या नव्या टोळ्या येत, आणि नवे नवे हल्ले होत असत. या दुःखाकरितां त्याच्या प्रजांतून कितीएक लोक **वेल्स** प्रांतांत गेले; आणि कितीएक परदेशांत निघून गेले; दुसरे कितीएक शत्रूंस शरण गेले, आणि त्यांचे आधीन होऊन आपला जीव वांचविते झाले. असे सर्व लोक राज्य सोडून जाऊं लागले, त्या समयीं राजानें त्यांस आपला देश आणि आपला राजा यांचे सेवेविषयीं आचरण कसें करावें, हें सांगायाचा उद्योग केला; परंतु तो निष्फळ झाला; असें पाहून त्यानें त्या दुष्ट समयास मान दिला, आणि आपली सर्व संपत्ति टाकून फौजेस निरोप देऊन, आपण शेतकऱ्याचें सोंग घेऊन, कांहीं दिवस एके गुराख्याच्या घरीं राहिला. असा दडून राहिला होता, आणि चहूंकडून

शत्रूंचें भय मानीत असे; परंतु त्याचा निश्चय होता कीं, मी आपल्या देशीं राहून शत्रूंपासून देश मुक्त करायाचा समय येई तोंपर्यंत वाट पाहीन. तो राहिला होता तें एकांत ठिकाण **समर्सेट** प्रांतीं होतें, तेथें **पारिट** आणि **थोन** या दोन नद्यांचा संगम आहे. तेथें तो गायनानें आपले मनास विश्रांति देत असे. अशी कथा आहे कीं एके दिवशीं गुराख्याचे बायकोनें तो राजा असें न कळून, त्यास कांहीं पक्वान्नें शिजत लाविलीं होतीं तीं पाहायास सांगितलीं, आणि आपण बाहेर गेली. तेव्हां त्याचें मन कांहीं दुसरे विचारांत गुंतलें होतें ह्मणून, तीं जळून गेलीं तरी त्यानें पाहिलीं नाहींत. मग ती बायको परत आली तेव्हां, त्याला पुष्कळ रागें भरून बोलिली– तेथें जायाच्यापूर्वी त्या **आल्फ्रेड** राजानें, आपले कितीएक विश्वासू स्नेही होते त्यांस असें सांगून ठेविलें होतें, कीं जर समय आला तर सर्वांनीं जमा होऊन शत्रूंशीं युद्ध करावें– ते त्याचे मित्र आपले राजाविषयीं इमानानें चालत होत्साते **समर्सेट** प्रांतांतील अरण्याचा आश्रय करून होते; तेथून त्यांनीं शत्रूंच्या टोळ्या फिरत होत्या त्यांजवर हल्ला केला. तेथें ते जय पावले. मग दुसरे कितीएक लोक त्यांस सहाय झाले. पुढें ते पुष्कळ जमा होऊन आपले राजाजवळ गेले, तेव्हां दुष्कळामुळें तो मोठ्या विपत्तींत होता.

त्या काळीं **अबा** या नांवाचा एक पुरुष **डेन** लोकांचे सरदारांमध्यें मुख्य होता. त्यानें सर्व मुलूख भयभीत केले. तो सर्व **वेल्स** मुलूख लुटूं लागला. त्याचें निवारण कोणी करूं शकला नाहीं, परंतु तो परत येऊं लागला ते समयीं, **केनुड्थ** किल्ल्याजवळ त्याचा पराभव झाला. तो

असा त्या किल्ल्यांत **डेवन** प्रांताचा **अर्ल*** थोडकेच फौजेनिशीं होता– त्या शूर योद्ध्यानें असा विचार केला कीं अशा दगलबाज शत्रूंचे स्वाधीन किल्ला करणें हें फार वाईट. मग शत्रूंनीं किल्ल्यास वेढा घातला होता तें न साहून त्यानें असा निश्चय केला कीं चढाव करून शत्रूंस तोडून मारावें. तो त्याचा निश्चय त्याचे सर्व फौजेनें मान्य केला. **डेन** लोक आपल्या मोठे फौजेवर भरंवसा ठेवून, शत्रूंची गणना करीत नव्हते; परंतु त्या वेळेस त्यांचा पराभव झाला, आणि त्यांचा सरदार **अबा** होता तो मेला.

पूर्वीं **साक्सन** लोकांची हिम्मत खचली होती. परंतु हा जय झाला त्यामुळें त्यांस पुनः धीर आला. तेव्हां **आल्फ्रेड** राजानें ते निर्भय झाले असें जाणून, आतां तुह्मास शत्रूंचें कांहीं भय नाहीं ह्मणून उद्योग चालू करावा असा त्यांस धीर दिला. मग लवकरच, त्यानें मी कोठें लपून राहिलों आहें हें त्यांस कळविलें; आणि सांगून पाठविलें कीं, मी खूण केली ह्मणजे लागलेंच सर्वांनीं फौजेसहित सिद्ध व्हावें. परंतु शत्रूंची फौज आणि त्यांचें ठिकाण यांचा शोध करून सांगणारा त्यास कोणी विश्वासू मिळेना. ह्मणून त्यानें तें कठिण काम आपण स्वतः करायास आरंभिलें. तो गुराख्याचा साधा वेष धरून हातांत एक सारंगी घेऊन **डेन** लोकांचा लश्करांत गेला, आणि आपली गायनकळा दाखवून लोकांचें मनोरंजन करूं लागला. त्याची तेथें इतकी प्रतिष्ठा झाली कीं, **डेन** लोकांचा **गथ्रम** नामें राजा होता. त्याजवळ त्याचा प्रवेश झाला. त्यास कांहीं दिवस राजानें आपले जवळ ठेवून

---

* अमात्यांत तिसरे पदवीचा अधिकारी असतो त्यास अर्ल ह्मणतात.

घेतला होता– तेथें त्यानें **डेन** लोकांमध्यें बंदोबस्ताविषयीं सुस्तपणा, **इंग्रेज** लोकांशीं द्वेष, लुटण्याविषयीं आणि नाश करण्याविषयीं अनास्था, आणि लुटीनें जें मिळालें असेल तें उधळून टाकावें, असें लक्षण पाहिलें. असा तो जें पाहायाचें होतें तें सर्व पुरतेंपणीं पाहून, आपले मूळचे ठिकाणीं आला; आणि त्यानें आपले प्रजांजवळ विश्वासू जासूद पाठवून त्यांस कळविलें कीं, तुह्मी मला **सेलवुडाचे** रानांत येऊन भेटा. तो निरोप त्यांनीं मोठ्या हर्षानें मान्य केला.

नंतर **आल्फ्रेड** राजानें ज्या ठिकाणीं शत्रूंचा पाहारा नव्हता त्या आंगून जाऊन हल्ला केला; तेव्हां **डेन** लोक, **इंग्रेज** लोक केवळ पराजित झाले आहेत असें समजून होते; ते एकाएकीं त्यांचा फौज पाहून मोठे विस्मित झाले. ते वेळीं शत्रूंचें निवारण करायास त्यांचा यत्न चालला नाहीं. यद्यपि त्यांची फौज **इंग्रेज** लोकांपेक्षां अतिशय मोठी होती, तथापि त्यांचे पुष्कळ लोक मेले आणि बाकीचे पळाले– मग जे पळाले होते, ते जवळचे एक बळकट किल्ल्यांत त्यांचें ठाणें होतें तेथें गेले, परंतु आंत सामान नाहींसारिखें झालें त्यामुळें, ते पंधरावीस दिवसांचे आंत तो किल्ला सोडून देऊन शत्रूंस शरण गेले– असें त्यांनीं शाहाणपण केलें. ज्यांचीं **क्रिस्तियन** धर्म घ्यायाची आवड नव्हती ते, राजाचे हुकुमानें आपले एके **हेस्तिंग्स** या नांवाचे सरदारास मुख्य करून **फ्लिंडर्स्** देशास गेले. त्यांचा राजा **गथ्रम** होता त्यानें आणि दुसरे सरदार लोकांनीं **क्रैस्ती** धर्म घेतला.

**आल्फ्रेड** राजा त्या समयीं मोठ्या प्रतिष्ठापर्वताचे शि-

खरीं बसला. त्यास राज्य प्राप्त झालें तेवढें त्याचे पूर्वीच्या कोणत्याही राजास झालें नव्हतें. **वेल्स** प्रांतांतील राजे त्यास करभार देऊं लागले; **नर्थंबलंड** प्रांतांतील लोकांनीं, त्यानें सांगितलेला राजा केला. त्या वेळेस किंचित्‌ही भयाची शंका व्हायाजोगा कोणीच शत्रु राहिला नव्हता. तशी संपत्ति आणि स्वास्थ्य बारा वर्षेंपर्यंत चालिलें होतें. त्या काळीं **आल्फ्रेड** राजा राज्याचें स्वाथ्य होण्यास उपयोगी ज्या विद्या त्यांची वृद्धि करण्याचा उद्योग करीत होता; तसाच युद्धामुळें जो राज्यांत नाश झाला तो नीट करायाचाही त्याचा प्रयत्न चालिला होता.– त्यानें मनांत असा निश्चय केला कीं जसा मी आपला देश बाहुबळानें राखिला, तसाच तो कलाकौशल्यांहीं भूषित करीन. त्यानें राज्यांत बंदोबस्ताकरितां कितीएक कायदे केले. आपल्या देशांत विद्याभ्यास वाढावा असें जें त्यानें लक्ष्य धरिलें तेणेंकरून लोक विशेष सदाचरणी झाले. त्यांच्या वाईट खोडी होत्या त्या गेल्या. तो राज्य करूं लागला तेव्हां, त्यानें **इंग्लिश** लोक मोठ्या अज्ञान दशेंत आहेत असें पाहिलें; याचें कारण, पूर्वीं त्या देशीं नेहमीं गडबड चालिली होती; आणि **डेन** लोक नेहमीं येऊन लुटीत असत. त्यानें ह्मटलें आहे कीं "मी जेव्हां राज्य करूं लागलों त्या वेळेस **टेम्स** नदीच्या दक्षिणेस एकही पुरुष असा नव्हता कीं ज्यास **लातिन** भाषा येत आहे." मग त्यास उपाय त्यानें असा केला कीं, सर्व **युरोप** देशांतून मोठमोठे विद्वान बोलावून आणून **आक्सफर्ड** शहरांत जी **युनिवर्सिटि*** आहे ती उत्पन्न केली; किंवा तेथें **युनिवर्सिटि**

* युनिवर्सिटि ह्मणजे अनेक विद्या, कळा, कौशल्यें शिकवायाच्या

पहिली होती ती बंद झाली होती, ती पुनः त्यानें चालू केली असें ह्मटलें तरी चालेल. तीस पुष्कळ स्वास्थ करून ठेविलें, आणि आपल्या आचरणावरून त्यानें लोकांच्या मनांत विद्याभ्यास करावा अशी गोष्ट आणून दिली. त्यानें आपले काळाचे समान तीन विभाग केले होते; एका विभागांत निद्रा, भोजन, आणि कर्मणूक; दुसऱ्या विभागांत काम कारभार; आणि तिसऱ्या विभागांत विद्याभ्यास, पुण्यकर्म, व्याकरण, अलंकार, सृष्टिविज्ञान, शिल्प, आणि भूमिति यांचा अभ्यास, अशीं नेमिलीं होतीं; त्यासारिखा कवि तर त्या समयीं एकही नव्हता. त्यानें बहुत ग्रंथ केले, त्यांतून कितीएक अझूनही आहेत. जे गुण मनुष्याचे ठायीं चांगलेपणाची परिपूर्णता आणितात, ते समग्र त्याचे ठायीं वसत होते—त्यांत अणखी नवल हें कीं, जे गुण स्वभावतः परस्पर विरुद्ध ते त्याचे अंगीं भूषणरूपानें होते. ते असे कीं, तो आग्रही असून मृदु, अल्पतृष्ण असून महत्कर्मारंभ करणारा; नीतिमान् होत्साता दयाळु; ज्याची आज्ञा कडक असून भाषण गोड; असा होता. अशा सद्गुणांचा कांहीं चांगला उपयोग व्हावा अशा हेतूनें देवानें त्यास
इ. सं. ९०० शरीरसंपत्तिही यथास्थित दिली होती. बळ, सौंदर्य, रमणीय आणि हास्यमुख चेहेरा, हेही गुण त्यामध्यें होते.

त्या राजानंतर त्याचा मुलगा **एड्वर्ड** राजा झाला. त्याच्यानंतर **आल्फ्रेड** राजाच्या राखेच्या पोटचा मुलगा **आथेल्स्तन** राज्य करूं लागला; तो जरी अस्सल नव्हता,

---

शाळांचा समुदाय एकस्थळीं असतो ती. अशा शाळेस पुढें क्वचित् सर्वविद्यालय असेंही ह्मटलें आहे.

तरी तो राज्य पावला याचें कारण हें कीं, त्या काळीं तशी चाल होती. **आथेल्स्तन** राजा सोळा वर्षे राज्य करून **ग्लौसेस्तर** शहरांत मेला. त्यानंतर त्याचा भाऊ **एड्मंड** राजा झाला. त्यास पूर्वींच्या राजा- इ. सं. ९४२ सारिखाच **नर्थंब्रियन** लोकांनीं उपद्रव केला; परंतु त्याच्या उद्योगापुढें त्यांचें बळ चालिलें नाहीं. तो राजा दुष्ट लोकांचें पारिपत्य करी– शेवटीं तो त्यांचे हातूनच मृत्यु पावला. **लिआल्फ** ह्मणून एक चोर होता, त्यानें एके दिवशीं राजा जेवीत होता त्या ठिकाणीं धट्टाईनें जाऊन त्याचा वध केला. त्यानंतर त्याचा इ. स. ९४५ भाऊ **एद्रेद** राज्य करूं लागला. त्याचे पूर्वजांप्रमाणें त्यासही समजलें कीं आपल्यास दगलबाज लोकांवर राज्य केलें पाहिजे. मग **डनस्तन** ह्मणून कोणीएक महंत होता, तो धर्मप्रकरणीं आणि राज्यकारभारांत जें जें सांगे त्या त्याप्रमाणें तो करी. त्या उद्योगी पुरुषाच्या योगेंकरून सर्व राज्य पेपल* व्हायाचे संधानांत आलें होतें; परंतु त्याच्या यत्नास राजाच्या मरणाचा प्रतिबंध झाला. **एद्रेड** राजा, गळ्यांत कांहीं रोग झाल्यामुळें राज्य करूं लागल्यापासून दाहावे वर्षीं, संन् नऊशें पंचावन्नांत मृत्यु पावला.

**एद्रेद** राजाचे मुलगे त्या वेळेस राज्य करायाजोगे नव्हते ह्मणून, त्याचा पुतण्या **एद्वी** नामें होता त्यास तक्तावर बसविलें. तो परम गुणी, आणि शूर होता खरा, परंतु जें राज्य त्यास करायाचें, त्यांत अशा शत्रूंशीं प्रसंग होता कीं, त्यांस मोडायास शौर्यादि गुण विशेष उपयोगीं पडूं नयेत. **डनस्तानानें** असा विचार केला कीं जसें पूर्वीचें राज्य आपले

---

* पोपाचे आज्ञेप्रमाणें चालणारे ते पेपल.

आज्ञेप्रमाणें चाललें होतें तसेंच हेंही चालवावें; ह्मणून **एद्वी** राजास राज्य प्राप्त होतांच त्याचा आणि त्याचा तंटा लागला; तो त्या राजाचे गुणांनीं किंवा पुण्यकर्मांहीं मिटेना.

त्या महंताचा क्रूर कर्मांपैकीं एक गोष्ट लिहिली आहे, ती सांगतों. राजाची नातेवाईक एक स्त्री होती, तिचें नांव **एल्गीवा**; तिच्या सौंदर्यानें तो तरुण राजा मोहित झाला; आणि कारभाऱ्यांचे मसलतीवांचून तिशीं त्यानें लग्न केलें. तिचें आणि त्याचें नातें होतें त्यामुळें तें लग्न शास्त्रविरुद्ध झालें. त्या राजास राज्याभिषेक झाला ते दिवशीं, त्याचे मोठे मोठे कारभारी खाण्यापिण्याच्या रंगांत असतां, राजा आपले बायकोचे खोलींत गेला. तेथें सासू आणि बायको या दोघींशीं आनंदानें गोष्टी बोलत बसला होता; इतक्यांत तो कोठें दिसेना असें पाहून महंत क्रोधानें त्या खोलींत गेला, आणि त्यानें राजास रागें भरून बोलून बाहेर काढिलें.

**डनस्तानास** कितीएक शत्रु होते, त्यांनीं राजास मसलत सांगितली कीं, या अन्यायाकरितां **डनस्तानाचें** शासन करावें; तें या रीतीनें कीं पूर्वीच्या राज्यांत जो पैका त्याचे स्वाधीन ठेविला होता त्याचा हिशेब त्यापासीं मागावा. त्याप्रमाणें राजानें हिशेब मागितला असतां **डनस्तानानें** हट्टास पेटून दिला नाहीं. त्याकरितां सर्व धर्मादाय, इनामें, आणि पदव्या, जा त्याकडे होत्या त्या घेतल्या आणि त्यास देशाचे हद्दीपार केलें. असें विपत्तिदायक शासन भोगलें तेणेंकरून लोकांमध्यें **डनस्तानाचे** निर्दोषपणाविषयीं कीर्त्ति अधिक झाली. नंतर त्याचा पक्ष धरून

**क्यांतर्बरीचा आर्चबिशप*** **ओदो** नामें होता त्यानें **एद्वी** आणि **एल्गीवा** या दोघांमध्यें वियोग व्हावा असा हुकूम केला.

धर्माध्यक्षाचे आज्ञेशीं विरुद्ध राजाच्यानें आचरण करवेना ह्मणून त्यानें आपली सुंदर बायको टाकणें कबूल केलें. तेव्हां **ओदोनें** राजाच्या वाड्यांत शिपाई पाठविले, त्यांनीं राणीला धरून लोखंड तापवून तिचे तोंडावर डाग दिला. एवढ्या दुष्ट कर्मेंकरूनही संतोष न पावून त्यांनीं धट्टाईनें तिला **अयर्लंडांत** नेली आणि तेथें नेहमीं राहायाचा हुकूम केला. त्या पतिव्रतेस, ही आज्ञा मानणें हें मोठें संकट पडलें. जरी ती तेथें होती तरी राजावर तिचा पतीसारिखाच भाव होता. ह्मणून, तोंडावरचा डाग बरा झाला आणि तिचें शरीर विशोभित दिसायाकरितां दुसऱ्या ज्या खुणा केल्या होत्या त्या गेल्यानंतर, ती राजाजवळ एक वेळ आली. परंतु विपत्तीनें तिची पाठ सोडिली नाहीं. **क्यांतर्बरीचे आर्चबिशपानें** ती काय करिते याचा शोध करायाकरितां एक मंडळी नेमिली होती; त्यांनीं तिला धरून बंदींत घातली; आणि तिचे तंगड्यांचे सांधे कापले. अशा भयंकर रीतीनें तिचा वध केला. त्याच वेळेस **एद्वी** राजासही चोहोंकडून बुडवायाचीं संधानें चोरून चाललीं होतीं. त्या पक्षांत मुख्य तो **डनस्तन** महंत होता. शेवटीं त्यांनीं उघड बंड आरंभिलें; राजाचा धाकटा भाऊ **एड्गर** नामें तेरा वर्षांचा होता. त्यास त्यांनीं आपला मुख्य करून उत्तरेकडच्या सर्व राज्याचा धनीपणा दिला. **एद्वी** राजानें आपलें सामर्थ्य

---

* आर्चबिशप ह्मणजे मुख्य धर्माधिकारी.

व आपले इष्ट, उत्तरोत्तर कमी होत चालिले असें पाहून राज्याचे विभाग केले; परंतु तो मग लवकरच
संन् ९५९ मृत्यु पावला; तेणेंकरून त्याचे शत्रूंचे मनोरथ सफळ झाले; आणि सर्व राज्य **एड्गरास** प्राप्त झालें

**महंताचे सामर्थ्यानें एड्गरास राज्य** मिळालें ह्मणून तो जें कांहीं करी तें त्याचे आज्ञेवांचून करीत नसे.

या राजाच्या कथेंत विशेष चमत्कार नाहींत, परंतु **एल्फ्रिडचें** आणि त्याचें लग्न कोणत्या युक्तीनें झालें ती गोष्ट मोठी विचित्र आहे, ह्मणून ती एथें सांगतों. **डेवन** प्रांताचे **अर्लाची** एक **एल्फ्रिडा** नामें मुलगी होती, तिच्या सौंदर्याची राजानें मोठी किर्त्ति ऐकिली, परंतु त्याविषयीं लोकांच्या गप्पांवर विश्वास ठेवावा हें त्यास चांगलें न वाटून, त्यानें आपला एक परमस्नेही **एथेल्वाल्ड** नामें होता त्यास तेथें पाठविलें; आणि सांगितलें कीं, जशी बातमी ऐकतों तशीच **एल्फ्रिडा** आहे कीं नाहीं, हें पाहून मला येऊन सांग. **एथेल्वाल्ड अर्लाचे** घरीं गेला, तेथें त्या मुलीला पाहातांच तिजविषयीं अत्यंत सकाम झाला. त्याला असा अतिशय काम उत्पन्न झाला कीं, आपले धन्याची आज्ञा लक्षांत न आणितां, त्यानें आपलेंच हित पाहिलें; आणि त्या सुंदरीचे बापाकडे तिला आपल्याकरितां मागितलें. तो राजाचा मित्र पडला ह्मणून त्यास नाहीं असें कोण ह्मणतो? **अर्लानें** होय ह्मटलें; आणि त्या दोघांचें लग्न गुप्तपणीं झालें. मग लवकरच त्यानें राजाजवळ येऊन सांगितलें कीं, त्या मुलीची इतकी कीर्त्ति व्हायाचें कारण संपत्ति आणि गुण. मला मोठें आश्चर्य वाटतें कीं, लोक तिच्या सौंदर्याचें उगीच इतकें वर्णन करितात– तें

ऐकून राजाची खातरी झाली, आणि त्यानें मग तिची कधीं गोष्ट पुनः काढिली नाहीं तेणेंकरून **एथेल्वाल्डा-च्या** मनास परम संतोष झाला. अशी लबाडी करून राजाच्या मनांतून ती गोष्ट अगदीं गेली असें पाहून, एके दिवशीं त्यानें **एल्फ्रिडेची** गोष्ट काढली. तो ह्मणाला, हे राजा, **डेवन** प्रांताचे **अर्लाची** मुलगी राजास योग्य नाहीं ही गोष्ट तर खरी; परंतु राजाच्या सेवकास ती प्राप्त झाली तर त्याचें मोठें दैव. ह्मणून मी आपणास प्रार्थना करितों कीं तिशीं लग्न करायास मला परमाणगी असावी. कारण, ती आपले द्रव्याची मालक आहे तेणेंकरून मी द्रव्यवान होईन. ही विनंती राजास चांगली वाटून, त्यानें त्यास मोकळीक दिली. मग तो आपले बायकोजवळ जाऊन फिरून उघडपणानें लग्न करिता झाला. तो तिला राजाच्या घरीं न येऊं द्यायाकरितां फार जपत असे. तो राजा स्त्री-लुब्ध आहे ह्मणून आपले बायकोस पाहून मोहित होईल, असें जाणून ती राजाच्या दृष्टीस न पडावी याकरितां त्यानें मोठी सावधगिरी राखिली होती. परंतु ती त्याची लुचाई फार दिवस गुप्त राहिली नाहीं. एके दिवशीं राजास तें सर्व वर्तमान समजलें; परंतु त्यानें त्या वेळेस आपला क्रोध आवरिला. पुढें एके दिवशीं, ती अमानुष सुंदरी जेथें होती त्या ठिकाणाजवळ सहज फिरायास जायाचा बेत त्यानें केला. **एथेल्वाल्डासही** बरोबर बोलाविलें; **एथेल्वाल्ड** मोठ्या संक-टानें गेला. राजा त्या ठिकाणीं जाऊन **एथेल्वाल्डास** बोलि-ला कीं, अरे, जिच्या सौंदर्याची मी पूर्वीं इतकी कीर्त्ति ऐकिली होती, अशी जी तुझी बायको, तिला एकदा पाहायाची माझी इच्छा आहे. तर तूं मला आपला मित्र ह्मणून तिजजवळ घेऊन

चल. ही गोष्ट ऐकतांच **एथेल्वाल्डाचें** काळीज थरथरलें. त्यानें राजाचा बेत मोडायाकरितां त्यास बहुत गोष्टी सांगितल्या; परंतु राजा ऐकेना. शेवटीं तो बोलिला, बरें, तर इतकें तरी करा कीं, मला पूर्वीं घरीं जाऊन येण्याची मोकळीक द्या, ह्मणजे मी तुमच्या येण्याची कांहीं तरतूद करून ठेवीन. राजानें त्यास घरीं जायास आज्ञा दिली. मग तो जाऊन आपले बायकोचे पायां पडला, आणि जी आपण लबाडी केली ती, सर्व तिच्याजवळ सांगता झाला; त्यानें तिची प्रार्थना केली कीं तूं आपलें सौंदर्य जितकें लपवेल तितकें लपीव. तें ऐकून **एल्फ्रिडेच्या** मनांत मोठा राग आला. कारण, तिला राज्य प्राप्त व्हायाचें होतें तें त्यानें बुडविलें; तथापि तिणें त्या वेळेस होय ह्मटलें; आणि तो गेल्यानंतर मोठ्या चतुराईनें अंगावर अळंकार घालून शरीर फारच सुशोभित केलें; पुढें तिच्या मनाप्रमाणेंच गोष्ट घडली. राजा तिला पाहातांच अतिशय मोहित झाला आणि तिला आपले घरीं न्यावी असा त्यानें निश्चय केला. मग त्यानें, आपली मसलत **एथेल्वाल्डास** कळूं नये ह्मणून मनांत उत्पन्न झालेला काम त्यास समजूं दिला नाहीं, आणि सहज रीतीनें निरोप घेऊन तेथून निघून गेला. त्याच्या मनांत **एथेल्वाल्डाचा** पुरेतपणीं सूड उगवावा असें पक्कें आलें ह्मणून थोडे दिवसांनंतर **एथेल्वाल्डास** कांहीं मोठे कामाचें निमित्त करून **नर्थंबर्लंडास** पाठविलें, आणि त्या वाटेंत एके रानांत त्याचें प्रेत सांपडलें. कित्तीएक ह्मणतात कीं राजानें त्यास आपले हातानें मारिलें. कित्तीएक ह्मणतात कीं राजानें त्यास मारावयाचा हुकूम मात्र दिला होता. हें कसेंही असो; परंतु मग लवकरच राजाच्या आ-

ज्ञेनें **एल्फ्रिडेस** राजगृहीं आणिली; आणि त्या दोघांचें मोठ्या उत्साहानें लग्न झालें.

हा राजा सोळा वर्षें राज्य करून तेहतिसावे वर्षी मृत्यु पावला. मग त्याचा पहिल्या बायकोचा **एड्वर्ड** नामें मुलगा होता तो राज्य करूं लागला. सन् ९७५

महंतांच्या वजनानें **एड्वर्डास** हें राज्य प्राप्त झालें. त्याचें नांव मग **मार्टिर*** असें पडलें होतें; तो राज्य करूं लागल्यापासून चार वर्षें जीवंत होता. त्याच्या राज्यांत कांहीं लिहिण्यासारिखा चमत्कार झाला नाहीं— त्याचा भयंकर आणि स्मरणीय असा मृत्यु मात्र फारच विलक्षण झाला. तो एके दिवशीं **कार्फ क्यासिटला**जवळ पारध करायास गेला होता, तेथें त्याची सावत्र आई **एल्फ्रिडा** राहात होती. त्यास वाटलें कीं तिला भेटून जावें हा आपला धर्म होय— मग तो एकटा तेथें गेला, आणि त्यानें तहान लागली ह्मणून कांहीं प्यावयास मागून घेतलें, तें पात्र त्यानें तोंडाजवळ धरलें होतें इतक्यांत, **एल्फ्रिडेच्या** एके चाकरानें येऊन त्यास पाठींत भोंसकलें. तें तिणें चाकरास अगोदरच शिकवून ठेविलें होतें— वार लागतांच तो घोड्यावर बसून पळत निघाला. त्याचे शरीरांतून रक्त वाहत होतें तेणेंकरून मूर्छित होऊन तो जिनावरून खालीं घसरला आणि त्याचा पाय रिकिबींत अडकला, त्यामुळें घोडा जिकडे जिकडे जाई तिकडे तिकडे तो लोंबत जाऊन शेवटीं मरण पावला. सन् ९७९

---

* मार्टिर शब्दाचा अर्थ साक्षी, परंतु या शब्दाची रूढी जो आपले धर्माकरितां मरतो त्याचे ठायीं आहे.

त्यानंतर दुसरा* **एथेल्रेड;** जो **एल्फ्रिडेच्या** ठायीं **एड्गरा**पासून झाला होता, तो राज्य करूं लागला. तो भोळा आणि अविचारी होता; त्यास राज्य करायाचें किंवा राज्याचा बंदोबस्त करायाचें सामर्थ्य नव्हतें. त्याच्या राज्यांत जे पूर्वींचे भयंकर शत्रु **डेन** लोक, ते दिवसोंदिवस पाय सरकावीत चालले. तो राजा भोळा होता आणि त्यास विशेष कशाचा अनुभव नव्हता ह्मणून, त्यांस पुनः दंगा आणि लूट करायास संधि सांपडली. ते **ब्रिटेन** बेटाचे कांठावरचे कितीएक ठिकाणीं येऊन उतरले, आणि दांडगाईनें लुटूं लागले.

**डेन** लोक **इंग्लिशां**मध्यें मिसळून होते ह्मणून **इंग्लिशांनीं** अशी मसलत केली कीं त्या सर्वांस एकदाच मारावें. **एथेल्रेडानें**ही चातुर्यानें सर्वांस मारायाची ती मसलत कबूल केली. अशी मसलत भोळ्या राजाचे राज्यांत क्वचित् घडते. ती त्यांनीं अशी गुप्त ठेविली होती कीं, **इंग्लंडा**मध्यें जितके **डेन** होते तितके सर्व एके दिवशीं मारले गेले तेव्हां फुटली. लुच्चाईनें ज्याचा बेत केला आणि जो निर्दयपणानें सिद्धीस नेला, असा जो हा सर्व वध, तेणेंकरून **इंग्लिश** निर्भय तर झाले नाहींच; परंतु त्यांचें दुःख उलटें अधिक वाढलें.

फार दिवसांचे शत्रूंच्या उपद्रवापासून आपली अशी सुटका झाली ह्मणून ते आनंदांत निमग्न होते, इतक्यांत, **डेनमार्क** देशाचा राजा **स्वेन** या नामें होता त्यास या लुच्चाईचें वर्तमान समजलें. तो क्रोधानें संतप्त होऊन बहुत

---

* पूर्वीं एथेल्रेड या नांवाच्या एके राजाची कथा सांगितली. हाही दुसरा त्याच नांवाचा झाला. पुढेंही सर्वत्र असेंच जाणावें.

गलबतें घेऊन **ब्रिटेनाचा** विध्वंस करावा या बेतानें पश्चि-मेकडच्या कांठावरून आला. त्या वेळेस **एथेल्रेड** राजा **नार्मंडी** प्रांतांत पळून गेला; मग सर्व देश **स्वेन** राजाच्या अमलाखालीं आला.

नंतर **केन्यूट**, ज्याचें प्रतिष्ठानांव मग **केन्यूट दिग्रेट** असें पडलें, तो **डेन्मार्काचा** राजा झाला; आणि **इंग्लंड** देशांत जी **डेन** लोकांची फौज होती तिचाहि धनीपणा त्यास प्राप्त झाला.— **एथेल्रेड** वारल्यानंतर त्याचे ठिकाणीं त्याचा मुलगा **एड्मंड ऐरन सैड***
झाला. मग **केन्यूट** आणि **एड्मंड** या दो- सन् १०१६
घांमध्यें युद्ध फार दिवस चालिलें होतें— पहिली लढाई समसमान झाली. दुसरींत **डेनांचा** जय झाला; तथापि **एड्मंड** राजाचा पुनः फौज मजवून लढाई करावी असा बेत पाहून, **डेनांचे** आणि **इंग्लिशांचे** सरदारांनीं कंटाळून आपआपले राजांकरवीं राज्याचे दोन भाग करून सला केला. **केन्यूट** राजानें राज्याचे उत्तरेकडील प्रदेश आपण घेतले आणि दक्षिणेकडचे **एड्मंड** राजास दिले. परंतु थोडे दिवसांनंतर **आक्सफर्ड** शहरांत **एड्मंड** राजास त्याचे दोघा चाकरांनीं मारिला, तेणेंकरून तें सर्व राज्य आपोआप **केन्यूट** राजाचे हातीं आलें.

**केन्यूट** राजा त्या काळचे लोकांत फार चांगला होता असें कितीएक ग्रंथकारांनीं वर्णन केलें आहे. ह्मातारपणांत ईश्वरभक्ति, आणि तारूण्यांत महान् शौर्य या गुणांविषयीं सर्व लोक त्याची प्रशंसा करीत असत. खुशामती

---

* लोखंडासारिख्या ज्याच्या कुशी तो. हें नांव त्याचे शौर्यावरून पडलें.

लोकांचें ह्मणणें असें पडत असे कीं, या राजाची शक्ति अबाधित आहे; आणि पंचमहा भूतादि वस्तूही याचे आज्ञे प्रमाणें वागतील. अशी लोक आपली खुशामत करितात हें समजून त्यानें त्यांची फजीती करायाकरितां ही युक्ति केली. एके दिवशीं भरतीचा समय पाहून त्यानें आपली खुर्ची समुद्रकांठीं नेऊन ठेवावास सांगितली, आणि आपण जाऊन तेथें बसला आणि बोलिला, "अरे समुद्रा, तुजवर माझी सत्ता आहे, मी ज्या भूमीवर बसलों आहे ती माझी आहे, तर मी तुला आज्ञा करितों कीं तूं पुढें येऊन धन्याचे पाय भिजविशील तर खबरदार." समुद्र आपली आज्ञा ऐकेल असा भरंवसा दाखवायाकरितां त्यानें कांहीं वेळपर्यंत आपण तेथें बसून दाखविलें. शेवटीं चोहोंकडून लाटा येऊं लागल्या तेव्हां आपल्या दरबारी लोकांस बोलिला कीं हें पाहिलेंत ना ! ईश्वर आणि सार्वभौम असें त्यासच ह्मणावें कीं ज्याचे आज्ञेंत समुद्र आणि पृथ्वी हीं दोनही वागतात. त्यापुढें मनुष्याचा पाड काय! अस्तु, लोक त्या राजाचें भय फार वागवीत; आणि त्याचे गुणांवरून त्याजवर प्रीतिही तशीच करीत असत. असा तो राजा बहुत वर्षेपर्यंत होता. पराक्रमावरून त्याचें नांव **केन्यूट दिग्रेट** असें पडलें होतें. परंतु त्याच्या गुणांसही तें योग्य होतें. तो एकुणीस वर्षें पर्यंत राज्य करून **साफ्टरचरींत** मृत्यु पावला.

संन् १०३५ त्यास तीन पुत्र होते. त्यांचीं नावें— **स्वेन, हारोल्ड, हार्डिकेन्यूट.** त्यांत **स्वेन, नार्व** देशाचें राज्य करूं लागला; **हार्डिकेन्यूट डेनमार्काच्या** तक्तावर बसला; आणि **हारोल्ड इंग्लंडांत** आपले बापाचे ठिकाणीं राजा झाला.

**हारोल्डा**नंतर त्याचा भाऊ **हार्डिकेन्यूट इंग्लंडांत** राज्य करूं लागला. तो राजा **डेन** आणि **इंग्लिश** या दोघांनींही कबूल केला. तो देशांतून आला तेव्हां त्याच्या लोकांनीं त्याचा मोठा आदर केला. परंतु त्या राजाचें अन्याय्य राज्य फार दिवस राहिलें नाहीं. तो राज्य करूं लागल्यापासून दोन वर्षांनीं एके **डेनिश लार्डाचें*** लग्न **लांबेथ** शहरांत झालें तेथें विशेष खाण्यापिण्यामुळें मृत्यु पावला. संन् १०३९

**डेनिश** राजाची अशी गडबड पाहून **इंग्लिशांहीं** एक **साक्सनी** वंशांतील पुरुष राज्यावर बसवावा असा निश्चय केला. आणि **एड्वर्ड**, ज्याचें प्रतिष्ठानाम सत्यवक्ता असें पडलें होतें, त्यास सर्वांचे संमतानें राजा केला.

**इंग्लिश** लोक फार दिवस परकी राजाच्या अमलाखालीं राहून कंटाळले होते, त्यांस, आपले जुने राजाचे वंशांतला राजा झाला हें पाहून, परम हर्ष झाला. तो **नार्मन** दरबारांत उत्पन्न झाला होता ह्मणून त्या देशाच्या चाली, नीति, आणि त्या देशचे लोक यांविषयीं त्यास मोठा अभिमान होता. त्यानें **गाड्विन** या नांवाचे पुरुषाची **एडैथा** ह्मणून मुलगी होती तिशीं लग्न केलें; परंतु जन्मवर त्यानें तिशीं कधीं संग केला नाहीं. त्याचें कारण, दांभिक ईश्वरभक्ति, किंवा तिचा द्वेष या दोहोंतून एक असेल. संन् १०४७

त्यास औरस पुत्र नव्हता. त्याचें राज्य फार दिवस चालिलें त्यामुळें, त्याचे मन कुतर्कांनीं व्याप्त झालें होतें; त्यानें पंचवीस वर्षें राज्य केलें; शेवटीं कांहीं रोग होऊन तो पां-

---

* लार्ड ह्मणून अमात्यांत शेवटची पदवी आहे.

सष्ठावे वर्षी जान्युआरी महिन्याचे पांचवे तारिखेस मृत्यु पावला.

त्यानंतर **गाद्विन** सरदाराचा मुलगा **हारोल्ड** नामें होता तो राज्य करूं लागला. त्याच्या युक्ति आणि गुण हीं पाहून तो राज्य करायास योग्य असें दिसत होतें ह्मणून त्यास राज्य प्राप्त व्हायास कांहीं विघ्न झालें नाहीं; परंतु अधिकार नसतां जें राजासन मिळविणें त्याचे मागें अवश्य प्राप्त होणारीं जीं संकटें त्यांपासून, त्या राजाचें रक्षण, शौर्य, नीति, आणि लोकप्रियता, या त्याच्या गुणांनीं केलें नाहीं— **नार्मंडी** देशांतील **ड्युक*** **उइलियम** या नामें एक पुरुष होता तो ह्मणूं लागला कीं, **एड्वर्ड** राजानें राज्य मला दिलें आहे तें भोगायास यास अधिकार नाहीं – ज्याचें प्रतिष्ठानांव विजयी असें पडलें होतें असा जो **उइलियम** तो **नार्मंडांचा राबर्ट** नामें **ड्युक** होता त्याचा पुत्र. त्याचे आईचें नांव **आर्लिट**, ती स्त्री **फालेइज** शहरांत फार सुंदर होती. ती एके दिवशीं **राबर्ट** वाटेनें जात होता त्यास पाहात दरवाजांत उभी राहिली होती, तिजविषयीं तो सकाम झाला— अशा रीतीनें जन्मला जो **उइलियम** तो थोरपणास चढला हा त्याचा जन्मगुण ह्मणावा, परंतु तो त्याच्या बुद्धीचाच गुण ही गोष्ट खरी. त्याचें शरीर बळकट, त्याची बुद्धी तीक्ष्ण आणि थोर, त्याचें शौर्य असें कीं, मोठा भयाचा प्रसंग पडला तरी तो घाबरत नसे. तो आपले बापाचे ठिकाणीं बसला त्या वेळेस लाहान होता तरी त्यानें बंडवाले लोकांवर चक्र बशिवला; आणि बाहेरून जे कोणी येऊन

* ड्युक ह्मणजे अमात्यांत पहिली पदवी आहे. हें पद वंशपरंपरेनें चालतें.

दंगा करीत असत त्यांचेंही निवारण केलें. तो सर्व कर्में आपलें तेज राखून नीतीनें करीत असे. आपलें राज्य असें स्वस्थ झालें पाहून तो उत्तरोत्तर अधिकाची इच्छा करूं लागला. सत्यवक्ता **एड्वर्ड** राजा, यानें आपलें राज्य कोणास द्यावें याविशीं शेवटीं कांहीं विचार योजिला होता, तो **उइलियमास** समजला, तेणेंकरून **इंग्लंड** देशांतलें राजासन आपणास प्राप्त व्हावें असा लोभ त्याच्या मनांत उत्पन्न झाला. **पोप** आणि दुसरे कितीएक लोक यांनीं त्यास राज्याचा अधिकार आहे असा आग्रह धरिला होता. **उइलियम** वास्तविक राज्याचा अधिकारी दिसत होता ह्मणून किंवा धर्मप्रकरणांतील अंमल अधिक वाढवावा या इच्छेनें, **पोप** असें बोलिला कीं, **हारोल्डास** राज्याचा अधिकार नाहीं.

अशा अनेक अनुकूळ गोष्टी घडल्यामुळें **उइलियमा**जवळ निवडक आणि युद्धास तयार अशी साठ हजार फौज जमा झाली. त्या फौजेस तीनशें गलबतांत बसवून ग्रीष्म ऋतूच्या प्रारंभीं तो **इंग्लंड** देशांत जायास निघाला, त्या वेळस वारा किंचित् प्रतिकूळ होता तेणेंकरून त्यास थोडासा प्रतिबंध झाला. तो **ससेक्स** प्रांतांत **पेवेन्सी** गांवांत येऊन स्वस्थ मनानें उतरला.

त्या समयीं **नार्वेजियन*** लोक मुलुखांत दंगा करीत होते त्यांस जिंकून, मोठ्या हर्षानें **हारोल्ड** राजा परत येत होता. त्यानें असा निश्चय केला होता कीं, राजपद द्यायाचा अधिकार लोकांकडे, तेव्हां त्यांनीं जी राजपदवी मला दिली ती मी सर्वस्व खर्चून राखीन. असा दृढ निश्चय

---

* नार्वे ह्मणून डेन्मार्काजवळ देश आहे तेथील लोक.

करून तो, जी बरोबर फौज नेली होती ती, आणि दुसरी देशांतून जितकी जमा झाली तितकी घेऊन येत होता. त्याच्या फौजेंतले लोक शूर, उद्योगी, थोर मनाचे, असे होते; त्यांची राजावर प्रीति होती; आणि त्यांस लढाई-विषयीं मोठी हौस; तिकडे **उइलियम** राजाची फौज कशी होती कीं जशी **युरोप** देशांतून निवडूनच काढली काय! त्यांस दुःख आणि श्रम यांची सवय पडून गेली होती. **ब्रिटेन बोलान**, **फ्लांडर्स**, **पाइटु**, **मेन**, **आर्लियन्स**, **फ्रान्स**, आणि **नार्मंडी** इत्यादि देशांतले लोक आपले इच्छेनेंच येऊन त्यास मिळाले होते. **इंग्लंड** देशाचे राजपदाकरितां लढाई करायास अशा दोहींकडच्या फौजा पूर्वीं कधीं सिद्ध झाल्या नव्हत्या, आणि त्यापुढेंही कधीं झाल्या नाहींत. लढाईच्या पूर्व दिवशीं राजा **उइलियमानें हारोल्ड** राजास सांगून पाठविलें कीं, तुमची आमची हातलढाई करून तंटा मिटवून टाकूं, ह्मणजे पुष्कळ लोकांचे प्राण वांचतील. ती गोष्ट **हारोल्डानें** मान्य केली नाहीं, आणि बोलिला, सैन्याचा नियंता ईश्वर आहे, तो मर्जीस येईल तसें करील. त्या रात्रीस दोनही सैन्यें एकमेकांचे समोर दृष्टीच्या टप्प्यांत अरूणोदयाची वाट पाहात तळ देऊन राहिलीं. **इंग्लिश** लोकांनीं ती रात्र गायनांत आणि खाण्यापिण्यांत घालिवली. **नार्मनांनीं** ईश्वराचें भजन आणि स्तव यांत घालिवली.

दुसरे दिवशीं सकाळचे दोन घटिका दिवसास दोनही सैन्यें तयार होऊन एकमेकावर चढून गेलीं.— **हारोल्ड** राजा आपले फौजेचे मध्यावर राहून पायीं चालिला होता; कारण, फौजेनें समजावें कीं आपल्या राजासही आपले सा-

रिखेंच भय आहे; आणि तीस अधिक धीर यावा. **उइलि-यम** घोड्यावर बसून आपली फौज चालवीत होता. त्याचे देशांत एक मोठा **रोलंड** या नांवाचा शूर पुरुष झाला होता, त्याची कीर्त्ति गात गात त्याचें सैन्य चालिलें होतें– **नार्मन** लोक धनुष्यांनीं लढाई करूं लागले, तें पाहून **ब्रिटन** लोकांस मोठें आश्चर्य झालें, आणि त्यांच्या रांगा जवळ जवळ असत ह्मणून बाणांनीं त्यांचा पुष्कळ नाश होऊं लागला; परंतु ते अगदीं नजीक येऊन ठेपले त्या वेळेस **इंग्लिश** लोक आपले परशूंनीं त्यांचा नाश करूं लागले. तेव्हां **नार्मन** फौजेंत जिकडे तिकडे धांदल झाली, असें राजा **उइलियमानें** पाहिलें; आणि तो आपल्या सैन्याचा नाश जवळ आला असें पाहून बरोबर कांहीं निवडक मंडळी घेऊन सैन्यास राखायाकरितां गेला. तेणेंकरून सैन्यास धीर आला. तो जिकडे तिकडे शत्रूंच्या रांगा मोडायाविषयीं उद्युक्त असा दिसत होता. त्याच्या खालचे तीन घोडे ठार मेले. **इंग्लिश** लोकांचें सैन्य अभेद्य पाहून, त्यानें शत्रूंस ठकवायाकरितां पड घेतली असें दाखविलें, तें पाहातांच लागलेंच **इंग्लिशांचे** सैन्याच्या रांगा अस्ताव्यस्त झाल्या. तेव्हां **उइलियम** राजानें ती संधि साधली; त्यानें खूण करितांच लागलेंच त्याचे लोक पहिल्यापेक्षां अधिक आवेशानें लढाई करूं लागले; त्यांनीं **इंग्लिशांची** फळी फोडली; आणि त्यांचे पाठीस लागले. अशा विपत्ति समयांतही **हारोल्ड** राजा या रांगेंतून त्या रांगेंत फिरून आपल्या फौजेस धीर देऊन त्यांस बंदोबस्तानें उभे करी, असें दिसत असे. असें त्यानें सारा दिवसभर केलें, आणि

रात्रींच्या प्रारंभीं **केंटिश*** लोकांपुढें उभा राहून त्यांस यथास्थित उभे करीत होता. इतके श्रम करूनही तो थकला नाहीं– या रीतीनें पुनः एकवेळ **नार्मनांचा** पराजय घडावा असा योग दिसूं लागला– त्यांचे पुष्कळ लोक पडले– या रीतीनें जेव्हां जेव्हां सैन्याचें धैर्य सुटत असे, तेव्हां तेव्हां त्या दोन सरदारांचें शौर्य आणि स्थिर प्रतिज्ञा यांहींकरून ती लढाई पुनः पुनः चालू होई; शेवटीं शौर्यानें जी लढाई संपेना ती दैवानें संपली. **नार्मनांचे** हत्यारबंद पायदळावर चढून **हारोल्ड** राजा आपले फौजेसहित जात होता, इतक्यांत त्याचे डोक्यास बाण लागून तो मृत्यु पावला; आणि त्याचे दोन शूर भाऊ त्याचे बाजूस लढाई करीत होते त्यांचीही अवस्था तशीच झाली. त्याच्या हातांत तरवार होती तीसहित तसाच तो प्रेताचे ढिगांत पडला होता; लढाई संपल्यानंतर राजाचें प्रेत कोणतें हेंही समजायाचें कठिण पडलें.

याप्रमाणें **नार्मनांचा** जय होऊन, **इंग्लंड** देशांत जें **साक्सनांचें** राज्य सहाशें वर्षांपर्यंत चालिलें होतें त्याची समाप्ति झाली.

## प्रकरण ४.

## उइलियम दि कांकरर[†] राजाची कथा.

राजा **उइलियम**, **वालिंगफोर्ड** शहराजवळ **टेम्स** नदी उतरून येतो आहे, इतक्यांत **स्तैगंड** नामें **प्रेमेट**

---

* केंट प्रांतांतले लोक.

† कांकरर ह्मणजे विजयी. त्याचा इंग्लंडांत जय झाला ह्मणून त्यास हें नांव पडलें.

ह्मणजे मुख्य धर्माध्यक्ष होता, तो त्यास भेटून बोलिला कीं, आह्मी धर्माचे सर्व अधिकारी तुला अनुकूळ आहों. मग तो राजा शहराजवळ दृष्टीच्या टप्यांत येऊन पोहोंचला तंव, तेथील सर्व मुख्य सरदार त्याचे लश्करांत गेले, आणि बोलिले कीं, आह्मी तुझ्या आज्ञेत वागायास सिद्ध आहों. मग जें राज्य आपले पूर्वजांतून कोणासहीं बहुत लढाया केल्यावांचून प्राप्त झालें नाहीं, तें आपण स्वल्पायासेंकरून साध्य केलें; हें पाहून **उइलियम** राजास मोठा हर्ष झाला.

त्याच्या राज्यप्राप्तीस सशास्त्रता यावी, ह्मणून **यार्काच्या आर्चबिशपानें वेस्तमिनस्तर** शहरांत त्यास राज्याभिषेक केला. त्या समयीं त्यानें **डेन** आणि **साक्सन** लोक या दोघांच्या चालींप्रमाणें शपथ घेतली; ती अशी कीं, मी धर्मपक्ष यथास्थित रक्षण करीन; राजाच्या रीतीप्रमाणें वर्तेन; आणि पक्षपातावांचून राज्यकारभार करीन. असें राज्य संपादन करून तो, प्रताप आणि दया या दोन गुणांहींकरून **इंग्लिशांस** वश्य करिता झाला. मग पुनः एकवेळ आपले देशीं जाऊन पुरातन प्रजांपासून प्रशंसा आणि आनंद यांचा अनुभव घ्यावा, असें मनांत आणून तो तेथें जाता झाला.

राजा **उइलियम** स्वदेशीं गेला तेणेंकरून **इंग्लंडांत** मोठा अनर्थ झाला. तो असा— राजाचे सेवकांनीं, प्रतिबंध नाहींसा झाल्यामुळें, प्रांतांत दंगा आरंभिला; आणि **इंग्लिश**ही निर्भय होत्साते, आपला स्वतंत्रपणा साध्य करायास राजा एथें नाहीं ही चांगली संधि आहे, असें समजून उद्योग करूं लागले.

त्या समयीं **इंग्लिशांनीं** असा कावा केला होता कीं

**आश्वेडनिसडेचे*** दिवशीं देवसेवेचे वेळेस सर्व **नार्मन** लोक हत्यारें ठेवतील; त्या वेळेस, सर्वांस मारून टाकावें. इतक्यांत स्वदेशाहून **उइलियम** आला ह्मणून, ती त्यांची मसलत फसली गेली. तेव्हांपासून तो **इंग्लिशांचा** विश्वास मानीनासा झाला, आणि मनांत पक्कें समजला कीं, हे आपले नेहमीचे शत्रु होत; यांच्या मनांतला द्वेष कधींही जायाचा नाहीं. त्यानें राज्यांत बहुत किल्ले बांधिले होते, आणि **इंग्लिशांची** एक जूट नव्हती, तेणेंकरून अकस्मात् येऊन ते एखादी गडबड करितील, याचें त्यास भय नव्हतें. त्यानें पाहिलें कीं, या लोकांची दया करून फळ नाहीं; यांस निर्दयपणानें वागविलें पाहिजे; तर आतां आपण आपला व आपले लोकांचा स्वार्थ साधायास प्रवृत्त व्हावें; आणि जे कोणी प्रतिबंध करितील त्यांचा उपशम करावा. मग तो साधारणां† **इंग्लिशांचीं** वतनें जप्त करून उदारपणानें आपले **नार्मनांस** देऊं लागला. या रीतीनें सर्व जुने प्रतिष्ठित गृहस्थ भिकेस लाविले, तेणेंकरून **इंग्लिशांस** प्रतिष्ठा आणि थोरपणा प्राप्त व्हायाची कोणतीच वाट राहिली नाहीं.

आतां धर्माध्यक्षही आपल्यास अनुकूळ असावे, ह्मणून धर्मप्रकरणीच्या मुख्य मुख्य स्थानीं तो आपले देशचे लोक ठेवूं लागला. **स्तैगंड** नामें **क्यांटबेरीचा आर्चबिशप**

---

* फेब्रुआरी महिन्यांत एक बुधवार येतो त्याचें नांव. तो इंग्लिशांचा भजन करायाचा दिवस असतो.

† इंग्लंडामध्यें लोकांच्या स्थिती तीन गणिल्या आहेत; उत्तम, साधारण, आणि निकृष्ट. या स्थिती संपत्तिमूलक आहेत.

होता असें पूर्वीं सांगितलें, त्यास त्यानें कांहीं अल्पस्वल्प निमित्तावरून पदच्युत केलें.

या प्रकारें कितीएक बंडें मोडून, द्वेष्टे होते त्यांचें शासन करून, राजा **उइलियम** आपलें राज्य निर्भय करिता झाला. मग त्यानें असा बेत केला कीं, आपण इतके दिवस श्रम केले; अतःपर स्वस्थ बसून सुखाचा अनुभव घ्यावा. त्यास वाटलें कीं आपले उत्तरवयीं तरी राज्यांत स्वास्थ्य आणि समृद्धि हीं पूर्णपणें राहातील. परंतु मनुष्याचे आशेवर कांहीं प्रमाण नाहीं, याची प्रचीती **उइलियम** राजाची कथा पुढें लिहिली आहे त्यावरून स्पष्ट येते. जे शत्रु होतील असें त्याचे गांवींही नव्हतें, तेच त्यास शत्रु झाले; तेणेंकरून त्याचे वयाचा शेवट कडू झाला. शेवटीं त्यास स्वपुत्रांपासूनच खेद प्राप्त झाला; त्यांस आडवें येऊन यास कीर्तीची किंवा द्रव्याची आशा नव्हती. त्या **उइलियम** राजास पुत्र तीन होते. त्यांचीं नांवें, **राबर्ट**, **उइलियम** आणि **हेनरी**; तशाच कितीएक मुलीही होत्या. त्याचा वडील मुलगा **राबर्ट**; त्याचे पाय आखूड ह्मणून त्याचें नांव **कर्थोस** असें पडलें होतें. तो आपले वडिलासारिखाच शूर होता; परंतु त्याचे अंगीं शाहाणपणापेक्षां दांडगेपणा विशेष होता— तो आपले भाऊ **उइलियम** आणि **हेनरी** यांचा द्वेष करीत असे. त्या दोघांनीं यत्न करून बापाचा विश्वास आणि प्रीति संपादिली होती, ह्मणून **राबर्ट** त्यांशीं फारच वांकडा चाले— या प्रकारचें त्याचें मन दुष्ट असे— नंतर त्यानें लवकरच कांहीं निमित्तें करून त्यांशीं उघड तंटा आरंभिला. तो असा, ते तिघेजण एके दिवशीं गाडीवर खेळत असतां धाकट्या दोघांनीं

मस्करींनें असा बेत केला कीं, **राबर्ट** एथून खालीं निघून जाऊं लागला ह्मणजे त्याचे डोक्यावर पाणी टाकावें. मग त्यांनीं तसें केलें. **राबर्टाच्या** मनांत पहिल्यापासून वांकडें होतेंच; ह्मणून त्यानें मस्करीचें खऱ्यावर नेलें; तेथें एक त्याचे कृपेंतला मनुष्य होता, त्यानें त्यास अधिकच चिडिवलें; मग तो हातांत तरवार घेऊन सूड घ्यावा या मसलतीनें माडीवर गेला; तेव्हां लागलीच सर्व किल्ल्यांत गडबड झाली. त्या वेळेस कसें तरी करून तो त्याचा राग राजा **उइलियमानें** शांत केला; परंतु तेव्हांपासून कुटुंबांत जी वरकस लागली ती त्याचे हातून पुढें कधींही मिटली नाहीं. मग **राबर्ट** कितीएक बरोबर लुचे सोबती घेऊन, त्याच रात्रीस **रोएन** किल्ल्यावर हल्ला करायास गेला, परंतु तेथील अम्मलदार होता, त्यानें तो त्याचा बेत चालूं दिला नाहीं.

अशी घरचे घरांत आग पेटल्यावर **नार्मंडी**, **मेन**, **आंजु** आणि **ब्रिटनी**, एथील मोठमोठे लोकांनीं **राबर्टाचा** पक्ष धरिला. इतका तो भला आणि लोकांस प्रिय होता. कथा अशी आहे कीं, त्याची आई त्यास चोरून हुंड्या पाठवी, आणि त्याचे बेतास आंतून अनुकूळ असे. ही गडबड बहुत दिवस चालिली होती; तेणेंकरून **नार्मन** राज्यांत फार बखेडा पडला; ह्मणून राजा **उइलियम** शेवटीं आपल्या मुलाचा पराजय करायास **इंग्लिशांची** फौज जमा करून **नार्मंडी** प्रांतांत गेला. तेथें युद्ध करून त्यानें **राबर्ट** आणि त्याचे साथी यांस पळविलें.

हें काम संपवून राजा नुकताच रिकामा झाला; इतक्यांत, त्यास दुसरें एक मोठें दुःख झालें. त्याची राणी **माटिल्डा** होती ती मृत्यु पावली. विपत्ति यावयाची झाली,

ह्मणजे सर्व दुःखें एकदांच प्राप्त होतात. त्यानें दुसरी एक बातमी तेव्हांच ऐकिली कीं, उत्तरेकडील राज्यांत दंगा चालिला आहे. तें ऐकून तो **ब्रिटेन** बेट सोडून त्या देशांत गेला; त्या वेळेस त्यास समजलें कीं त्या दंगा कराणारांस **फ्रान्स** देशचे राजाचा आंतून आश्रय आहे. त्या राजानें अशी मसलत केली होती कीं, **नार्मनांच्या** प्रांतांतले मोठमोठे लोकांत वैमनस्यें पाडून **नार्मनांचा** अंमल कमी करावा; तसाच त्यानें **उइलियमाशीं** कांहीं थट्टेचा व्यवहार केला, तेणेंकरून त्यास फारच वाईट वाटलें. **उइलियमाचें** पोट मोठें होतें, तन्निमित्त तो कांहीं दिवस दुखण्यांत पडला होता. तेव्हां **फ्रान्साचा** राजा **फिलिप** ह्मणत असे, कीं **उइलियम** राजा बाळंत झाला आहे. तेणेंकरून **उइलियमास** बहुत क्रोध आला. मग त्यानें त्यास निरोप सांगून पाठविला कीं, मी बाळंत झालों आहें, तो लवकर हिंडूं फिरूं लागेन आणि प्रथम देवाचे पायां पडायास जाईन त्या वेळेस बहुत दिवे लावून सर्व **फ्रान्स** देश जाळून टाकीन. ही धमकी दिली ती सिद्धीस न्यायाकरितां त्यानें सैन्य जमा केलें, आणि **ऐल आफ फ्रान्स** प्रांतांत शिरून सर्व खेडीं जाळिलीं, आणि **मांट** शहर घेऊन तें धुळीस मिळविलें. या लढाईची वृद्धि पुढें झाली नाहीं. याचें कारण **उइलियम** राजाचा मृत्यु. तो असा झाला कीं, **उइलियम** राजा घोड्यावर बसून जात असतां घोड्याचें पाऊल ऊन राखेंत पडलें. तें भाजतांच घोडा अकस्मात् उधळला, आणि राजा पुढें पडला, आणि फार जखमी झाला. तेणेंकरून पुढें लवकर **रोएन** शहराजवळ एके खेड्यांत तो मरण पावला.

# प्रकरण ५.

## उइलियम रूफस राजाची कथा.

राजा **उइलियमाचा** पुत्र त्याच नांवाचा होता. त्याचे केसांचे तांबड्या रंगावरून त्याचें नांव **रूफस** पडलें होतें. राजा **उइलियमानें** आपले मृत्युपत्रांत* असें लिहून ठेविलें होतें कीं, माझ्यानंतर **उइलियमानें** राज्य करावें. त्याप्रमाणें तो **उइलियम इंग्लंडांत** राज्य करूं लागला. ते वेळेस त्याचा वडील भाऊ **राबर्ट नार्मंडी** देशांतलें राज्य करीत होता. राजानें आपले मुलांस असे राज्याचे विभाग करून दिले, ही गोष्ट **नार्मन** देशचे सभासदांस पहिल्यापासूनच वाईट वाटली होती. त्यांच्या मनांत असें होतें कीं पूर्वीप्रमाणें राज्य एकानें करावें. **राबर्ट** राजास सारे राज्याचा अधिकार आहे असें त्यांचें मत होतें. मग त्यांनीं **उइलियम** राजावर मोठें बंड केलें, त्यांत मुख्य राजाचा चुलता **ओदे** नामें होता.

असा भयंकर प्रसंग आला हें समजून, राजा **उइलियम इंग्लिश** लोकांची प्रीति संपादन करायाचा उद्योग करूं लागला. त्यांस त्यानें वचन दिलें कीं, तुह्मीं माझा पक्ष धरिला, तर पुढें मी तुमचा ममतेनें प्रतिपाळ करीन, आणि तुह्मांवर कृपादृष्टी ठेवीन. मग तो लवकरच सिद्ध होऊन लढायास गेला. त्यानें पुष्कळ फौज जमा केली होती. तो लोकांस असें दर्शवी कीं, जो कोणी मला रा-

---

* विलायती लोकांत अशी चाल आहे कीं, मरण समयीं एक पत्र करून ठेवावें; त्यांत आपली संपत्ति इत्यादिकांची व्यवस्था कशी करावी हें लिहिलें असतें.

ज्याचा अधिकार नाहीं असें ह्मणेल, त्याचा मी नाश करीन. त्या वेळेस **राबर्ट** राजानें जे कोणी आपले मित्र होते त्यांचे कुमकेकरितां फौज ठेवण्यास पैसा खर्चावा, तसें न करून निरुपयोगी कामांत आपलें द्रव्य घालविलें, आणि लोकांस उगीच इनामें दिलीं, असें केल्यामुळें त्याचें येणें संकेताप्रमाणें झालें नाहीं. इकडे **उइलियम** राजानें आपला भाऊ यावयाचे पूर्वींच सर्व बंडें मोडून टाकायाचा उद्योग आरंभिला. त्यास असें करायास विशेष कठिण पडलें नाहीं. कारण, बंडवाल्यांनीं **राबर्टाच्या** सांगण्यावरून कितीएक किल्ले घेतले होते खरे, परंतु राजाशीं प्रसंग पडतांच भिऊन ते त्यास शरण गेले. त्यानें त्यांस जीवदान दिलें, परंतु त्यांची सर्व संपत्ति जप्त करून त्यांस राज्याचे पार घालविलें.

कांहीं दिवसांनंतर त्या दोघां भावांमध्यें एक दुसरा तंटा झाला, तेणेंकरून **उइलियम**, **राबर्टाचें** राज्य अधिकच चापीत चालिला. अशीं बंडें होत त्यामुळें राजास द्रव्य बहुत प्राप्त होत असे. असें जें कांहीं आपण मिळवी तें तो आपले खासगीचे खर्चास लावी.

असे लहानसान बखेडे, आणि निरुपयोगी बंडें, हीं सर्व त्या वेळेस एक परम स्तुत्य आणि विचित्र अशी गोष्ट झाली तिचे खालीं झांकलीं गेलीं. ती गोष्ट अशी, **जिरुसिलम*** शहर त्यावेळेस धर्मबाह्य लोकांचे हातीं होतें; आ-

* एशू क्रिस्त, ज्यानें इंग्लिश लोकांचा धर्म प्रवृत्त केला, त्याचा अंतकाळ जिरुसिलम या नामें एशिया खंडांत सिरिया देशांत एक शहर आहे, तेथें झाला ह्मणून त्या शहरास क्रिस्तियन लोक, पुण्यक्षेत्र असें मानितात आणि तेथें यात्रेसही जातात.

णि तेथचे राहाणारे, **क्रस्ताचे** मतानुसारी लोकांस दुःख देत असत. त्या पुण्यस्थानीं पापी लोकांचा अंमल असावा ही गोष्ट फार वाईट, असें मनांत आणून त्या वेळेस सर्व **क्रिस्तियन** राजे व इतर जन यांनीं त्या लोकांवर चढून जाऊन, तें शहर घ्यायाचीं मसलत केली होती. तीं जीं युद्धें झालीं त्यांस **क्रुसेड*** ह्मणतात. तो उद्योग करायाची गोष्ट लोकांचे मनांत प्रथम येण्यास कारण असें झालें. **पीटर** ह्मणून कोणीएक महंत होता, त्याचा जन्म **पिकर्डी**† प्रांतांतले **एमियनस** शहरांत झाला होता. तो मोठा भक्तिमान्, धीर, आणि आस्थावान् असे. तो **जिरुसिलमाचे** यात्रेस गेला होता; त्या वेळेस तेथील अंमलदार धर्मबाह्य लोक **क्रिस्तियनांस** परम दुःख देत, असें पाहून त्यास फार वाईट वाटलें.

मग तो **पोपाच्या** आज्ञेनें सर्व **युरोप** देशांत त्या लोकांशीं युद्ध करावें ही गोष्ट बनावून सांगत फिरला. तेव्हां सर्व लोक मोठ्या उत्साहानें युद्धास तयार झाले. त्यांनीं आपले उजवे बावळ्यावर धर्माची खूण **क्रुस**‡ ह्मणून एक धारण केली. यद्यपि सर्व **युरोप** देशांत अशी धर्माविषयीं आस्था उत्पन्न झाली होती, तथापि लोक आपला स्वार्थ केवळ विसरले नव्हते. तें असें कीं, कितीएक लोक **एशिया** खंडांत आपण राहिलों असतां सुख पावूं या इच्छेनें, आपलें

---

* क्रुसेड ह्मणजे धर्म राखायाकरितां पापी लोकांशीं जें युद्ध तें. यास पुण्ययुद्ध असेंही नांव ठेविलें आहे.

† पिकर्डी प्रांत फ्रान्स देशांत आहे.

‡ क्रुस ह्मणजे या आकाराची खूण. या आकाराचे काष्ठावर एशूक्रस्तास फांशीं दिला ह्मणून ही क्रिस्तियन लोक धारण करितात.

सर्वस्व विकून जो थोडा बहुत पैका आला तो घेऊन स्वस्थ बसले. कांहीं राजांनींही हा उद्योग मनावर घेतला, त्यांत **नार्मंडीचा ड्युक राबर्ट** होता. त्या युद्धाचा बेत त्याच्या मर्जीस आला. कारण, तो शूर असून निर्धन; कीर्त्ति मिळवायाविषयीं उत्सुक; आणि दंग्यामुळें कंटाळलेला असा होता; तशीच त्यास फारफेर करायाची फार आवड असे. त्यानें लढाईचा बेत केला; परंतु पैका पाहिजे तो त्याजवळ नव्हता, ह्मणून त्यानें आपला भाऊ **उइलियम** याकडे बोलणें लाविलें कीं, मी आपलें राज्य तुह्माजवळ गहाण ठेवितों, तुह्मी मला दाहा हजार **मार्क*** द्यावे. **उइलियम** राजा त्याचें राज्य घ्यायास संधि पाहात होता, त्यास हें बरेंच झालें; मग त्यानें त्या रीतीनें **राबर्टाचें** राज्य आपले हाताखालीं घातलें.

**मेन** आणि **नार्मंडी** मुलूख प्राप्त झाले, तेणेंकरून राजाचें राज्य अधिक वाढलें खरें, परंतु त्याचें सामर्थ्य वृद्धि पावलें नाहीं. याचें कारण, त्याच्या नव्या राज्यांतील लोक जुन्या प्रजांपेक्षां विशेष स्वतंत्रपणानें वागणारे असे होते. त्या लोकांस आज्ञा केली असतां, ती न ऐकतां, ते कज्या करीत. याकरितां बहुत बखेडे आणि बंडें उत्पन्न झालीं, तीं सर्व त्यानें मोडिलीं. तो एक बंड मोडी इतक्यांत दुसरें उत्पन्न होई. या रीतीनें त्यास स्वस्थता नाहींशी झाली.

या सर्वांचा उपशम करून, स्तुति आणि निंदा या दोहोंची खातर न बाळगितां **उइलियम** राजा आपलें राज्य वाढवीत चालिला. हें असेंच आहे कीं ज्याची दृष्टि स्वार्थ

* मार्क ह्मणून एक नाणें त्या वेळेस होतें. त्याची किंमत सुमारें सांप्रतचे विलायती दोन पौंड होती.

साधण्याकडे असते तो लोकांच्या स्तुतीची किंवा निंदेची परवा करीत नाहीं. त्याचे राज्य मिळवायाचे उपाय दोन होते; एक खरेदी, आणि दुसरा लढाई. **पाइटियर्स** आणि **गइन** या मुलखांतले **अर्लानें** धर्म युद्धास जायाचे मसलतीनें पुष्कळ फौज जमविली होती; परंतु तो उद्योग करायास पैका पाहिजे, तो त्यापाशीं नव्हता, म्हणून त्यास **उइलियम** राजाचे साहाय्याचें कारण पडलें. राज्य गहाण ठेविलें असतां, प्रजेचें काय होईल, हा विचार मनांत न करितां तो **उइलियम** राजाजवळ आपलें सर्व राज्य गहाण ठेवायास सिद्ध झाला. **उइलियम** लोभी होताच, त्यानें तें लागलेंच गहाण घेतलें. असा मातबर मुलूख त्याचेजवळ विश्वासानें ठेविला, तो घ्यायाकरितां राजानें गलबतें व फौज तयार केली होती. परंतु पुढें कांहींएक सहज गोष्ट घडली त्यामुळें त्याचे सर्व लोभाविष्टतेचे उद्योग तसेच राहिले. ती गोष्ट अशी, **न्यूफारेष्ट** रानांत **सरवाल्टर टिरेल** या नांवाचा कोणीएके ग्रहस्थानें हरिणीवर एक बाण टाकिला, तों तो चुकून राजाचे काळिजास लागला, तेणेंकरून तो तत्क्षणीं गतप्राण होऊन खालीं पडला. त्या वेळेस तो **सरवाल्टर** अतिशय भय पावून, घोड्यास टांच लावून पळाला; आणि गलबतांत बसून **फ्रानस** देशांत गेला; तेथून पुण्ययुद्धाकरितां लोक **जिरुसिलमास** निघाले होते, त्यांबरोबर तोही गेला.

# प्रकरण ६.

## प्रथम हेनरी राजाची कथा.

### याचें प्रतिष्ठानांव **बोक्लार्क*** असें होतें.

संन् ११०० पासून ११३५ पर्यंत.

**उइलियम** राजा मेला त्या वेळेस त्याचा कनिष्ठ बंधु **हेनरी न्यूफारेष्टांत** पारध करीत होता. त्यानें लागलीच ती संधि साधिली. त्यानें मोठ्या त्वरेनें **विंचेस्तर** शहरांत जाऊन प्रथम जामदारखान्याचा बंदोबस्त केला. कारण, त्यास ठाऊक होतें कीं, द्रव्यानें जसा आपला मतलब सिद्ध होईल, तसा दुसरे कशानें होणार नाहीं. नंतर त्यास सर्व सरदार व इतर लोक अनुकूळ झाले; कां कीं, त्याशीं विरुद्ध व्हायास कोणास शक्ति नव्हती, आणि त्यांनीं तसें केलें नसतें तर मोठा अनर्थ झाला असता.

**हेनरी** राजानें आपणावर लोकांची कृपा व्हावी याकरितां जे कोणी आपल्या भावाचे वेळचे हलके कारभारी होते त्यांस दरबारांतून काढून लाविलें. तथापि एक गोष्ट अशी राहिली होती कीं, तेवढी झाली ह्मणजे त्याचें राज्य निर्भय व्हावें.— ती अशी, **इंग्लिश** लोकांची त्या काळींही **साक्सन** राजांवर भक्ति होती. पुरातन **साक्सन** राजे पदच्युत झाले, ही गोष्ट **इंग्लिशांचे** मनांत मोठी वाईट वाटत असे. त्या **साक्सन** राजांचे वंशांतील कितीएक मनुष्यें जीवंत होतीं, त्यांत एक **माटिल्डा** नामें **एड्गर आथेलिं**-

* बोक्लार्क, ह्मणजे लिहिण्यामध्यें अति कुशळ, त्याचें विद्येकडे अतिशय लक्ष असे, ह्मणून हें नांव त्यास पडलें होतें.

**गाचे** भावाची मुलगी होती. ती मठांत वाढली ह्मणून वास्तविक तिनें राज्याचा अभिमान सोडून वैराग्य धरिलें होतें. ती महंतीण* झाली होती. त्या वेळेस राजाच्या मनांत आलें कीं, इला आपण वरिली तर **साक्सनांचें** आणि **नार्मनांचें** फार दिवसांपासून जें वैमनस्य आहे तें मिटेल. परंतु त्यास प्रतिकूळ इतकेंच होतें की, ती एक वेळ महंतीण झाल्यामुळें तिशीं लग्न करितां येईना. असें असतांही त्याचे मंत्र्यांस त्याचा पक्ष होता ह्मणून, त्यांनीं, तिशीं लग्न केल्यास चिंता नाहीं, असें त्यास सांगितलें.– **माटिल्डेस** लग्न करायास अधिकार आहे अशी गोष्ट ठरल्यावर, त्या दोघांचें लग्न मोठ्या उत्साहानें झालें.

**राबर्ट** राजा **जिरुसिलमास** गेला होता तो परत आला; आणि आपलें मूळचें राज्य घेऊन **इंग्लंडाचे** प्रभुत्वाविषयीं बखेडा करूं लागला. **हेनरी** राजानें त्याशीं प्रथम स्नेहाचें बोलणें लाविलें. मग असें ठरलें कीं, **हेनरीनें** त्यास अमुक द्रव्य दिलें ह्मणजे **राबर्ट** राजाचा **इंग्लंडाचे** राज्यावर कांहीं संबंध नाहीं; आणि त्या दोघां भावांतून एक जर निपुत्रिक मेला तर, दुसऱ्यानें त्याचें राज्य घ्यावें– असा तह ठरल्यानंतर, उभयपक्षांनीं आपआपले सैन्यास निरोप दिला. पुढें **राबर्ट** राजा आपले भावाजवळ दोन महिनेपर्यंत परम प्रीतीनें राहून आपल्या राज्यास जाता झाला.

**राबर्ट** राजा मूर्खपणामुळें राज्य करावयास योग्य नव्हे, असें मग लवकरच दिसून आलें. तें असें, तो काम कारभा-

---

* लग्न करूं नये असा निश्चय करून नेहमी मठांत राहावें, अशी पूर्वी चाल होती; अशा पुरुषाचें नांव महंत. आणि अशा स्त्रीचें नांव महंतीण.

राविषयीं अतिशय अनुत्सुख होता; त्याचें लक्ष विषय सुख भोगण्याकडे फारच असे; आणि त्याचे सेवक त्यास फार लुटीत असत तें त्याचे ध्यानांतही येत नसे. एखादे समयीं असें घडे कीं, त्याचीं वस्त्रें चोरून नेल्यामुळें तो सारा दिवस निजून राही. त्याच्या अव्यवस्थित प्रकृतीपासून जें त्यास दुःख होई, त्यापेक्षां प्रजांस विशेष होत असें; कारण, त्या वेळेस लबाड आणि लोभी अशा लोकांच्या हातीं राज्य होतें; तें ते निर्दयपणानें लुटीत असत. असा त्या वेळेस जुलूम चालिला होता. या संकटामुळें **नार्मन** लोक **हेनरी** राजास शरण गेले; त्यांस असें वाटलें कीं, जसा तो आपलें राज्य नीतीनें करितो आहे, तसेंच आमचे देशचें राज्य करील; तेणेंकरून आह्मी सुख पावूं. त्या लोकांस दुःखापासून मुक्त केलें असतां आपलें हितच होईल; असें जाणून **हेनरी** राजानें त्यांस सांगितलें की चिंता करूं नका, तुमचीं संकटें मी निवारण करीन. असें त्यांस वचन देऊन त्यानें दुसरे वर्षीं मोठी फौज घेऊन **नार्मंडी** देशास जाऊन मोठमोठीं शहरें घेतलीं. दुसऱ्या लढाईंत **राबर्टाचे** सैन्याचा अत्यंत पराजय केला, आणि त्यास धरून आपल्या कैदेंत ठेविला. त्या राजाबरोबर दाहा हजार फौज, आणि त्याची सर्व थोर थोर हितकारी मंडळी धरली गेली. हा विजय झाल्यानंतर सर्व **नार्मंडी** प्रांत **हेनरी** राजाचे स्वाधीन झाला. मग तो आपला बंदिवान भाऊ यास बरोबर घेऊन **इंग्लंड** देशास गेला. ज्या **राबर्ट** राजानें आपलें सारें वय शौर्य, औदार्य, आणि सत्यवचन, यांत घालविलें होतें, त्याची त्या वेळेस अशी अवस्था झाली कीं, बापाचे वेळच्या राज्याचा विभागही त्यास न मिळतां,

उलटा परतंत्रपणा प्राप्त झाला. त्याचें मन आपल्याविषयीं पूर्वीं कसें निर्दुष्ट होतें, हा विचार न करितां, **हेनरी** राजानें तो मरेपर्यंत त्यास कैदेंतून मुक्त केलें नाहीं. तो **राबर्ट** कैदेंत सांपडल्यानंतर अठ्ठावीस वर्षें होता, मग **ग्लामर्गन** प्रांतांत **क्यार्डिफ** किल्ल्यावर मृत्यु पावला. कित्तीएक असें बोलतात कीं, तांब्याची सळई तापवून त्याचे डोळेही फोडले होते. अशीं आपल्या हातून क्रूर कर्मे घडलीं ह्मणून, **हेनरी** राजास पश्चात्ताप होऊन त्यानें **रेडिंग** शहरांत एक मठ बांधला. त्या वेळेस असें एखादें सत्कर्म केलें ह्मणजे सर्व पातकें दूर होतात, असा समज असे.

**हेनरी** राजास दैव परम अनुकूळ होतें, तेणेंकरून तो बहुत दिवस सुख भोगील, असा योग दिसत होता. त्यानें दोन प्रबळ राज्यें मिळविलीं. त्यास एक पुत्र होता; त्यावर त्याची फार प्रीति असे. तो मुलगा अठरा वर्षांचा झाला त्या वेळेस लोकांनीं तो राजा मान्य केला. त्याची मुलगी **माटिल्डा** नामें **जर्मनीचा** राजा पांचवा **हेनरी** यास दिली होती; ती आठ वर्षांची झाली, तेव्हां पासूनच तिला विद्याभ्यासाकरितां त्या दरबारांत पाठविली होती. अशा त्या **हेनरी** राजाच्या सर्व सुखेच्छा पूर्ण होत असतां अकस्मात् कांहीं संकटें प्राप्त होऊन पुढें जन्मभर त्यास फारच दुःख झालें. तें वर्तमान असें, राज्य अनायासें प्राप्त झालें होतें, त्यामुळें त्याच्या मनांत भय होतें कीं, माझ्या राज्याचा नाशही व्हायास उशीर लागणार नाहीं; ह्मणून त्यानें प्रथमच सर्व **इंग्लंडांतील** संस्थानांचे अधिपति होते, त्यांकडून आपले मुलास राजा असें कबूल करविलें,

आणि त्यास आपले बरोबर घेऊन **नार्मंडींतील** सरदार लोकांपासून शपथ* घ्यायाकरितां तेथें गेला. तो समारंभ होऊन मोठ्या उत्साहानें **इंग्लंडांत** जात असतां, त्यानें तेथील मुख्य मुख्य अनुरक्त लोक पुष्कळ बरोबर घेतले. ते समयीं राजाचा मुलगा आपले सोबती मंडळीसहित एके गलबतांत बसून मौजेनें स्वतंत्रपणें जात होता. राजा ज्या तारवांत बसला होता तें **बार्फ्लुअर**† बंदरांतून निघालें. त्यास वारा चांगला लागून तें जमीन दिसेना इतकें दूर गेलें. परंतु त्याचा मुलगा बसला होता तें वाऱ्याच्या प्रतिबंधामुळें पुढें गेलें नाहीं. त्या वेळेस त्या तारवावरचे खलाशी लोक व त्यांचा क्यापटन **फिट्झस्तीफन** हे दारू प्याले. तेणेंकरून त्यांस शुद्ध नाहींशी झाली. तेव्हां तें गलबत एके खडपावर आपटून त्याचे तुकडे झाले. मग खलाशी लोक राजपुत्रास एके होडींत घालून नेत होते; त्या युक्तीनें त्याचा प्राण वांचला असता, परंतु त्याचे बापाचे राखेच्या पोटची एक **माद** या नांवें मुलगी होती, ती खडपावर ओरडूं लागली, तें ऐकून त्यास दया आली. एक वेळ तो प्राणसंकटांतून मुक्त झाला होता; परंतु आपलें आवडतें मनुष्य मरतें तें वांचवायाकरितां आपण यत्न केल्यावांचून कसें रहावें, असें मनांत आणून त्यानें नावाड्यांस होडी माघारें नेऊन तिला आंत घ्यायाची आज्ञा केली. होडी जवळ आली अशी पाहून त्या खडपावर दुसरे जे कितीएक लोक पडले होते, त्यांस आपले जिवाची आशा

---

* राजा आपण राज्यभार पुत्राचे स्वाधीन करणार झाला, ह्मणजे सरदारांपासून शपथ घेतो, कीं आह्मी तुजजवळ जसे वागलों तसेंच तुझ्या पुत्राजवळ वागूं.

† बार्फ्लुअर गांव नार्मंडी प्रांतांत आहे.

येऊन, त्यांनीं आंत उड्या टाकिल्या. मग ती होडी भारानें चेपून बुडाली; आणि आंतील सर्व मनुष्यें मरण पावलीं. त्या समयीं **इंग्लंड** आणि **नार्मंडी** या देशांतील मोठमोठे लोकांचे मुलगे एकशें चाळिसांपेक्षां अधिक बुडून मेले. **रोएन** शहरांतील एक खाटकी त्या गलबतांत होता, तेवढा मात्र एके शिडाला चिकटून राहून वांचला; त्यास दुसरे दिवशीं कोणी कोळ्यानीं बाहेर काढिले. तो खाटकी ज्या वेळेस समुद्रांत पोंहत होता, त्या वेळेस त्या गलबताचा कपतान **फिझ्स्तीफन** त्याजवळ पोंहून जाऊन, त्यास राजपुत्र जीवंत आहे कीं काय? हें विचारिता झाला. खाटक्यानें राजपुत्र मेला असें सांगतांच तो बोलिला, आतां आपण वांचून फळ काय? असें बोलून त्यानें लागलीच बुडी मारून आपला प्राण टाकिला. मग ते पाण्यांत पडलेले लोक ओरडत, तें कांठावर ऐकायास येई, आणि राजाच्या गलबतावरही येई, परंतु कोण ओरडतो याची बातमी लागेना. **हेनरी** राजास तीन दिवसपर्यंत आशा होती कीं, आपला मुलगा **इंग्लंडांतील** कोणत्या तरी बंदरीं उतरला असेल. चवथे दिवशीं त्यास कोणी येऊन तें मुलाचें वर्तमान सांगितलें, त्या वेळेस तो मूर्छित होऊन पडला. तेव्हांपासून तो अंतकाळपर्यंत कधींही हास्यमुख दिसला नाहीं. नंतर थोडकेच दिवशीं तो **नार्मंडींत सेंटडेनिस** नामें लाहान गांव आहे, तेथें अजीर्ण होऊन मरण पावला. तो पस्तीस वर्षें राज्य करून आपले वयाचे सदुसष्टावे वर्षीं मेला. त्यानें मृत्युपत्रांत, आपली **माटिल्डा** ह्मणून मुलगी होती, तिनें सर्व राज्य करावें असें लिहून ठेविलें होतें.

# प्रकरण ७.

## स्तोफन राजाची कथा.

संन् ११३५ पासून ११५४ पर्यंत.

**हेनरी** राजाची बहीण **आदिला, ब्लोईस** शहराचा **कौंट*** यास दिली होती. तिचा पुत्र **स्तोफन** राजाच्या मरणानंतर आपला प्रताप आणि शक्ति जाणून, निश्चय करिता झाला कीं, मी इतके दिवस जें इच्छीत होतों, तें आतां मला प्राप्त होईल. मग तो त्वरेनें **नार्मंडींतून लंडन** शहरास गेला. तेथें सर्व रयतेनें तो राजा कबूल केला. त्यानंतर धर्मपक्षपात्यांस त्याचा अभिमान पडला पाहिजे, ह्मणून त्याचा भाऊ **विंचेस्तराचा बिशप** यानें सर्व धर्मपक्षपात्यांस युक्तीनें स्वाधीन करून घेतलें. या रीतीनें **स्तोफनास** राज्य पदवी प्राप्त झाली.

ज्यास लबाडीनें राज्य प्राप्त होतें, त्याचीं प्रथम कर्मे सर्व लोकांस आवडायाजोगीं असतात. **स्तोफनानें** आपलें राज्य दृढ करायाकरितां एक नियम ठरविला. तेणेंकरून प्रजांस कितीएक प्रकारची मोकळीक झाली. मोठमोठ्या लोकांस आपले रानांत पारध करायाची परमाणगी दिली; धर्मपक्षांचे लोकांस रिकाम्या संस्थानावर नेमणूक करायास मोकळीक झाली, आणि तो लोकांशीं **एड्वर्ड दि कन्फेसर** राजाचे वेळचे नीतीप्रमाणें वर्तूं लागला. आपण यापेक्षां निर्भय व्हावें ह्मणून, त्यानें **विंचेस्तरांतला** सर्व जामदारखाना आपले हाताखालीं घातला; आणि त्यांतील कांहीं पैका देऊन **पोपाकडून** आपला अधिकार स्थिर केला.

---

* कौंट ह्मणून एक अमात्यांत पदवी आहे.

त्यानंतर थोडकेच दिवशीं **माटिल्डेनें** राजपदाविषयीं बखेडा आरंभिला. ती गलबतांतून येऊन **ससेक्साचे** कांठावर उतरली. तिला **ग्लौसेस्तराचा अर्ल राबर्ट** साहाय झाला. तो **राबर्ट हेनरी** राजाचे बटकीचे पोटचा मुलगा. त्या प्रसंगीं **माटिल्डेचे** स्वारींत एकशें चाळीस **नैट*** होते, त्यांनीं लागलाच **आरंदेल** किल्ला घेतला. तिला त्या राज्याचा वास्तविक अधिकार होता, त्यामुळें साथी पुष्कळ मिळाले. ह्मणून तिच्या फौजेचें तेज शत्रूंचे सैन्यावर पडलें. **स्तीफन** राजा **माटिल्डा** येते असें समजतांच ती ज्या **आरंदेल** किल्ल्यांत राहिली होती, त्यावर हल्ला करायास तयारी करून गेला. त्या किल्ल्यांत **हेनरी** राजाची राणीही होती, ती **माटिल्डेच्या** पक्षास आंतून अनुकूळ असे. **आरंदेल** किल्ला बळकट नव्हता, ह्मणून तो **स्तीफन** राजानें सहज घेतला असता; परंतु त्यास कोणी असें समजाविलें कीं, हा किल्ला त्या ह्मातारे राणीचा आहे; हा जबरदस्तीनें घेणें हें कर्म अनुचित.

मूर्खपणा, आणि भलेपणा या दोहोंकरून आपले अस्वार्थाचीं कर्मे त्या काळचे लोक बहुत करीत असत. तशा बुद्धीनें **स्तीफन** राजानें **ब्रिस्तल** किल्ल्यावर **माटिल्डा** जात होती तिला जाऊं दिली. ती ज्या किल्ल्यावर पहिली होती, त्यासारिखाच तोही बळकट होता. मग त्या दोघांनीं आपला अधिकार स्थापायाकरितां बहुत लाहान लाहान लढाया केल्या; त्या सर्वांची गोष्ट सांगितली तर फार विस्तार होईल. सारांश, राणीचें सैन्य उत्तरोत्तर वृद्धि पावत चाल्लिलें, आणि शेवटीं ती **स्तीफन** राजाचा पराजय

---

* नैट ह्मणून एक त्या काळीं साधारण प्रतींतल्या लोकांचा किताब असे.

करून आपण राज्य करूं लागली. तिला राज्याभिषेक **विंचेस्तर** शहरांत मोठ्या उत्साहानें झालां.

नंतर **माटिल्डा** राणी दरबारांतील मोठमोठे सरदार लोकांचा मान राखीना अशी झाली. तसा अपमान करून घेण्याचा त्यांस फार दिवस अभ्यास नव्हता अशा कारणानें त्या चंचल बुद्धि लोकांचे मनांत पदच्युत **स्तीफन** राजाविषयीं दया आली. पुढें **विंचेस्तराचे बिशपानें** तो तंटा वृद्धिगत केला. तो असा, लोकांचे मनोगत जाणून त्यानें राणी जेथें होती, तें **लंडन** शहर वेढायाचें काम आपले कितीएक स्नेही आणि आश्रित यांचे मंडळीस सांगितलें; आणि तसें झालें ह्मणजे शहरच्या लोकांनीं एकदाच दंगा करून राणीस धरावें असा बेत केला. राणीला ही बातमी आगोदरच समजून ती **विंचेस्तर** शहरांत पळून गेली; तेथेंही तिचा गुप्तशत्रु तो **बिशप** तिजबरोबर गेला; मग तत्पक्षी लोकांनीं तेथें राणीवर उघड शस्त्र धरिलें. जेथें तिला प्रथम त्या **बिशपाचा** आशीर्वाद प्राप्त झाला होता, त्या ठिकाणींच ती पकडली गेली. तेथें ती कितीएक दिवसपर्यंत होती. परंतु त्या शहरांत दुष्काळाचा उपद्रव झाल्यामुळें तिला तेथून बाहेर जावें लागलें. त्या वेळेस तिचा बंधु **ग्लौसस्तेराचा अर्ल**, तिचे बरोबर जात होता, त्यास धरून कैदेंत ठेविलें, आणि **स्तीफन** राजास मुक्त केलें. या रीतीनें अकस्मात् राज्यामध्यें फेरफार झाला; मग **माटिल्डा** पदच्युत होऊन **आक्सफर्डांत** जाऊन राहिली, आणि **स्तीफन** राजा बंदांतून सुटून पुनः राज्य करूं लागला.

नंतर **स्तीफन** राजास दुसरा एक पुरुष शत्रु झाला. तो **माटिल्डेचा** मुलगा **हेनरी**. तो सोळा वर्षांचे वया-

चा होता, त्या वेळेस तो मोठा अग्रगण्य आणि राज्यकारभारी होईल असा दिसत असे. त्यानें लोकांच्या संमतानें आपले वंशाचें राज्य पुनः आपले हस्तगत करायाचा निश्चय केला. तो, **स्तीफनास** राज्याचा अधिकार नाहीं असें निमित्त योजून **इंग्लंडांत** चढाव करून गेला. त्यास बहुधा राज्यांतले सर्व मोठमोठे लोक येऊन मिळाले.

तेव्हां **स्तीफन** राजानें भयभीत होऊन **हेनरीचा** तो आवेश निवृत्त करायासाठीं बहुत यत्न केले, परंतु ते व्यर्थ गेले. मग त्यानें त्याशीं तह केला. तेव्हां असा करार ठरला कीं, **स्तीफनानें** यावज्जीव राज्य करावें, आणि न्याय मनसुबींतही त्याचें नांव चालावें. **स्तीफन** मेल्यानंतर राज्य **हेनरीनें** करावें, आणि **स्तीफनाचा** पुत्र **उइलियम** यास **बोलोन** प्रांत आणि त्याचे बापाची खासगीची संपत्ति मात्र मिळावी. असा तह करून सर्व सभासद लोकांनीं शपथा घेतल्या, तेणेंकरून लोकांस परम आनंद झाला. नंतर **हेनरी** राजा **इंग्लंडांतून** गेला, आणि **स्तीफन** स्वस्थपणें पूर्ववत् राज्य करिता झाला. असा **क्यांटर्बरींत** तह झाल्यावर **स्तीफन** राजा सुमारें एक वर्षानें मृत्यु पावला. त्याच शहरांत त्याचें शरीर पुरलें. अशी **स्तीफन** राजाच्या राज्याची समाप्ति झाली.

---

## प्रकरण ८.

## दुसऱ्या हेनरी राजाची कथा.

संन् ११५४ पासून ११८९ पर्यंत.

**हेनरी** राजाचे प्रथम राज्य रीतीवरून लोकांचा निश्चय झाला कीं, हा पुढें विचारानें प्रजापालन करील.

त्यानें, आपला पराक्रम लक्षांत आणून जी कुनीति पूर्वी प्रवृत्त झाली होती ती, आणि राजांचे दुर्बळतेमुळें, तसेंच भोळेपणामुळें, जे अप्रौढ व्यवहार चालिले होते ते, बंद करायाचा उद्योग आरंभिला. राज्यामध्यें धुंदाई करणारी फौज होती ती तत्क्षणीं दूर केली; तशींच, धर्मशाळा इत्यादिकांस, जीं स्वास्थ्यें होतीं तीं पुनः पूर्ववत् चालू केलीं.. आणखी कितीएक गांवचे लोकांस अशी मोकळीक दिली, कीं त्यांनीं राजावांचून दुसऱ्या कोणाचा अंमल न मानितां स्वेच्छेनें पूर्ववत् आपलीं कर्मे चालवावीं. इंग्लिश लोकांस जें स्वेच्छाचारित्व प्राप्त झालें त्याचें मूळ या राजानें केलेले कायदे— त्यापूर्वी असा विवाद चालिला असे कीं, प्रजांवर सत्ता कोणाची का राजाची, कीं अमात्याची, कीं धर्मपक्ष्यांची? नंतर या विवादांत चवथाही एक विषय शिरला. तो हा कीं, प्रजांतून धनवान् लोकही आपणांस राज्यकारभारांत विभाग असावा असें इच्छूं लागले. या प्रकारानें **फ्युडलसिस्तेम** ह्मणजे परस्पर प्रभुत्व* याचा नाश झाला, आणि तेव्हांपासून सर्व लोकांत स्वेच्छाचारित्वविषयीं फार आस्था उत्पन्न झाली.

त्या काळचे राजांमध्यें परम बलिष्ठ असा जो **हेनरी** राजा तो, **इंग्लंड** देशाचें निर्विवाद प्रभुत्व संपादून **फ्रान्स** देशाच्या तृतीयांशापेक्षां मोठें राज्य पावता झाला. अशा गोष्टी वाचून मनांत वाटतें कीं, त्यानें पुढेंही निर्विघ्नपणें राज्य केलें असेल; परंतु ती गोष्ट विपरीत घडली. ती अशी

* परस्पर प्रभुत्व ह्मणजे धनी आणि सेवक या दोघांचा मात्र संबंध असतो; आणि राजाचें प्रभुत्व सर्वांवर नसतें त्या रीतीचें नांव.

कीं, जेथून भयाची शंकाही नव्हती तेथूनच मोठा उत्पात होऊन त्याचा नाश झाला.

तो वृत्तांत असा– **नार्मेनांनीं इंग्लंड देश** घेतल्यापासून प्रथम **इंग्लिशांस** ह्मणून जो किंचित् अधिकार प्राप्त झाला तो, **टामस ए बेकेट** ह्मणून **लंडनांत** राहाणारे एके ग्रहस्थाचा पुत्र होता त्यास झाला; तो पुरुष **लंडन** शहरांतले शाळांत विद्याभ्यास करून **पारिस** शहरास गेला, तेथून आल्यावर त्यास **शेरिफाचे* आफीसांत**† कारकुनाची जागा मिळाली– तो त्या पदापासून अनुक्रमानें चढतां चढतां, शेवटीं **क्यांटर्बरीचा आर्चबिशप**, याची पदवी पावला. असा तो राजाचे खालचे स्थानास चढला. ती पदवी प्राप्त होतांच तो आपले पूर्वावस्थेंतलीं हलकीं कर्मे झांकावीं ह्मणून, मोठे भक्तासारिखें आचरण करूं लागला. तो देवसेवेचे मिषानें आपणास फार दुःख देत असे, नुसतीं ऊर्णावस्त्रें शरिरावर धारण करी; तीं अगदीं मळेपर्यंत बदलीत नसे; निःस्वाद अशी भाजीभाकर खाई; आणि जलमात्र प्राशन करी. तसेच शरीर दमनार्थ अनेक प्रकारचे निग्रह केल्यामुळें, त्याचे पाठीचा कणा वरता आला होता. तो प्रतिदिवशीं तेरा दरिद्र्यांचें पादप्रक्षालन करी. असा तो तपस्व्यासारिखें आचरण दर्शवून, धर्मपक्षपात्यांची सत्ता जी पूर्वी विपुल झाली होती, ती रक्षण करायाचा डौल घालूं लागला, परंतु ती कमी करावी असा **हेनरी** राजाचा बेत होता.

---

* राजाच्या आज्ञा जो सिद्धीस नेतो, आणि अपराधी लोकांस दंड करितो, त्या कामगारास शेरिफ असें ह्मणतात.

† काम करायाचे स्थळाचें नांव.

थोडे दिवसांनंतर राजास एक उघड निमित्त सांपडलें; तेव्हां त्यानें मनांतील बेत सिद्धीस न्यायाचा प्रारंभ केला. एके धर्मपक्षपात्यानें **वार्सेस्तर** परगण्यांतले एके गृहस्थाची मुलगी भ्रष्ट केली, आणि तिचा बाप आपली लबाडी उघड करील ह्मणून त्यास मारिलें. हें त्याचें महा दुष्ट कर्म पाहून सर्व लोक परमक्रुद्ध झाले. तेव्हां राजानें आज्ञा केली कीं, त्याची चौकशी न्यायाधीशानें करावी. परंतु **बेकेटानें** राजाचे आज्ञेस प्रतिबंध करून सांगितलें कीं, याची चौकशी चालीप्रमाणें धर्मपक्षपात्यांचे हातूनच व्हावी.

नंतर या गोष्टीचा निश्चय करायाकरितां राजानें **क्लारेंडन** शहरांत मंत्र्यांची आणि धर्मपक्षपात्यांची सभा केली; आणि हा विषय त्यांस समजावून त्यांची संमति विचारिली. त्या काळीं ज्या सभा होत त्या, पुढील लोकांस योग्य नियम करून ठेवायाकरितां होत नसत; तर राजाच्या आज्ञा स्थापायास होत असत; ह्मणून राजानें केलेले सर्व कायदे त्या सभेंत सर्वांचे संमतानें ठरले. ते पुढें **क्लारेंडन** कायदे या नांवानें प्रसिद्ध झाले. तेथें असें ठरलें कीं, धर्मपक्षपात्यांतून कोणी अन्याय केला असतां, त्याची चौकशी राजाच्या न्यायगृहांत व्हावी.

हें आणि दुसरीं लाहानसान मिळून सोळा कलमें ठरलीं, त्यांवर सर्व धर्मपक्षपात्यांनीं सह्या केल्या. **बेकेट** मात्र प्रथम अनुकूळ नव्हता, परंतु मग त्यानेंही संमति घातली. त्या वेळेस **आलिक्झांडर** ह्मणून **पोप** होता; त्यानें त्यावर सबळ दोष ठेवून तो नियम रद्द केला.

मग **बेकेटानें** राजाचा पक्ष सोडून **पोपाचा** पक्ष स्वी-

कारिला; ह्मणून राजाचें आणि त्याचें वांकडें पडलें. तो एके दिवशीं धट्टाईनें धर्मपक्षपात्यांचीं* वस्त्रें पेहरून आणि हातांत एक क्रूस घेऊन राजाचे घरीं गेला आणि आपल्या संरक्षणार्थ तो क्रूसरूप ध्वज हातीं घेऊन राजाजवळ बसला. तेथें त्यानें मोठ्या अभिमानानें मी धर्मपक्षी आहें असें जाणवून देशांतरीं जायास आज्ञा मागितली. त्यास आपला अधिकार सोडून जायाची आज्ञा राजानें दिली नाहीं, ह्मणून तो मग चोरून निघून महाद्वीपास गेला. तेथें सर्वत्र त्याचें धैर्य आणि सदाचरण पाहून लोक त्याचा मोठा सत्कार करूं लागले.

पोप आणि बेकेट या दोघांनीं असा निश्चय केला होता कीं, कसें तरी करून राजाची सत्ता नाहींशी करावी. इतर लोक त्याचें वांकडे इच्छीत असत ह्मणून बेकेट आपल्याला क्रैस्ताचा उपमा देत असे. पुढें बेकेटानें लिहून असें जाहिर केलें कीं राजाचे अमुक मंत्री, तसेच जे कोणी धर्मपक्षाचा नेमलेला वसूल बंद करूं पाहातआहेत ते, आणि ज्यांनीं क्लारेंडन कायद्याविषयीं संमति दिली ते सर्व, धर्मपक्ष्यांतून बहिष्कृत केले आहेत. तो बेकेट आणि राजा या दोघांचें सख्य व्हावयाकरितां लोकांनीं बहुत यत्न केले; परंतु त्या दोघांत अत्यंत द्वेष होता, आणि सख्याच्या अंतीं आपला किमपि अस्वार्थ होऊं नये असा त्या दोघांसही अभिमान होता; त्यामुळें ती गोष्ट सिद्धीस गेली नाहीं.

शेवटीं परस्परांचें ऐक्य व्हावें या गोष्टीचें दोघांसही अगत्य पडलें, परंतु बेकेट परत इंग्लंड देशास आला त्या

---

* विलायती लोकांत धर्मपक्षपात्यांचीं वस्त्रें साधारण लोकांपेक्षां भिन्न जातीचीं असतात.

वेळेस त्यानें जें औद्धत्य दाखविलें तेणेंकरून पुनः पूर्ववत् झालें. राजा ज्यास क्षमा करितो त्यानें जसें नम्रतेनें वागावें, तसें न वागतां तो **पोपाचा** सर्व डामडौल करून **केंत** प्रांतांतून आला. या रीतीनें तो **सौथर्क** प्रांताजवळ आला त्या काळीं, सर्व धर्मपक्षपाती, तसेच नगरांतले लाहान मोठे लोक, त्याला भेटायास गेले. आणि आनंदानें नाना प्रकारचें गायन करून त्याची स्तुति करिते झाले. नंतर तो लोकांचें मन आपणाकडे आहे असें समजून आपल्या पराक्रमाच्या गर्वानें जे जे कोणी पूर्वीचे प्रतिपक्षी होते त्यांची निंदा करूं लागला. प्रथमतः **यार्कांचे आर्चबिशपानें** त्याचे पाठीमागें **हेनरीच्या** ज्येष्ठ पुत्रास राज्याभिषेक केला होता, ह्मणून त्यास पदच्युत करावयाचा हुकूम केला. तसेंच **लंडन** आणि **सालसबरी** एथील **बिशपांस** त्यानें ज्ञातिबाह्य केलें. कोणीएक त्यास विरुद्ध बोलिला व एकानें त्याचे घोड्याची शेंपटी कापिली, ह्मणून त्यानें त्या दोघांसही जातिबहिष्कृत केलें.

या रीतीनें राज्यांत **बेकेटानें** मोठी धुंदाई मांडिली होती, त्या वेळीं राजा **हेनरी नार्मंडींत** होता त्यास **बेकेटाचे** उन्मत्ततेचें वर्तमान समजतांच बहुत कोप आला. जेव्हां ते जातिबहिष्कृत आणि पदच्युत केलेले **बिशप** राजाजवळ येऊन फिर्यादी सांगूं लागले, त्या वेळेस त्यास जो क्रोध आला त्यास अंत नाहीं. आपण ज्यास लहान पदापासून मोठ्या पदवीस चढविलें, तोच आपल्यावर उलटून राज्यांत बखेडा करितो, आणि आपणास संताप देतो, असें पाहून राजाचा क्रोध विशेष प्रज्वलित झाला. त्या वेळीं **यार्काचा आर्चबिशप** बोलिला कीं, महाराज! **बेकेट**

जोंपर्यंत जीवंत आहे तोंपर्यंत राज्यांत स्वास्थ्य व्हायाचें नाहीं. तेव्हां राजा विचार न करितां मोठ्यानें ह्मणाला कीं, "मी काय करूं? मला कोणी साहाय नाहीं, नाहीं तर मी या दांभिक तपस्व्याचे हातून इतके दिवस दुःख पावलों नसतों." हे शब्द ऐकून राजाचे चार धैर्यवान् सेवक राजाचा हृद्रोग निवारावा ह्मणून उद्योग करिते झाले. तो असा, हे चौघे आणि दुसरे कितीएक त्याचे साहाय मिळून **क्यांटर्बरीस** मोठ्या त्वरेनें निघून गेले. ते नीट **बेकेटाचे** घरांतच जाऊन, त्याचे औद्धत्याविषयीं पुष्कळ दुरुत्तरें बोलिले. मग ते तसेच त्या बेतानें तेथें होते. एके दिवशीं तो **बेकेट** संध्याकाळीं एकटा बेफाम होऊन धर्मशाळेंत मुख्य जागेजवळ जात होता इतक्यांत राजसेवकांनीं तेथें येऊन बहुत वार करून त्याचें डोकें तोडिलें. मग तो **बेनेदिक्त** महंताचे मूर्तीपुढें गतप्राण होऊन पडला. व ती मूर्त्ति त्याच्या रक्तमांसानें भरून गेली.

नंतर **बेकेटाचा** मृत्यु श्रवण करून **हेनरी** राजा भयभीत होऊन विचार करूं लागला कीं, लोकांचे मनांत आपण त्यास मारलें असा संदेह येईल. मग लोकांचीं मनें दुसरेकडे लागावीं ह्मणून त्यानें **अयर्लंड** घ्यायाचा उद्योग आरंभिला. **साक्सनी** लोकांनीं देश घेतला त्या वेळेस जसे **इंग्लिश** लोक होते तसेच **ऐरिश** लोक त्या काळीं होते. त्यांनीं प्रथमच **क्रिस्तियन** धर्म घेतला होता, आणि त्यानंतर तीनशें चारशें वर्षांनीं त्या काळानुरूप विद्यादिकांचेंही त्यांनीं बरेंच संपादन केलें होतें. त्यांजवर कोणी बाहेरून येऊन हल्ला करीत नसत, आणि ते लोक गरीब होते ह्मणून, कोणी राजा लोभाविष्ट होऊन त्यांस

उपद्रव करीत नसे; यामुळें ते एकमतानें होते. ते आपला काळ धर्माचरणांत आणि धर्मोपयोगी विद्यांत घालवीत असत. त्यांच्या विद्या, कळा, धार्मिकता, आणि सुनीति, यांचीं प्रमाणें अद्यापि दिसतात, ह्मणून त्याविषयीं कांहीं संदेह नाहीं. परंतु ते कांहीं काळानें सर्व विद्यांपासून भ्रष्ट झाले, आणि पुढें सांगतों हें वर्तमान घडलें. त्या वेळेस ते केवळ अज्ञानानें व्याप्त होते.

ज्या काळीं **हेनरी** राजानें **अयर्लंडावर** हल्ला करायाचा बेत केला, त्या वेळेस त्या बेटाचे पांच भाग होते. त्यांचीं नांवें— **लेन्स्तर**, **मीथ**, **मन्स्तर**, **अल्स्तर**, आणि **कानाट**. या पांच परगण्यांचे पांच मांडलिक राजे होते. त्या काळीं अशी चाल होती कीं, युद्धादि प्रसंगीं त्यांतून एकास मुख्य करून, त्यास राजा असें ह्मणावें, आणि पुरातन **साक्सन** राजाएवढी त्या मुख्यास सत्ता द्यावी. त्या वेळेस **रोद्रिक ओक्नर** ह्मणून **कानाटाचा** राजा होता, त्यास तें पद प्राप्त झालें होतें; आणि **दर्मत् एम्मरो**, **लेन्स्तराचें** राज्य करीत असे. हा शेवटीं सांगितलेला राजा अतिशय क्षुद्रबुद्धि आणि कामुक असे; ह्मणून त्यानें **मीथाचे** राजाची कन्या उपटून नेली. नंतर **मीथाच्या** राजानें **कानाटाचे** राजाशीं सख्य करून शेवटीं त्यावर चढाव करून जाऊन त्याचें राज्य घेतलें; आणि त्यास बाहेर काढून दिलें. अन्याय कर्माकरितां या रीतीचा दंड पावून त्या **एम्मरो** राजानें **डोएन** शहरांत **हेनरी** राजा होता त्यास शरण जाऊन असा करार केला कीं, जर माझें राज्य तुह्मी मला परत देवविलें, तर मी **इंग्लडाचे** राज्याचे ताबेखालीं येईन. **हेनरीनें** तो करार

लगलाच कबूल केला, परंतु त्या वेळेस दुसरें कांहीं नाजूक काम होतें ह्मणून त्यास सनद मात्र करून दिली; ती अशी कीं, आपल्या प्रजांतून कोणास शक्ति असेल त्यानें जाऊन या राजास साहाय्य करून याचें राज्य परत घेऊन यास द्यावें. ही सनद घेऊन **दर्मोत** राजा **ब्रिस्तल** शहरास गेला, तेथें जाऊन कांहीं यत्न करून **रिचार्ड**, ज्याचें उपनांव **स्त्रांग्बो** (**पेंब्रोकाचा अर्ल**) यांशीं करारपत्र केलें; त्यांत **अर्लानें** असें लिहून घेतलें कीं, तूं जर मला आपली **एवा** नामक मुलगी देशील, आणि आपल्या मागें सर्व संपत्तीचा अधिकारी करिशील, तर तुझें राज्य घेऊन तुला देईन.

असें त्या **अर्लाचें** वचन घेऊन **दर्मोत** राजा चोरून **अयर्लंडांत** गेला; आणि तेथें **फर्न्स** नामक मठ त्यानेंच स्थापिला होता त्यांत जाऊन राहिला. पुढें उन्हाळ्यांत **राबर्ट फिझ्स्तीफन** ह्मणून एक **नैट** होता तो एकशें तीस **नैट**, साठ **इस्कायर*** आणि तीनशें तिरकमठेवाले घेऊन त्या बेटांत गेला. त्यानंतर लवकरच **मारिस पेंडर्गास्त** ह्मणन कोणी होता, तो दहा **नैट** आणि साठ तिरकमठेवाले घेऊन त्यास मिळाला. अशी ही लहान फौज घेऊन **वेक्स्फर्ड** शहरावर त्यांनीं हल्ला केला. तें शहर सरदारांस द्यावें असा ठराव झाला होता. पुढें तें सहज हस्तगत झालें. नंतर त्यांस **मारिस फिझ्जिराल्ड** सुमारें दीडशें लोकांनिशीं येऊन मिळाला. तें सैन्य पाहून ते अज्ञानी लोक फार भयभीत झाले. त्या बेटांतील मुख्य रा-

---

* त्या वेळेस नैट पदाचे अधिकारी होते, त्यांचे बरोबर जे प्रतिष्ठित गृहस्थ असत, त्यांचा हा किताब. सांप्रतकाळीं सर्व प्रतिष्ठित गृहस्थ आपल्या नांवास हा शब्द जोडितात.

जा जो रोड्रिक त्यानें त्याचें निवारण करायाचा उद्योग आरंभिला होता; परंतु तो पराजय पावला; आणि त्यांनीं त्यापासून ओलीस मनुष्यें घेतलीं. तसाच आसरी राजाचा पराजय करून त्यापासूनही ओलीस मनुष्यें घेतलीं.

या रीतीनें दर्माताला पूर्व पदवी प्राप्त झाल्यावर, तो आपलें राज्य अधिक असावें अशी इच्छा करूं लागला. त्यास असें वाटूं लागलें कीं, आपल्यास सर्व अयर्लंडांचा अधिकार प्राप्त होईल तर बरें. अशा मतलबानें तो स्त्रांग्बो यास लाभलोभ दाखवूं लागला. तो स्त्रांग्बो राजाच्या कामांत गुंतल्यामुळें तेथें स्वतः गेला नव्हता; मागें सांगितल्याप्रमाणें त्यानें फौज मात्र पाठविली होती. दर्मात त्यास सांगूं लागला कीं, जर तुह्मी अयर्लंड घेतलें तर तुमची मोठी कीर्त्ति होईल; आणि तुह्मास या गोष्टीपासून संपत्तिही प्राप्त होईल; त्यानें अयर्लंडांतले लोकांचा भ्याडपणा त्यास बनावून सांगितला; आणि उद्योग केला असतां निश्चय सिद्धीस जाईल, अशी त्याची खातरजमा केली. स्त्रांग्बोनें तें सर्व कबूल करून कोणी त्याचा सेवक होता त्यास, ७० तीरवाले बरोबर देऊन प्रथम पाठविलें, नंतर राजाची आज्ञा घेऊन आपणही घोडेस्वार आणि शंभर तिरकमठेवाले घेऊन गेला. सर्व इंग्लिशांची फौज त्यास येऊन मिळाली, तेणेंकरून तो अजिंक्य झाला. त्या वेळेस सर्व फौज मिळून जरी हजारही नव्हती, तरी ते लोक अतिशय अज्ञानी होते, ह्मणून तितकीच फौज त्यांला जेथें तेथें पळवी. या गोष्टीवरून ज्ञानी आणि अज्ञानी या लोकांत किती अंतर आहे हें ध्यानांत येतें. मग वाटर्फोर्ड शहर त्याचे स्वाधीन झालें, व डब्लिन त्यांनीं हला करून घेतलें.

नंतर **स्त्रांगबोनें एवेशीं** लग्न केलें; आणि **दर्मात** मरतांच त्यास सर्व राज्य मिळालें.

त्यानंतर किमपि विघ्न न होतां, तें सर्व बेट **इंग्लिशांचे** स्वाधीन झालें. त्या वेळेस **हेनरी** राजाचे मनांत आवड उत्पन्न झाली कीं, प्रजांनीं जें यश मिळविलें, तें आपणास मिळावें. ह्मणून तो मग लवकरच पांचशें **नैट** आणि कांहीं शिपाई घेऊन **अयर्लंडांत** गेला. तो दुसऱ्याचें राज्य घ्यायास ह्मणून गेला नव्हता; स्वाधीन झालेल्या देशांत अंमल बसवायास गेला होता. या रीतीनें **अयर्लंड** घ्याव-यास श्रम बहुत पडला नाहीं, व पैकाही विशेष खर्चला नाहीं. तें **अयर्लंड** तेव्हांपासून **इंग्लंडाचे** राज्यांत मोडतें.

या रीतीनें राज्य प्राप्त झालें तेणेंकरून राजास परम आनंद झाला; परंतु कांहीं गृहसंबंधी संकटेंकरून त्याचें बाकीचें वय दुःखांत गेलें. तो प्रकार असा, **हेनरी** राजामध्यें जे कितीएक दुर्गुण होते ह्मणून सांगतात, त्यांत पराकाष्ठेचा वाईट, अनिंद्रिय निग्रह हा एक होता. **एलिनोर** ह्मणून राणी होती ती कांहीं शरीर दोषामुळें पूर्वींच्या भर्त्यानें त्या-गिली होती, तिला या राजानें लोभाविष्ट चित्त होऊन वरिलें. तिजवर कांहीं दिवसांनीं राजाची अप्रीति झाली; आणि तो इतर स्त्रियांशीं रमून विषय सुखाचा आस्वाद घेऊं लागला. त्याची **रोझमंद क्लिफोर्द** ह्मणून एक राख फार चमत्कारिक होती, तिजवर त्याची फार प्रीति असे.

नंतर **हेनरी** राजानें, आपली राणी आपल्या व्यभिचा-रीपणामुळें विरोध करील ह्मणून, त्या राखेला **वुड्स्तक ह्मणून लाबरिंथ*** होतें त्यांत चोरून ठेविलें. या रीतीनें

* लाबरिंथ ह्मणजे ज्या ठिकणीं गेलें असतां त्यांतून बाहेर नि-घायाची वाट फार दुर्मिळ असते, तें ठिकाण.

किती दिवस चालिलें होतें, त्याचा निश्चय नाहीं. शेवटीं तें वर्तमान राणीस समजलें. तिनें रेशिमाचे कसणीवरून आपले वैरिणीजवळ जाऊन तरवार उपसून तिजकडून विष खावविलें. ही गोष्ट खरी असो कीं खोटी असो; परंतु इतकें सत्य कीं, राजा आणि त्याचे पुत्र यांत जें वांकडें पडलें, त्याचें कारण ती राणी.

राजाचा ज्येष्ठ पुत्र **हेनरी** होता, त्याच्या मनांत भरून दिल्यामुळें त्यास असें वाटूं लागलें कीं, आपल्यास राज्याचा अधिकार असून आपले हातीं सत्ता नाहीं, ही आपली मोठी फजीति. **जीओफ्री** आणि **रिचर्ड** हे दोघे त्याचे भाऊ होते तेही राणीनें सांगितल्यावरून आपल्या वांट्याच्या राज्याविषयीं सत्ता करूं लागले. ते आपले भावाशीं समदुःखी झाले. मग ते राजाचे तिघे पुत्र **फ्रान्स** देशचे दरबारीं निघून गेले; आणि राणी **एलीनरही** कांहीं युक्ति करून तेथें जावें या बेतांत होती; परंतु राजाचे आज्ञेस तिला धरून कैदेंत ठेविलें. या सर्व गोष्टी पाहून राजानें समजलें कीं, यापुढें सुखाची आशा करणें हें व्यर्थ; कारण, पुत्रांस राज्य करण्यायोग्य वय प्राप्त व्हावयाचे पूर्वींच बापाचें राज्य घेण्याविषयीं अतिशय उत्सुकपणा; राणी आपले अधार्मिक पुत्रांच्या विरोधाची वृद्धि करिते; आणि **इंग्लडांतले** राजपुत्र निर्लज्जपणें त्यांस साहाय्य करितात; या सर्व गोष्टी पाहून राजा उदास होता झाला.

याकरितां राजानें सर्व लोकांच्या मनांत अतिभक्ति* पाहून आणि दुर्दशा प्राप्त झाली हा कांहीं देवताक्षोभ आहे

---

* अतिभक्ति ह्मणजे बुद्धीस ज्या गोष्टी असंभाव्य वाटतात त्यांवर विश्वास. जसें, भूतें, मंत्र सामर्थ्य इत्यादिक.

असें मनांत आणून निश्चय केला कीं, **क्यांतर्बरींत** अतिशय जागृत **सेंटटामसाची*** मूर्त्ति आहे तेथें जाऊन कांहीं प्रायश्चित्त करावें. मग तो **क्यांतर्बरीचे** वाटेंत देऊळ दिसूं लागलें त्या स्थलापासून घोड्यावरून उतरून शहरांत पायीं गेला; आणि त्या देवाचे पायां पडला. दुसरे दिवशीं त्याचे अपराधाची क्षमा त्यास प्राप्त झाली; आणि तो **लंडन** शहरास जावयास निघाला. तों त्यानें बातमी ऐकिली कीं, त्याच दिवशीं **स्काच** लोकांचा पराभव झाला.

त्या काळापासून राजा **हेनरीची** उत्तरोत्तर बढती होत चालिली. ज्या अमात्यांनीं दंगा आरंभिला होता, ते त्यास शरण गेले; आणि मग थोडे दिवसांनीं सर्व **इंग्लंड** देश स्वस्थ झाला. राजाचा मुलगा **हेनरी** मोठी फौज जमा करून **इंग्लंडांत** येत होता; परंतु तेथें सर्व गोष्टी विपरीत पाहून त्यानें तो बेत ठेविला. मग लवकरच तो ज्वर येऊन **मार्तेल** शहरांत मृत्यु पावला. त्या वेळेस त्याचें वय सदतीस वर्षांचें होतें. पूर्वीं आपण बापाशीं अधार्मिक व्यवहार केला, हें मनांत आणून त्यास अंतीं फार पश्चात्ताप झाला. नंतर त्याचा भाऊ **रिचर्ड** होता, त्यानें त्याची जागा सांभाळिली. ती अशी कीं, ज्या लोभामुळें त्याचा वडील भाऊ पापांत पडला, तोच लोभ याच्या मनांत उत्पन्न झाला.

पुनः एकवेळ धर्मयुद्धाचा बेत झाला. त्या वेळेस, **रिचर्ड** आपण अग्रेसर होऊन आपणास जय मिळावा याकरितां आपल्या बापास बरोबर येऊं देईना. त्यानें **फ्रान्स** देशाचे राजाशीं ऐक्य करून वचन घेतलें कीं, तुझे मनांत आहे

* बेकेट मेल्यानंतर या नावानें लोक त्याची पूजा करीत असत.

तसें मी करीन. आपणास धर्मयुद्धास जायाचा उपाय नाहीं असें पाहून, **हेनरी** राजानें आपला पुत्र आणि **फ्रान्स** देशाचा राजा यांशीं युद्ध करावें असा बेत केला. शेवटीं त्या दोघांत तह झाला, त्यांत हेनरी राजास अहितकारक अशा गोष्टी बहुत ठरल्या. ज्या अमात्यांनीं राजाशीं वैरभाव ठेविला होता त्यांस राजानें क्षमा करावी असें झालें. त्यांची याद राजानें मागितली त्या वेळेस, त्याचा परम प्रिय पुत्र जो **जान** ह्मणून होता, त्यांचे नांव त्यानें त्यांत पाहिलें, तेणेंकरून तर त्यास फार वाईट वाटलें. त्यानें फार दिवस वार्द्धक्य दुःख भोगिलें, तें त्यास इतकें दुःखकारक झालें नाहीं; त्याच्या मुलांनीं बंडें केलीं, त्यानेंही त्यास तादृश संताप झाला नाहीं; परंतु ज्या मुलाचें कल्याण व्हावें असें त्याच्या मनापासून होतें, तो आपलें शत्रुत्व करितो, हें पाहून त्याला कोप आवरेनासा झाला. तो मोठ्या शोकानें आक्रोश करूं लागला– "अरे मी हतभाग्य, जळो तो माझा दुष्ट जन्म दिवस! असें ह्मणून त्यानें आपल्या कृतघ्न मुलांस शाप दिला. तो त्यानें कधीं मग फिरविला नाहीं. हृदयांत जितकी विशेष ममता येई तितका तो अधिकच संतापे. मग त्याच्या चित्तांत एकही अंश असा राहिला नाहीं कीं, जेथून त्यास सुख होईल; त्यामुळें त्याचें पूर्वीचें चांचल्य जाऊन तो दुःखग्रस्त झाला. मग त्या हृद्रोगेंकरून त्यास जीर्णज्वर लागून तो **फ्रान्स** देशांत **सोमुर** शहराजवळ **शिनोन** ह्मणून स्थल आहे तेथें मेला. तेव्हां त्याचें वय आणि चिंता यांची समाप्ति झाली. त्या वेळेस त्याचें वय अठ्ठावन्न वर्षांचें होतें, त्यानें ३५ वर्षें राज्य केलें. तितक्यांतच त्यानें

मोठ्या मुत्सद्याची बुद्धि, न्यायाधीशाची सूक्ष्म दृष्टि आणि मोठ्या शूराचें धैर्य, हे गुण दाखविले.

---

## प्रकरण ९.

### पहिले रिचर्ड राजाची कथा.

ज्याचें प्रतिष्ठानांव **कु अर डि लिओ**.*

संन् ११८९ पासून ११९९ पर्यंत.

**रिचर्डास** राजपदवी प्राप्त झाल्यावरही धर्मयुद्धास जायाची त्याची मसलत होती. जो **स्काट्लंड** देशाचा धनीपणा पूर्वीच्या राज्यांत मिळाला होता, तो या कामाकरितां विकून, पैका घेऊन सर्व साहित्य तयार करून तो पुण्य भूमीस निघाला. या उद्योगासाठीं **फ्रान्स** देशाचा राजाही युद्धाकरितां जाणार होता; त्यानें **रिचर्डास** आपण समागमें जाऊं असें बहुत निरोप पाठविले.

**इंग्लिश** सेना व **फ्रेंच** सेना यांचें एकत्र भेटायाचें ठिकाण **बर्गंडी** देशांत **वेझेल्** ह्मणून मैदान ठरविलें होतें; तेथें ते दोघे जाऊन पाहूं लागले तों, फौजेंत एक लक्ष योद्धे जमले आहेत. तेथें दोघांनीं एकमेकांस साहाय्य करावें याविषयीं शपथा केल्या; आणि आपलीं सैन्यें जलमार्गानें पुण्य भूमीस घेऊन जावें असा निश्चय केला. परंतु त्या काळीं दिवस थंडीचे होते ह्मणून, ते दोघे आपल्या सैन्यासुद्धां **सिसिली** देशाची राजधानी जें **मेसीना** शहर,

---

* कु अर डि लिओ ह्मणजे सिंहासारिखें ज्याचें हृदय.

त्यांत उष्णकाळ येई तोंपर्यंत राहिले. **रिचर्ड** शहराचे बाहेर एके धाकटे किल्ल्यांत राहिला. **फिलिप** राजा शहरांत राहिला. त्याचें आणि **सिसिलीचे** राजाचें सख्य झालें. मग त्या **इंग्लिश** व **फ्रेंच** या दोन राज्यांत एक वेळ अविश्वास, पुनः ऐक्य, असें होऊं लागलें; याचें कारण **सिसिलीचा** राजा. शेवटीं सर्व तंटा मिटून, ते दोघे पुण्य भूमीस निघून गेले. त्यांत **फ्रेंच इंग्लिशांचे** पूर्वीं बहुत दिवस पोहोंचले.

त्यानंतर **इंग्लिशही** सैन्यासुद्धां **पालेस्तिन*** देशांत जाऊन पोहोंचले. **रिचर्ड** आणि **फिलिप** हे दोघे अगोदरचें वैर विसरून एकमताने काम करूं लागले; परंतु मग थोडेच दिवसांनीं **फिलिप** राजाचे शरीरप्रकृतीस बरें नाहींसें झाल्यामुळें, तो दाहा हजार फौज मात्र **रिचर्डा**जवळ ठेवून **फ्रान्स** देशास निघून गेला. त्यानें फौज ठेविली तींत **बर्गंडीचा ड्युक** मुख्य केला होता. त्यानंतर **रिचर्ड** उतरोत्तर विजय मिळवूं लागला. मग पुण्य नगर जें **जिरूसिलम** तें घ्यावयास सोपें व्हावें ह्मणून, पूर्वीं **आस्केलन** शहर घ्यावें असा **इंग्लिश** सैन्यानें निश्चय केला. **सारासेन**† राज्यांत परम शूर असा जो **साला उदिन** राजा, तो त्यांचें निवारण करायाकरितां, तीन लाख फौज घेऊन वाटेवर राहिला होता. तो आपणाबराबर युद्ध करायास योग्य आहे असें पाहून **रिचर्ड** राजास फार आनंद झाला.

---

* पालेस्तिन प्रांतास सांप्रत इंग्रेजींत सिरिआ असें ह्मणतात. तेथें क्रिस्ताचे जन्म मृत्यु झाले ह्मणून त्या देशाचें नाव पुण्य भूमि असें पूर्वीं सांगितलें आहे.

† सारासेन ह्मणजे तुर्क लोक.

तेथें **इंग्लिश** योद्ध्यांचाच जय झाला. तो असा— प्रथम **रिचर्ड** राजा, आपले डावे उजवे बाजूंचे लोकांची धांदल झाली असें पाहून, आपण स्वतः सैन्याच्या पुढें जा-जाऊन लढाई पुनः चालू करिता झाला. या रीतीनें घोर **संग्राम** होऊन **सारासेन** लोक उद्विग्न आणि छिन्नभिन्न होऊन पळाले. या युद्धांत त्यांचे चाळीस हजार लोक पडले मग लवकरच **आस्कलन** शहर **रिचर्डाचे** स्वाधीन झालें; दुसरींही लहान लहान नगरें मग **रिचर्ड** राजास प्राप्त झालीं. या रीतीनें तो **जिरूसिलम** शहराजवळ पोंहों-चला, त्या वेळेस मोठ्या हर्षानें आपली फौज पाहून, त्या कामाविषयीं आपणास सामर्थ्य आहे कीं नाहीं, याचा वि-चार करूं लागला; तेव्हां त्यास समजलें कीं, आपलें सैन्य, दुष्काळ, श्रम आणि विजय, याहींकरून थकलें आहे; त्यास, आपण इच्छिलेलें युद्ध करायास शक्ति आणि उत्साह हीं राहिलीं नाहींत. यामुळें त्यास **सांला उदिनाशीं** तह करणें प्राप्त पडलें. **रिचर्डानें** त्याशीं बोलणें लावून ठर-विलें कीं, तीन वर्षेपर्यंत **पालेस्तिन** देशाचे समुद्रकांठचे गांव **क्रिस्तियना**जवळ असावे; आणि जे कोणी **क्रिस्तियन** **जिरुसिलमाचे** यात्रेस जातील त्यांस निरुपद्रव जाऊं द्यावें.

या युद्धापासून राजास किमपि द्रव्यलाभ न होतां के-वळ कीर्त्ति मात्र प्राप्त झाली. त्यानंतर **रिचर्ड** राजा देशीं यावयाचा बेत करूं लागला; मग वाटेनें त्याचें गलबत फुटून सैन्य नाहींसें झाल्यामुळें तो एकटा **जर्मनी** देशाचे वाटेनें यात्रेकऱ्याचा वेष घेऊन जात असतां, मार्गांत त्यास, **आस्त्रिया** देशींचा **ड्युक, लिओपोल्डा** नामें होता, त्यानें धरून पायांत बिड्या घालून कैदेंत ठेविलें. त्यानंतर ते-

थील राजा, **रिचर्डास** आपणापाशीं मागून घेऊन **लिओपोल्डावर** संतुष्ट होऊन त्यास कांहीं द्रव्य देता झाला. ज्या **रिचर्ड** राजाच्या कीर्त्तीनें जग व्यापिलें होतें, त्याची अशी अवस्था होऊन तो परतंत्र झाला. त्याची दशा काय झाली ती **इंग्लंड** देशचे लोकांस बहुत दिवसपर्यंत समजली नाहीं. याचें कारण असें कीं, त्या समयीं दूर देशची बातमी समजायाचें मोठें कठिण पडत असे. मग कांहीं दिवशीं **फ्रान्स** देशचे एके सारंगीवाल्यानें त्या राजाचा शोध लाविला अशी कथा आहे. एके दिवशीं त्या सारंग्यानें **रिचर्ड** राजा होता त्या किल्ल्याच्या बाहेर राहून सहज त्यास पूर्वीं आवडत होती ती गत वाजविली. त्या वेळेस **रिचर्ड** राजानेंही आंतून तीच गत वाजविली; तेव्हां तो समजला कीं राजा एथें आहे.

शेवटीं ती गोष्ट **इंग्लिश** लोकांस समजून त्यांनीं त्या राजाशीं तहाचें बोलणें लाविलें. त्या वेळेस तोही समजला कीं, **रिचर्ड** राजास आतां सोडलें नाहीं तर कठिण पडेल. मग **इंग्लिशांनीं** त्यास १५०००० मार्क ह्मणजे ३००००० पौंड द्यायाचा करार केला. ते त्यांनीं दिले तेव्हां, **रिचर्ड** राजा कारागृहांतून मुक्त झाला.

**रिचर्ड** राजा बहुत क्लेश पावून पुनः स्वदेशीं आला, हें पाहून लोक परम हर्ष पावले. तें पाहून तोही संतुष्ट होत्साता **लंडन** शहरांत मोठ्या उत्साहानें प्रवेश करिता झाला. तेव्हां लोकांनीं मोठा समारंभ केला होता तो पाहून त्याचे बरोबर **जर्मनी** देशचे **लार्ड** आले होते ते ह्मणाले कीं हे लोक इतके धनाढ्य आहेत असें ठाऊक असतें तर आमचे राजानें **रिचर्डास**, इतका थोडा पैका घेऊन सोडलें

नसतें. त्यानें मग **विंचेस्तर** शहरांत पुनः आपल्यास राज्याभिषेक करविला. नंतर **नातिंगम** शहरांत एक मोठी सभा करून सर्वांस विदित केलें कीं, बंदींतून माझी मुक्तता होऊं नये, याविषयीं माझा भाऊ **जान** यानें उद्योग केला; आणि तो आतां त्या बेतानें **फ्रान्स** देशास गेला आहे, याकरितां त्या दुष्टाचें सर्व राज्य मी जप्त करून घेतों. परंतु पुढें त्यानें त्या अपराधाची क्षमा केली, आणि असें बोलिला, कीं "जसा माझा भाऊ, मी क्षमा केली हें लवकरच विसरेल, तसा त्याचे अपराधाचा मला विसर पडेल तर बरें होईल."

**रिचर्ड** राजाचे मृत्यूचें कारण विचित्र झालें. तें असें, राजाचे प्रजांतून एकाचें **फ्रान्स** देशांत शेत होतें, तेथें त्याचा चाकर खणीत असतां त्यास द्रव्याचा एक ठेवा सांपडला. तें द्रव्य आपणास जिरावें ह्मणून त्यानें त्यांतून कांहीं राजाजवळ पाठवून दिलें. परंतु **रिचर्डानें** आपण राजा ह्मणून आपणास सर्वांचा अधिकार आहे, असा विचार करून तें सर्व सरकारांत आणायाचा हुकूम केला. तो त्यानें ऐकिला नाहीं ह्मणून, तें द्रव्य जेथें ठेविलें होतें त्या **शालस** किल्ल्यास जाऊन वेढा घातला. तो वेढा घातल्याचे चवथे दिवशीं राजा सकाळीं घोड्यावर बसून कोठून हल्ला करावा हें पाहायाकरितां चालला होता; इतक्यांत कोणीएक **बेत्रामंडो गौर्दन** ह्मणून होता, त्यानें तीर मारिला, तो त्याचे खांद्यास लागला. ती जखम कांहीं मोठी नव्हती, परंतु कोणीएका मूर्ख वैद्यानें तो तीर काढायाचा उद्योग केला, तेव्हां ती जडावून राजास मृत्यूचीं चिन्हें होऊं लागलीं. त्यानें आपला अंतकाळ जवळ आला असें पाहून

मृत्युपत्र केलें. त्यांत सर्व राज्य **जान** नामें भाऊ होता त्यानें करावें असें लिहून ठेविलें, आणि जामदारखान्याचाही त्यासच अधिकारी केला. परंतु त्यांतील चौथा हिसा द्रव्य मात्र चाकरांस वांटून दिलें. त्यानें आज्ञा केली की, ज्यानें मला तीर मारिला त्यास माझे पाशीं घेऊन या. त्यास जवळ आणिल्यानंतर त्यानें विचारिलें, "अरे, तूं मला निरर्थक मारिलें याचें कारण काय? मी तुझा असा अपराध काय केला?" तो बोलिला राजा ऐक, "तूं माझा बाप आणि दोघे भाऊ यांचा जीव घेतला, आणि मलाही फांशीं द्यायाचा तुझा बेत होता. आतां मी तुझ्या हस्तगत झालों आहें, तूं मला मारून माझे अपराधाचें शासन कर, तें भोगून मला सुखच होईल; कारण या विश्वांतून तुझ्यासारिखा दुष्ट राजा काढून टाकिला एवढा माझे हातून लोकांवर उपकार घडला." हें उत्तर ऐकून **रिचर्ड** राजा विस्मित होत्साता त्यास १०० **शिलिंग** देऊन सोडून द्यावें, अशी आज्ञा देता झाला; परंतु त्याचा **मार्केडी** नामें घातुक सरदार होता त्यानें तें न ऐकतां, जीवंतपणींच त्याचे अंगावरची चामडी काढून त्यास फांशीं देऊन मारून टाकिलें.

**रिचर्ड** राजा राज्य करूं लागल्यापासून दाहावे वर्षी मृत्यु पावला. त्या वेळेस त्याचे वयास बावन्नावें वर्ष होतें. त्यास **फिलिप** या नांवाचा एक पुत्र मात्र होता.



# प्रकरण १०

## जान राजाची कथा.

संन् ११९९ पासून १२१६ पर्यंत.

**जान** राजा सिंहासनारूढ होतांच, लागलाच तो आपल्या पुतण्याचें* जें लहानसें राज्य होतें, तें घ्यायाचा उद्योग करूं लागला. त्यामध्यें गर्व आणि दौरात्म्य हे मोठे दुर्गुण होते; त्यांहींकरून लोकांची त्यावर किमपि प्रीति नव्हती. त्याचा पुतण्या **आर्थर** सर्व राज्याचा वास्तविक अधिकारी असतां त्यास कैदेंत ठेवून त्यानें आपले हातें त्यास मारिलें; ह्मणून लोकांस त्याचा फारच कंटाळा आला.

प्रजांस त्याचा संताप येई खरा, परंतु त्याची सत्ता नाहींशी करवेना. पुढें दुर्दैवानें असें घडलें कीं, सभासद लोकांत परस्पर वैर पाडायाचा त्यामध्यें गुण नव्हता ह्मणून तेच त्याचे शत्रु झाले. कांहीं दिवस धर्मपक्षी, राजाची दरकार न ठेवितां, स्वतंत्रपणें वागत असत, आणि त्यांच्या नेमणुका **पोपच** करीत असे; त्याच्या मात्र आज्ञा ते मानीत असत. परंतु **आर्चबिशपाचे** नेमणुकीविषयीं धर्मपक्षी, आणि **आगुस्तिनाचे** मतानुसारी जे महंत, त्या दोघांमध्यें तंटा होत असे. **आर्चबिशपाचे** नेमणुकीविषयीं त्या दोघांसही अधिकार आहे याविषयीं पूर्वीचें भोग्य होतें. **जान** राजानें **बिशपांचा** पक्ष धरिला, आणि आपले स्वारींतले दोन **नैट** त्या महंतांस मठांतून लावून द्यायाकरितां आणि त्यांचा सर्व

---

* पूर्वी जिओफ्री ह्मणून रिचर्ड राजाचा भाऊ सांगितला, त्याचा मुलगा आर्थर नामें होता तो.

वसूल जप्त करायाकरितां पाठविले. असें वैमनस्य पडलें तें **पोपास** केवळ अनिष्ट नव्हतें; ह्मणून त्या दोन पक्षांच्या मुख्यांनीं जो पुरुष नेमिला होता तो टाकून त्यानें तिसराच एक **स्तीफन लांग्तन** या नांवाचा पुरुष **आर्चबिशपाचे** जाग्यावर नेमिला. तो राजास अनुकूळ झाला नाहीं ह्मणून सर्व राज्यास **पोपानें** बहिष्कार घातला. हें भयंकर कर्म पाहून लोक फार भय पावले. कारण कीं, लोकांचे चित्तांत ही गोष्ट फार वाईट झाली असें वाणलें. मग ईश्वरभजन* बंद झालें; **बाप्तिस्म्या**† वांचून इतर सर्व संस्कार होईनात; देउळाचे दरवाजे लागले; महंताच्या मूर्ति रस्त्यावर पडूं लागल्या; प्रेतास पुरायाचा संस्कार न करितां, तीं खाड्यांत किंवा रस्त्यावर पडायाचा प्रारंभ झाला; असा अनर्थ झाला.

त्या वेळेस राजा **जान** परम संकटावस्थेंत पडला. अशी गोष्ट सांगतात कीं, आपल्या मौर्ख्येंकरून संतप्त, प्रजांविषयीं साशंक, आणि जो दिसेल त्याविषयीं शत्रुबुद्धि, असा होत्साता तो एके रात्रीस **नातिंगम** शहरचे किल्ल्यांत चिंता करीत एकटाच बसला होता; आणि जवळ कोणास येऊं देईना. पुढें आपलें राज्य **पोपानें फ्रान्स** देशाचे राजास दिलें, आणि तें घ्यायाकरितां तो तयारी करितो आहे; असें ऐकून त्याच्या मनांत किती भय वाटलें असेल

* ईश्वरभजन ह्मणजे आदितवार इत्यादि पर्वणीस देवळामध्यें एक धर्मपक्षी उभा राहून ईश्वराचे गुण वर्णितो, आणि इतर लोक बसून ऐकतात तें.

† बाप्तिस्मा ह्मणून एक संस्कार आहे; जो झाला असतां ख्रिस्तियन धर्माचा अधिकार येतो.

बरें! तसें असतांही शत्रूंचा पराजय करावयाविषयीं यत्न करायास तो समर्थ झाला. तें असें– तो लोकांस फार अप्रिय होता खरा, परंतु **इंग्लिश** आणि **फ्रेंच** यांमध्यें मुळापासून वैर होतें; **जानास** राजा असें ह्मणत असत; आणि त्यास तेव्हां कांहींसें सामर्थ्यही होतें; या कारणामुळें त्यापाशीं साठ हजार फौज जमली; इतकी फौज त्या कामास पुष्कळ होती, परंतु ती भरंवसा ठेवायाजोगी नव्हती. ही सेना घेऊन तो **दोवर** शहरास निघून गेला. त्या वेळेस सर्व **युरोप** देशचे लोक, दोहींकडची तयारी झाली ईपासून पुढें काय होतें पाहावें ह्मणून उत्सुक झाले. तेव्हां असा प्रसंग आला होता कीं, त्या युद्धापासून धर्मपक्षाचा नाश व्हावा, किंवा वृद्धि व्हावी. परंतु **फिलिप** आणि **जान** या दोघांतून एकासही **पोपा** इतकें शहाणपण नव्हतें. त्या समयीं **पोपानें** अशी मसलत केली कीं, दोघांसही ठकवून आपलें काम साधलें. त्यानें आपले वकिलाबरोबर **जानास** सांगून पाठविलें कीं, तुला हें संकट प्राप्त झालें आहे यापासून मुक्त व्हायाचा उपाय एकच; तो असा कीं, **पोपास** शरण जावें. मग तें ऐकून **राजानें** शपथ घेतली कीं, **पोप** जशी आज्ञा करील त्याप्रमाणें मी चालेन. या रीतीनें, आज्ञा काय करणार ती राजास न कळवितां, त्याकडून शपथ घेववून, मग त्या युक्तिवान **पोपानें** कारभारी लोकही असेच मथविले. नंतर राजास असें भय घातलें कीं, तेणेंकरून राजानें सर्व लोकांचे समक्ष गुडघे टेकून आपले हात **पोपाचे** आश्रिताचे हातून धरवून चमत्कारीक शपथ घेतली. अशी चमत्कारिक गोष्ट दुसरे कोणतेही बखरेंत आढळत नाहीं. ती शपथ अशी–

"ईश्वरेच्छाकृत **इंग्लंड** देशाचा राजा, आणि **अयर्लंडाचा** प्रभु मी **जान**, आपली पातकनिवृत्ति व्हायाकरि-
"तां, स्वेच्छेनें आणि सरदाराचे विचारानें, सर्व राज्याधि-
"कारासहित **इंग्लंडाचें** राज्य, **रूमाचे** धर्मपक्षास ह्मणजे
"**पोप इनोसेंट**, आणि त्याचे पदवीवर पुढें जे होतील ते, यांस
"अर्पण करितों. आजपासून मी **पोपाच्या** सेवकभावेंक-
"रून राज्य करीत जाईन. मी, ईश्वर आणि **रूमाचा**
"धर्मपक्ष ह्मणजे माझा प्रभु जो **पोप** तो, आणि त्याचे स्था-
"नीं पुढें जे होतील ते, यांजवळ विश्वासानें वर्तेन. मी
"त्यांस दरवर्षास एक हजार **मार्क** स्वामित्व देईन;
"**इंग्लंडाचे** राज्याकरितां सातशें, आणि **अयर्लंडा**करितां
"तीनशें." या रीतीनें **पोपास** शरण जाऊन, आणि **लांगटनाला आर्चबिशपाचे** जागीं स्थापायाचा करार करून
तो आपलें राज्य पावता झाला.

राजानें जो करभार देऊं केला होता तो, त्या **पोपाच्या** आश्रिताचे पायांपुढें नेऊन ओतला; तो त्यानें अंगिकारिला त्या समयीं राजानें मुकुट धारण केला. अशा निंद्य रीतीनें शरण जाऊन राजा आपल्यावर तोव्रत आली होती तीपासून सुटला; परंतु पुढें दुष्कर्मे आणि निरूपयोगी साहसें केल्यामुळें तो सर्वांस अप्रिय झाला.

कारभारी त्याचा घात करायाविषयीं कांहीं बेत करायाच्या मसलतींत बहुत दिवस होते; परंतु कितीएक विपरीत गोष्टी घडून त्यांची मसलत सिद्धीस गेली नाहीं. शेवटीं ते बळानें चढून जाऊन **स्टाम्फोर्ड** शहरांत पुष्कळ लोक जमा करून तेथून **ब्राक्ली** शहरास निघाले; तें शहर, **आक्सफर्डांत** त्या वेळेस जें दरबार असे, तेथून सुमारें

१५ **मैल** होतें. ते येतात असें ऐकून राजानें **क्यांतर्बरीचा आर्चबिशप**, **पेंब्रोकाचा अर्ल**, आणि दुसरे आपले मंत्री, यांस त्यांकडे पाठवून, विचारिलें कीं, तुह्मी स्वतंत्रपणा जो मागतां तो आहे तरी काय तें सांगा! तेव्हां त्यांनीं आपले दाव्याचे कलमांची याद करून दिली. तीं कलमें **हेनरी** आणि **एड्वर्ड** यांचे राज्यांत जे नियम ठरले होते त्यांप्रमाणें होतीं. ती याद पाहातांच राजा अतिशय संतप्त होऊन बोलिला कीं, त्यांनीं माझें राज्य कां मागितलें नाहीं? आणि त्यानें शपथ केली कीं, असे अमार्गाचे प्रार्थनेविषयीं मी कधींही संमति देणार नाहीं. परंतु त्या वेळीं त्याचे शत्रूंचा पक्ष असा दृढ झाला होता कीं, त्यांस राजाचे क्रोधापासून कांहीं भय वाटलें नाहीं. मग त्यांनीं **राबर्ट फिझ्वाल्टर** या नांवाचा एक पुरुष आपला सेनापति केला; आणि त्यास "ईश्वरी सैन्याचा आणि पुण्यवंत धर्मपक्षाचा सरदार" अशी पदवी देऊन राजाशीं युद्ध करायाचे बेतानें **नर्थंपटन** शहरास वेढा घातला, आणि **बेट्फोर्ड** शहर घेऊन **लंडन** शहरास गेले, तेथें लोकांनीं त्यांचा संतोषानें आदर केला. जे कोणी अमात्य आणि दुसरे गृहस्थ त्यांच्या पक्षास मिळाले नव्हते, त्यांस त्यांनीं पत्रें लिहिलीं; आणि ज्यांनीं नाहीं ह्मटलें किंवा कांहीं बयाद लाविली त्यांचीं घरेंदारें लुटिलीं.

राजा **जान** हें पाहून भयभीत होत्साता, तो विषय **पोपानें** किंवा आठ सभासदांनीं निवडावा; आणि त्या आठांत चार आपण नेमावे, आणि चार त्यांनीं नेमावे; या गोष्टीस कबूल झाला. परंतु हें शत्रूंच्या मनास येईना. मग राजानें त्यांस सांगून पाठविलें कीं, तुह्मी जें मागतां तें मी

विचार करून संतोषानें देईन. याकरितां सर्व योजना करून एक तहनामा तयार केला. **स्तेन्स** आणि **विंद-सोर** या दोन शहरांचे मधली जमीन, जीस **रनिमीड** असें ह्मणतात, तेथें सभासदांस राजाच्या वकिलांनीं येऊन भेटावें असें ठरविलें. तेथें प्रथम स्वतंत्रतेचा झेंडा पुरला, ह्मणून त्या जमिनीस लोक अझून भक्तीनें मानितात. त्या ठिकाणीं ते सभासद पुष्कळ **नैट** आणि योद्धे घेऊन संन १२१५ चे सालीं **जून** महिन्याचे १५ तारिखेस जाऊन राहिले. मग दोन दिवसांनीं मागून राजाचे वकील जाऊन पोहोंचले. दोनही पक्षांचा युद्धासारिखा तळ पडला. ते सभासद कसा तरी आपला मतलब सिद्धीस जावा असें इच्छीत होते, ह्मणून कांहींच तोड ऐकेनात; आणि राजाचे वकिलांसही आंतून त्यांच्या पक्षाचा अभिमान होता, ह्मणून त्या दोघांमध्यें विशेष तंटा पडला नाहीं. शेवटीं त्या दोघांनीं एक नियमपत्र केलें. कांहीं दिवसांनीं राजानें त्यावर सही करून आपली मोहर केली. तो नियम अद्यापि यथास्थित चालत आहे. तो, **इंग्लिशांचे** स्वतंत्रतेचा आदिकारणभूत **माग्नाकार्टा**, या नांवानें प्रसिद्ध आहे. हा करार मोठ्या आग्रहानें ठरला; परंतु यापासून जे मुळचे स्वतंत्र होते त्यांस मात्र नवी स्वतंत्रता प्राप्त झाली; किंवा त्यांची त्यांजवळ काईम झाली असें ह्मणावें; ह्मणजे धर्माध्यक्ष, सभासद, आणि प्रतिष्ठित गृहस्थ यांस मात्र मिळाली. इतर जे गरीब वगैरे होते, त्यांस तर तेव्हांही राज सेवकपणापेक्षां विशेष कांहीं प्राप्त झालें नाहीं. पुढें पुष्कळ कालानंतर ते स्वतंत्र झाले.

त्या नियमानें आपल्या आचरणास किमाप प्रतिबंध हो-

ऊं नये याविषयीं राजा **जान** प्रथम उद्योग करूं लागला. यामुळें आंतले आंत दुसरी लढाई उत्पन्न झाली; त्या वेळेस सभासद **फ्रानस** देशचे राजाजवळ सहाय्य मागायाकरितां गेले. या रीतीनें **इंग्लंड** देश दोहींकडून विपत्तींत पडायाचा समय आला. तो असा कीं, जर **जानाचा** विजय झाला, तर दुरात्मा आणि क्रूर अशा राजापासून जन्मवर दुःख भोगिलें पाहिजे; आणि जर **फ्रेंच** राजा झाला तर, देश त्या बळकट राजाचे स्वाधीन होऊन **फ्रानस** देशाचे ताबेंत यावें लागेल. अशी संकट अवस्था प्राप्त झाली असतां, जें मनुष्याचे बुद्धीस सुचायाचें किंवा समजायाचें नाहीं, तें अकस्मात् घडून सर्वांचें कल्याण झालें.

तें असें, **जान** राजानें राज्य घेण्याकरितां शेवटची एक लढाई मारावी ह्मणून पुष्कळ फौज जमाविली आणि तींतून बहुत योद्धे घेऊन राज्याचे आंत प्रवेश करायाची मसलत केली. तो याच बेतानें **लिन्न** शहरांतून निघून **लिंकन** प्रांताकडे चालिला. **लिन्न** शहरचे लोकांवर त्यानें उपकार करून तें वाढविलें होतें. तो जात होता ती वाट समुद्र कांठानें होती. तेथें भरती आली, हें न समजून किंवा त्या ठिकाणीं भरती केव्हां येते हें न कळल्यामुळें, त्या पाण्यांतून जात असतां त्याच्या गाड्या, पैका, आणि सामानसुमान सर्व वाहून गेलें. राजा स्वतः मात्र मोठ्या संकटानें निभावून **स्विनस्लेद** शहरचे मठांत येऊन राहिला. तेथें आपला नाश झाला, आणि आपल्यास विपत्ति प्राप्त झाली हें दुःख वारंवार मनांत आल्यामुळें त्यास ताप येऊं लागला. दुसरे दिवशीं त्यास घोड्यावर बसायाची शक्ति राहिली नाहीं ह्मणून पालखींत बसवून **सिफर्डाचे** किल्यांत

नेलें; तेथून **न्युआर्कांत** पोहोंचविलें; तेथें तो आपलें मृत्युपत्र करून मरण पावला. या वेळेस त्याचें वयास एकावन्नावें वर्ष होतें. त्यानें अठरा वर्षेंपर्यंत निंद्य रीतीनें राज्य केलें.

## प्रकरण ११.

### तिसऱ्या हेनरी राजाची कथा.

संन् १२१६ पासून १२७२ पर्यंत.

**जान** राजा मरण पावल्यानंतर, त्याचा पुत्र नऊ वर्षांचा **हेनरी** नामें होता, त्यास राज्य पदावर बसवावें अशी मसलत झाली. **पेंब्रोकाचा अर्ल**, ज्यानें **जान** राजाची मोठ्या विश्वासनें सेवा केलीहोती, त्यानें त्यास **विंचेस्तर** आणि **बाथ** या शहरांचे धर्माध्यक्षांकरवीं **ग्लोसेस्तर** शहरांत राज्याभिषेक करविला. या मुलाचा स्वभाव बापाच्यापेक्षां केवळ विपरीत होता. हा तारुण्यांत आला त्या वेळेस दयाळू मायाळू असा होता, हा सेवकांवर ममता करी; आणि शत्रूंस किमपि त्रास देत नसे. हा युद्धोपयोगी नव्हता; कारण, यामध्यें उद्योग आणि शौर्य हीं नव्हतीं; आणि यास लोक पुष्कळ ठकवीत; कां कीं, यामध्यें अविश्वास किंवा शंका हीं नव्हतीं.

भोळ्या राजांजवळ बहुधा खुशामती लोक असतात, व ते सांगतील तें राजे ऐकतात. या रीतीनें **हेनरी** राजा, प्रथम **ह्युबर्ट डिबर्ग** या नांवाचा एक पुरुष होता, त्यावर प्रीति करूं लागला; त्यानंतर त्याचे ठिकाणीं **विंचेस्तर** शहराचा धर्माध्यक्ष **पीटर डेरोश** होता त्यावर त्याची ममता बसली.

तो मुळचा **पाइटियर्स** शहरांतला राहाणारा. त्याची शौर्या- विषयीं आणि बुद्धीविषयीं कीर्ति असे. त्याची मसलत ऐकून **हेनरी** राजानें **पाइटियर्स** शहरांतले, तसेच दुसरे बाहेरचे लोक, बोलावून आणून आपले जवळ ठेविले. ते राजाचे मर्जीप्रमाणें वागूं लागले. मग सर्व पदव्या तशींच मोठमोठीं संस्थानें, त्या अज्ञानी लोकांस दिलीं. ते लोभी, गर्विष्ठ आणि दांडगे होते. असा राजाचा अयोग्य पक्ष- पात पाहून सभासद द्वेष करूं लागले; आणि त्यांनीं राजास कळविलें कीं, हे परकी आले आहेत यांस जर तूं आपल्या राज्यांतून काढून टाकणार नाहींस, तर त्यांला आणि तुला आह्मी मुलखांतून बाहेर लावून देऊं. त्यांचा क्रोध नुक- ताच कमी होत होता, इतक्यांत दुसरी एक परदेशी यांची टोळी **गास्कनी*** प्रांतांतून आली. राजाच्या उ- धळेपणाविषयीं लोक अगोदरच कुरकुरत होते, आणि त- शांत राजानें कितीएक महाद्वीपांत लढाया आरंभिल्या त्यांत त्याचा पराजय झाला, त्यामुळें लोकांचा द्वेष अधिकच वाढला. शेवटीं राज्य त्या अशक्त राजापासून सोडवाया- करितां **सैमन मांतेफर्ड**, **लेसेस्तराचा अर्ल** राज्य रीतींत फेरफार करायाचा उद्योग करूं लागला. या गृहस्थाचा बाप **आल्बिजन्सी**† लोकांशीं युद्ध झालें त्या वेळेस सैन्या- चा सरदार होता- (ज्या आल्बिजन्सी लोकांचा, **रोमन** धर्म सोडिला ह्मणून, पूर्वी **सेवाय** मुलखांत मोठा नाश झाला होता.) त्या **अर्लास** राजाची बहीण दिली होती. त्याचे पराक्रमानें आणि सुवृत्तानें त्यास प्रजा अनुकूळ होत्या.

---

* गास्कनी ह्मणून फ्रान्स देशांत एक प्रांत आहे.

† आल्बिजन्सी ह्मणून त्या काळीं एके मताचे लोक होते.

त्यानें मोठें बंड केलें, तें **प्रथम पार्लमेंटाचे*** सभेंत प्रगट झालें. तेथें सभासद युद्धाचा वेष करून गेले होते. मग राजा तेथें गेला तेव्हां त्यानें विचारिलें कीं, तुमचे मनांत काय आहे? त्यावर त्यांनीं नम्रतेनें उत्तर केलें कीं, आह्मी जीं दुःखें भोगितों तीं आपण दूर करावीं; मग सुखानें राज्य कारभार चालवावा, असें आमचे मनांत आहे. राजा जें कोणी मागेल तें होय ह्मणत असे. त्यानें सांगितलें कीं, चिंता नाहीं, तुमचें ज्या रीतीनें कल्याण होईल, त्या रीतीनें मी वर्तेन. त्यानंतर राज्य रीति कशी असावी, आणि मुख्य मुख्य कारभारांवर कोण कोण गृहस्थ नेमावे, हा विचार करायाकरितां राजानें **आक्सफर्ड** शहरांत **पार्लमेंटाची** सभा केली. तेथें पूर्वीचे राजनियम नूतन करायाविषयीं उद्योग चालिला; त्या वेळेस सर्व अख्त्यार त्यांकडे देऊन चो-

---

* पूर्वीं सांगितलें आहे कीं, इंग्लंड देशाचा राज्य कारभार तिघांचे संमतानें होतो. त्यांत एक राजा; दुसरे राज्यांतील वंशपरंपरागत सभासद ह्मणजे ड्युक, मार्कुइस, अर्ल, इत्यादिक, आणि मुख्य धर्माध्यक्ष; आणि तिसरे, प्रजांचे प्रतिनिधि. प्रतिनिधि शब्दाचा अर्थ एकानें जें कार्य करावयाचें तें करणारा जो कोणी तो. हे प्रतिनिधि दर प्रांतांतून दोन, दोन, व दर बरोंतून दोन असे येतात. यांची सभा राजाचे मर्जीस येईल तेव्हां होते, व यांस निरोप देण्यासही राजास अधिकार आहे. सभासद जेथें बसून विचार करितात त्या घराचें नांव लार्डांची सभा; आणि प्रतिनिधि बसतात त्याचें प्रतिनिधि सभा. प्रथम सभेंतील लोकांची संख्या नियमित नाहीं. परंतु प्रतिनिधि सभेंत सुमारें ६०० असतात. सर्व विषयांचा विचार या दोन सभांत पुरतेपणीं होऊन राजास संमत झाला ह्मणजे तो राज्यांत चालतो. त्यास राज्य नियम, व राज्य कायदा, असें ह्मटलें आहे. या तिहींचे मिळून एक नांव पार्लमेंट.

वीस सभासद नेमिले. त्यांनीं, पूर्वीं जो काय राज्यांत बखेडा झाला असेल, तो पाहून नीट करावा असें ठरविलें. **लेसेस्टर** त्यांमध्यें मुख्य केला. त्यांच्या कारभारानें सर्व राज्य विपरीतच होऊन गेलें. राजाचे जुने कारभारी पदच्युत झाले; आणि त्यांचे स्थानीं हे आपण काम करूं लागले; त्यांनीं राजाचीच सत्ता कमी केली असें नाहीं; तर एका एका **सेशनाचे** वेळेस ह्मणजे **पार्लमेंटाची** सभा होते त्या वेळेस, सर्व **पार्लमेंटाचा** अखत्यार बारा बारा गृहस्थांस देऊन, **पार्लमेंटा**चाही उपयोग नाहींसा केला.

नंतर राज्यांत ज्यांचा नुकताच अंमल चढत चालिला होता, अशांपासूनच प्रथम या अन्यायांचा बंदोबस्त झाला. हें करणारे लोक प्रांतांतले **नैट**. ते दुसऱ्या एक वेगळ्याच वाड्यांत पूर्वीं कांहीं दिवस बसत असत. ते ह्मणूं लागले कीं, जे कारभारी कायदे करितात, त्यांपासून त्यांची मात्र सत्ता आणि हित हीं वाढतात. पुढें त्या **नैटांनीं** राजाचा पुत्र **एड्वर्ड** होता, त्याजवळ बोलणें लाविलें कीं, तूं तरी राज्य बुडतें हें आपले सामर्थ्यानें राख.

त्या वेळेस राजपुत्र **एड्वर्ड** याचें वय बावीस वर्षांचें होतें. त्यामध्यें सामर्थ्य आणि सद्गुण असे होते कीं, त्यांवरून तो राज्य कारभार मोठ्या विचक्षणतेनें करील, आणि पुढें कांहीं तरी मोठा पराक्रम करून आपले बापाचा भ्याडपणा मागें पाडील, असा लोकांचा निश्चय झाला होता. त्यानें लहानपणींच शौर्य, चतुरपणा, आणि स्थिरबुद्धि, यांची प्रचीति दाखविली. पहिल्यानें लोकांनीं त्याची प्रार्थना केली, तेव्हां तो ती मनास आणीना; शेवटीं आपण संमति द्यावी

असें त्याचे मनांत आलें. मग आणखी एकवेळ **पार्लमें-टास** बोलावणें केलें आणि राजा पूर्ववत आपला अंमल दाखवूं लागला. या कारणामुळें दुसरी एक आंतले आंत लढाई उत्पन्न झाली; तीमध्यें **लेसेस्तरानें** विजय मिळविला. त्या वेळीं राजा कैदेंत पडला. परंतु थोडे दिवसांनंतर त्या **लेसेस्तरानें एड्वर्डास** ओलीस घेऊन राजास सोडिलें.

अशा सर्व गोष्टी अनुकूळ होत्या तरी, **लेसेस्तराच्या** मनांत भय होतें कीं, कोणी परकी राजे एकत्र जमून मला अपाय करितील, तशीच त्याचे मनांतही ही शंका होती कीं, राजपक्षी लोक कांहीं संधान करून आपणास दुर्दशेंत पाडितील. ह्मणून त्यास प्रजांचा आश्रय करावा लागला. ही गोष्ट **इंग्लंडांत** पूर्वी ठाऊक नव्हती. त्यानें नवें एक **पार्लमेंटास** बोलावणें करून सभा केली; त्यांत आपले पक्षाचे सभासद, तसेच जे राज्यसंबंधी कामाशीं असंबद्ध धर्माध्यक्ष होते, तेही बोलाविले; आणि दुसरें असें केलें कीं, एक एक प्रांतांतून दोन दोन **नैट** पाठवावे, आणि **बरो*** पासून दोन दोन प्रतिनिधि पाठवावे. **बरो** या जातीचे शहरास राज्य कारभारांत अंमल असावा, ही गोष्ट तोंपर्यंत हलकी वाटत असे. **इंग्लंडांत हौस आफ कामन्स** ह्मणजे प्रतिनिधि सभा प्रथम या रीतीनें उत्पन्न झाली.

त्या **पार्लमेंटांत** जे कोणी **लेसेस्तराचे** पक्षाचे सभासद होते, त्यांसही त्याचा अतिलोभ पाहून संतोष झाला नाहीं; त्या वेळेस पुष्कळ लोकांस पक्कें समजलें कीं, धनी बदलला ह्मणजेच केवळ सुख होतें असें नाहीं, याकरितां

---

* जेथें राजाचा अंमलदार व परगण्याचा न्यायाधीश असतो त्या गांवास बरो ह्मणतात.

पूर्ववत् राजाच्या हातून राज्य कारभार चालेल तर बरा. सर्व लोकांस संमत जी गोष्ट ती आपल्याच्यानें मोडवणार नाहीं, असें पाहून **लेसेस्तर** स्वेच्छेनेंच त्या गोष्टीस कबूल झाला. त्यानें मग **एड्वर्डास** कैदेंतून काढून **वेस्तमिनस्तर** वाड्यांत पोंचविलें; तेथें सर्व सभासदांचे एकमतानें त्यास मोकळीक प्राप्त झाली. **लेसेस्तरानें** राजपुत्रास मुक्त केलें, एवढी कीर्ति मात्र मिळविली; परंतु तो संधानी असा होता कीं, त्यानें त्याजवळ आपले बातमीदार ठेवून, तो काय काय करितो याची चौकशी राखिली होती; आणि तो जो जो बेत करी तो तो चालू देत नसे.

**एड्वर्ड** राजानें असें ऐकिलें कीं, **ग्लौसेस्तराचा ड्युक** आपला पक्ष घेऊन युद्ध करायास सिद्ध आहे. मग चौकी पाहारा होता त्यापासून सुटून त्या **ड्युका**जवळ जाऊन, त्यानें तत्पक्षी लोकांचें मुख्यत्व स्वीकारिलें. त्यानंतर **लेसेस्तर** आणि राजपुत्र या दोघांमध्यें युद्ध झालें; त्यांत **लेसेस्तराची** फौज, **वेल्स** प्रांताचे डोंगरावर दुष्काळानें दुर्बळ झाल्यामुळें **एड्वर्ड** राजाचा प्रबळ हल्ला सहन करायास समर्थ झाली नाहीं. राजपुत्रानें ती लढाई मोठ्या निकरानें केली. त्या भयंकर दिवशीं **लेसेस्तरानें** मोठें शौर्य दाखविलें; आणि दोन प्रहर दिवसापासून आठ घटिकापर्यंत एकसारिखा युद्धाचा आवेश धरिला. शेवटीं तो ज्यावर बसला होता, तो घोडा मेल्यामुळें, त्यास पायीं लढाई करायाचा प्रसंग आला. त्या वेळेस त्यानें क्षमा मागितली; परंतु त्यास शत्रूंनीं सोडिलें नाहीं. त्या काळीं लोक असेच दुरात्मे असत. म्हातारा **हेनरी** राजा लढाईंत पुढें होता त्यास खांद्यावर वार लागला. तें त्याचे लो-

कांस समजलें नाहीं, त्यामुळें एक शिपाई त्यास ठार मारा- याच्या बेतांत होता; इतक्यांत तो मोठ्यानें ओरडला कीं, "मी **विंचेस्तराचा हेनरी** राजा आहें." हे शब्द ऐकून त्याचे सेनेंतले एके **नैटानें** जाऊन त्यास वांचविलें. राज- पुत्रही आपल्या बापाचा स्वर ऐकतांच तो होता तेथें गेला, आणि त्यास निर्भय अशे ठिकाणीं नेऊन ठेविता झाला. **लेसेस्तराचें** शरीर जीं प्रेतें पडलीं होतीं त्यांत सांपडलें. तें **राजर मार्टिमर** ह्मणून परम दुष्ट पुरुष होता त्यानें फाडिलें; आणि मोठ्या उत्साहानें राजाचे विजयाचें चिन्ह असें करून, तें त्याचे बायकोजवळ पाठवून दिलें.

राजपुत्र या रीतीनें निर्बाध जय पावून प्रजांस सुखी करिता झाला. त्या काळीं आपलें राज्य केवळ निर्भय झालें पाहून, त्यानें धर्मयुद्धास जायाचा बेत आरंभिला. हें कर्म तेव्हां सर्व लोकांस मोठें स्तुत्य असे. हा विचार मनांत दृढ करून **त्यूनिस** शहराजवळ **फ्रान्स** देशाचा राजा **लुइस** सैन्य घेऊन होता, तेथें जायाकरितां राजपुत्र पुष्कळ फौज जमवून गलबतांत बसून निघाला; परंतु तेथें पोंचा- याचे पूर्वींच तो धर्मात्मा **लुइस** राजा मृत्यु पावला, अशी बातमी त्यानें ऐकिली. असें असतांही **एड्वर्ड** राजापुढें जाऊन खुशालपणीं पुण्य भूमीस पोहोंचला. तो **इंग्लंड** देशांतून निघून गेल्यावर, मागें लागलीच वृद्ध राजाची शरीर प्रकृति क्षीण होत चालिली, तेव्हां त्या **हेनरी** रा- जानें, आपली आणि राज्याची शक्ति या दोनही कमी होत चालिल्या असें पाहून पुत्रास लागलेंच निघून यावें, ह्मणून पत्रें पाठविलीं. शेवटीं राज्याची खबरदारी ठेवणें, आणि वार्द्धक्यामुळें झालेली अशक्तता, यांहींकरून त्रास पावून

आपल्यास, लहान लाहान मजला करून, **सेंटएड्वर्ड** स्थळापासून **वेस्तमिन्स्तरास** नेऊन पोंचवायाचा हुकूम केला. तेथें तो पोहोंचला त्याच रात्रीं मरण पावला. त्या वेळेस त्याचे वयास चौसष्ट वर्षें होतीं. त्यानें राज्य छपन्न वर्षें केलें. इतकें कोणीं दुसऱ्या राजानें केलें असें **इंग्लंड** देशाचे अखरींत नाहीं.

## प्रकरण १२.

### पहिल्या एड्वर्ड राजाची कथा.

संन् १२७२ पासून १३०७ पर्यंत.

**हेनरी** राजा आपण मरायाचे पूर्वी प्रजांस वश करायाविषयीं निरर्थक यत्न करीत असतां राज्याचा पुढील अधिकारी जो त्याचा पुत्र **एड्वर्ड**, तो पुण्य युद्धांत गुंतला होता. तेथें त्यानें **इंग्लिश** नांवास मोठी प्रतिष्ठा मिळविली; आणि जे **क्रिस्तियन** धर्माशीं विरुद्ध होते, त्यांस भयभीत केलें. तो एके दिवशीं आपले रावटींत बसला होता इतक्यांत कोणेएके मुसलमान **आसासीनानें*** येऊन त्यावर वार केला, तो बरा व्हायास मोठें संकट पडलें. कितीएक असें ह्मणतात कीं, त्याची राणी **एलिनोरा** होती तिनें आपल्या जिवाची आशा सोडून, त्या घायांतून विष चोखून घेऊन राजास वांचविलें.

**एड्वर्ड** राजास निर्विवादपणें राज्य प्राप्त झालें ह्मणून प्रतिकूलपक्षी कमी होत चालिले. सभासदांचें बहुत दिवस आंतले आंत वांकडें होतें; परंतु सर्वांची या गोष्टीविषयीं

---

* आसासीन ह्मणून एक मुसलमान लोकांत त्या वेळेस जाति असे.

मात्र संमति असे कीं, पोपाचा मान राखूं नये; कारण तो त्यांस किती दिवसपर्यंत दुःख देत असे. लोकही मठांत बहुत दंगा करीत, त्यावरून त्यांची धर्मपक्षपात्यांवर अप्रीति असें दिसून येई; परंतु हे सर्व परस्पर विरुद्ध मताचे लोक एका विचारास मान्य होते. तो हा कीं, सर्वांनीं राजाचा मान राखून त्याची आज्ञा मानावी. अशी लोकांची आपणावर प्रीति पाहून एडवर्ड राजाचे मनांत इंग्लंड आणि वेल्स हे दोन प्रांत एकत्र करावे असा बेत आला. वेल्स प्रांतांतील लोकांस वेल्श असें ह्मणतात. त्यामध्यें त्यांचेच जुने नियम, चाली, भाषा, आणि मतें हीं चालिलीं होतीं. ते पुरातन ब्रिटन लोकांचे जातीचे. मध्यें रोमनांचा आणि साक्सनांचा दंगा झाला त्यांतून चुकून, ते बाहेरचे प्रभूचे अमलाखालीं न राहतां, आपली स्वतंत्रता आणि देश रक्षून होते. त्यांची संख्या थोडी, यामुळें आपले सीमेशेजारच्या शत्रूंशीं मैदानांत लढाई करायास ते समर्थ नव्हते. ह्मणून ते वर चढायास उपाय नाहीं, अशा उंच पर्वतांचा बहुधा आश्रय करून असत. ते पर्वत त्या काळीं देशाचे स्वाभाविक रक्षक झाले. जेव्हां इंग्लंडांत आंतले आंत फूट पडे, किंवा फौज युद्धाकरितां बाहेर जाई, त्या वेळेस वेल्श लोक आपली अव्यवस्थित फौज घेऊन येत, आणि देशाचा नाश करीत. राज्यासभोंवतीं पुष्कळ वेगळीं आणि परस्परांशीं विरुद्ध अशीं संस्थानें असणें यासारिखें दुसरें वाईट नाहीं. या कारणामुळें एडवर्ड राजाचे मनांत ही गोष्ट फार दिवस होती कीं, ते लोक आपले ताब्रखालीं आणावे. ह्मणून त्यानें तेथील लुइलेन नामें राजा होता, त्यास येथें येऊन विश्वासाची शपथ घे ह्मणून आज्ञा केली. ती

त्या राजानें मानिली नाहीं, आणि सांगून पाठविलें कीं, मला तुह्मी निर्भयपणें परत सोडून द्याल, याविषयीं तुमचा मुलगा ओलीस दिला तर मी येईन. हा निरोप ऐकून राजास वाईट वाटलें नाहीं; कारण कीं, त्यास त्यावर हल्ला करायास आयतें निमित्त सांपडलें. मग तो फौज तयार करून **लुइलेन** राजाच्या राज्यांत मोठ्या शौर्यानें गेला.

**एडवर्ड** राजा आला असें समजतांच, **वेल्श** राजा **स्नौडनाचे** उंच डोंगरावर पळून गेला आणि लढाई न करितां तेथेंच निर्भयपणें दडून राहावें असा निश्चय करिता झाला. त्या पर्वतानें बहुत काळपर्यंत त्या राजाच्या पूर्वजांस **साक्सन** आणि **नार्मन** लोकांपासून संरक्षिलें होतें; परंतु एडवर्ड राजा शूर, आणि मसलतीही तसाच; ह्मणून त्यानें युक्तीनें मार्गाचा शोध लावून **लुइलेनाच्या** राज्याचे मध्यापर्यंत जाऊन, त्याची फौज जेथें पळाली होती तेथें प्रवेश केला. मग **लुइलेन** राजा त्यास शरण जाऊन स्वस्थानीं गेला. पुढें **मर्लिन** ह्मणून कोणी कवि होता, त्यानें असें भविष्य केलें कीं, **ब्रुटसाचें** राज्य **ब्रिटन** देशांत होतें, तसें **लुइलेन** राजा पुनः करील. यावरून त्या राजानें पुनः एक वेळ **इंग्लिशांशीं** युद्ध करायाचा उद्योग केला; आणि फौज घेऊन **राड्नर** प्रांतांत गेला. तेथें **वे** ह्मणून नदी आहे, ती उतरून त्याचें सैन्य जात होतें, आणि राजा त्या प्रांतांतले अमात्यांशीं मसलत करायास गेला होता; इतक्यांत **एड्वर्ड मार्तिमर** या नांवाचे **इंग्लिश** सरदारानें अकस्मात् येऊन त्या लोकांचा पराजय केला. **लुइलेन** राजा परत आल्यानंतर संतापानें शत्रूंच्या फौजेंत शिरला. तेव्हां, ज्या मृत्यूकरितां त्यानें इतका उद्योग केला होता, तो त्यास तत्क्षणीं

प्राप्त झाला. त्या हतभाग्य राजाचा भाऊ **डेविड** होता त्याचीही समाप्ति त्याच उद्योगांत झाली, आणि त्या बरोबर **वेल्स** देशाचें राज्य, तसाच त्याचा आणि **इंग्लंड** देशाचा भेद, या दोहोंचा नाश झाला. थोडे दिवसांनंतर तो **वेलसदेश इंग्लंडाचे** राज्यास मिळविला, आणि तो पर्गणा राजाचा वडील पुत्र असेल त्यास द्यावा असें ठरविलें. बाहेरचे देशांत विजय होतो, त्यापासून यशाचा मात्र लाभ; परंतु याजपासून राज्याचेंही कल्याण झालें. त्यानंतर **वेल्स** देशचे लोकांत **इंग्लिश** मिसळूं लागले; आणि कांहीं वर्षांनंतर पूर्वीचा जो परस्परांशीं द्वेष होता तो सर्व उभयतां विसरले.

नंतर **स्काट्लंड** देशाची **मार्गारेट** ह्मणून राणी होती ती मेली; तेव्हां **एड्वर्ड** राजास तोही देश आपले राज्यांत आणावा अशी इच्छा उत्पन्न झाली. त्या राणीच्या मृत्यूनंतर तेथील राजासनाच्या अधिकाराविषयीं फार कज्जे लागले. त्या राज्याविषयीं स्पर्धा करणारे असामी बारा होते. शेवटीं बारांचे तिहींवर आले: ते तीन **हंतिंग्डनाचे अर्लाच्या** तिघे मुलींकडचे वंशांतले होते. त्यांत **जान् हेस्टिंग्स** ह्मणून एकीचा मुलगा होता; तो आपल्या आईस राज्याधिकारचा विभाग होता ह्मणून राज्य माझें असें ह्मणे; दुसरा **जान बेलियल** तो आपण वडील मुलीचा नातू ह्मणून भांडे; तिसरा **राबर्ट ब्रुस** दुसऱ्या मुलीचा औरस मुलगा ह्मणून सत्ता करी. हा कज्या निवडायास **एड्वर्डा**जवळ गेला; तेव्हां त्यानें मोठ्या धारिष्टानें असा निवाडा केला कीं, राज्य सर्व माझें आहे; आतां मी आपला प्रतिनिधि **बेलियलास** करितों; त्यानें माझे आज्ञेनें कारभार

चालवावा. या रीतीनें एडवर्डानें राजपद कोणास न देतां बेलियलास सेवकरूपानें राज्यावर स्थापिलें असें पाहून लोक समजले कीं, याच्या मनांत एथील अधिकार कांहीं दिवशीं आपणाकडे आणावा असें आहे. मग एड्वर्ड राजानें एकाच वर्षांत लहानसान निमित्तेंकरून बेलियसास सहा वेळ लंडनांत बोलावूं पाठविलें; तेव्हां त्या स्काट्लंड देशचे बिचारे राजास समजलें कीं, मी केवळ नांवाचा मात्र राजा; परंतु मला राज्याची सत्ता किमपि नाहीं. या करितां अशा दुःखदायक प्रभूचा अंमल नाहींसा करावा असा निश्चय करून, त्या बेलियलानें बंड केलें; आणि पूर्वीं ज्या त्यानें विश्वासाच्या शपथा घेतल्या होत्या त्या पोपाकरवीं सोडविल्या.

परंतु, इंग्लिशांचे विजयी फौजेचा पराजय करायाजोगें सैन्य युद्धांत आणायास स्काच लोक केवळ असमर्थ होते. या कारणामुळें एड्वर्ड राजानें बहुत लढायांत त्यांचे सैन्याचा पराजय केला. एड्वर्ड राजा असा त्या राज्याचा निर्विवाद प्रभुपणा पावून, आपलें पद रक्षण करायाच्या उद्योगास लागला; आणि त्यानें पूर्वींसारिखे, स्काच लोकांस स्वतंत्र करितील असे जे भेद होते, ते सर्व मोडून टाकिले. बेलियलास धरून लंडन शहरामध्यें कैदेंत ठेविलें आणि ज्यांहींकरून स्काच लोकांस अभिमान होईल, अशीं जीं जुन्या काळचीं साधनें होतीं, त्या सर्वांचा नाश केला.

या युद्धापासून इतर कशाचा लाभ न होतां, केवळ कीर्ति मात्र राजास प्राप्त झाली. लढाईचा खर्च इतका झाला कीं, राजा पदच्युत होईल असें भय प्राप्त झालें; ह्मणून त्यानें प्रथम पार्लमेंटापासून पुष्कळ पैका काढिला;

आणि तें **पार्लमेंट** आतां जसें चालतें त्या रीतीनें प्रथम त्यानें चालू केलें. व्यापार आणि कृषिकर्म या दोहोंची प्रवृत्ति झाल्यामुळें राज्यांतील पुष्कळ द्रव्य सभासदांच्या हातांतून साधारण लोकांस प्राप्त होऊं लागलें, आणि ते मातबर झाले, ह्मणून कांहीं पैका उत्पन्न करायास त्यांचीही संमति अवश्य लागूं लागली. या कारणाकरितां त्यानें **शरिफांस** हुकूम पाठविले कीं, पूर्वींचे राज्यांत जसे एकेक प्रांतांतून दोन दोन **नैट** येत होते, तसे पाठवावे; आणि त्या प्रांतांतले एकेका **बरोंतून** दोन दोन प्रतिनिधि पाठवावे. **पार्लमेंटानें, माग्नाकार्टा** ह्मणून जो पूर्वीं सांगितलेला नियम, त्यावर राजाचे मंत्र्यांच्या सह्या घ्यायाचा उद्योग प्रथम केला, आणि एक कलम अधिक चढविलें. तें असें कीं, **पार्लमेंटाचे** संमतीवांचून प्रजांवर कोणताही कर किंवा कानु बसवूं नये. एडवर्ड राजा त्या काळीं **फ्लांडर्स** देशांत होता. त्याचे मंत्र्यांनीं त्यावर लागल्याच सह्या केल्या; आणि तें राजाजवळ पाठविलें, तेव्हां त्यानेंही कांहींसा अनमान करून त्यावर आपली संमति केली. नंतर तो जेव्हां स्वदेशीं आला, तेव्हां त्यानें जीं सर्व कलमें होतीं तीं चालवून तो नियम दृढ केला. या रीतीनें त्या नियमाविषयीं सुमारें शंभर वर्षांपर्यंत वादविवाद होऊन शेवटीं तो दृढ झाला; आणि **इंग्लिशांमध्यें** परम शूर आणि महान असा जो राजा, त्यानें तो स्थिर केला हें त्या नियमास साधन मोठें झालें.

त्या समयीं, **स्काटलंड** देशाचे बखरींत महा प्रसिद्ध असा जो **विलियम वालेस**, त्यानें आपला देश **इंग्लिशांपासून** सोडवायाचा यत्न आरंभिला. त्या राज्याचे पश्चिम प्रांतीं कोणीएक गृहस्थ राहात असे, त्याचा तो

मुलगा. त्याचें शरीर भयंकर, सामर्थ्य अत्यद्भुत, आणि शौर्य विलक्षण असे. त्यास स्वतंत्रतेची मोठी आवड; तो पक्षपातरहित होता, आणि आपल्या देशाचें कल्याण इच्छीत असे. **इंग्लिशांचे** दरबारांत फजीत होऊन जे निघाले होते, ते सर्व जाऊन त्यास मिळाले. ज्यांचा स्वतः विपत्तींत आणि संकटांतच जन्म, असे जे कोणी अभिमानी, धीराचे, अपराधी, लोभी, तेही त्या **वालेसाचें** आश्चर्य करीत कीं, कशांही संकटें प्राप्त झालीं असतां हा धीर सोडीत नाहीं. त्यांस, ही गोष्ट मनुष्यास परम अशक्य, असें वाटत असे– या रीतीनें तो त्यांचे प्रीतीचा आणि भक्तीचा मुख्य विषय झाला. अशी तयारी करून त्यानें प्रथम लुटी, तसेच चोरून **इंग्लिशांवर** हल्ले, यांचा प्रारंभ केला; पुढें मग तो लढाया करून **इंग्लिशांचे** फौजेचा पराजय करून त्यांचे सरदार मारूं लागला.

जेव्हां या गोष्टी घडल्या तेव्हां **एडवर्ड** राजा **फ्लांडर्स** देशांत होता; तो हें ऐकून आपले राज्याचें संरक्षण करायाकरितां मोठ्या त्वरेनें स्वदेशीं निघून आला. नंतर एक लक्ष फौज जमा करून **स्काच** लोक अगदीं जमिनीस मिळवावे या आवेशानें उत्तरेस निघाला. त्याची आणि त्यांची **फाल्कर्क** शहरांत लढाई झाली. त्या लढाईंत **स्काच** लोक बारा हजार पडले; (कितीएक ह्मणतात पन्नास हजार) परंतु **इंग्लिशांचे** शंभरही मेले नाहींत. या रीतीनें राजा **एडवर्ड** विजयी होऊन परत आला.

मग थोडे दिवस गेल्यानंतर **स्काच** लोक पुनः उद्योग करूं लागले. ज्या **वालेसानें** आपले शौर्यानें त्यांची प्रीति संपादन केली होती, त्यानें आपले श्रमाचें फळ सोडून दिलें;

आणि आपली विशेष योग्यता प्रगट केली. तें असें, **सर**-दार लोक आपला मत्सर करितात, तेणेंकरून देशाचें फार अकल्याण होईल, असा विचार करून त्यानें आपलें मुख्यपद स्वेच्छेनें सोडिलें. त्यानें त्या स्थानीं **कामिन** या नांवाचा पुरुष स्थापिला. तोही आपले थोरपणाची प्रचीत दाखवूं लागला. त्यानें शत्रूंचा पराजय केला; आणि पुढें शत्रूंपासून आपले राज्याचें संरक्षण करावें हें त्यास थोडें वाटून तो दक्षिणेचे बाजूस जाऊन दंगे करूं लागला. ती दक्षिण बाजू केवळ आपले स्वाधीन आहे असा **एड्वर्ड** राजाचा समज होता. **इंग्लिशांची** कांहीं फौज **एदिंबर्ग** शहराजवळ **रास्लिन** गांवांत होती तिजवर **स्काच** लोकांनीं हल्ला करून तिचा पराजय केला.

परंतु कसाही संकटसमय आला तरीं, राजा **एड्वर्डाचें** साहस असें होतें कीं, त्यास भय प्राप्त होऊं नये. तो लागलीच मोठी फौज आणि पुष्कळ गलबतें जमवून, **स्काट्लंड** देशाचे सीमेवर जाऊन पोहोंचला. तेथें त्याची फौज पाहून शत्रु युद्धाविषयीं निराश झाले. मग तो राजा आपले उद्योगास यश येईलच अशी खातरी बाळगून देश लुटीत, किल्ले घेत, आणि सगळे सरदार लोकांस आपल्या आधीन करीत, एक सीमेपासून दुसऱ्या सीमेपर्यंत गेला. तथापि **स्काच** लोकांचें राज्य अगदीं नाहींसें करायास एक विघ्न राहिलें होतें. तें हें कीं, **विलियम वालेसाच्या** मनांतून द्वेष गेला नव्हता, आणि तो थोडेशे फौजेनिशीं डोंगरों डोंगरीं फिरून आपली स्वतंत्रता आणि डौल राखीत होता. परंतु शेवटीं त्यावर **स्काच** लोकांनीं आशा ठेविल्या होत्या त्याही व्यर्थ गेल्या. तें वर्तमान असें, **वालेसाचा सरजान**

**मांटीथ** या नांवाचा मोठा विश्वासू एक स्नेही होता, तो फितूर होऊन त्यानें त्यास धरून **एड्वर्ड** राजाजवळ दिलें. राजाच्या मनांत आलें कीं, त्याचे हाल करून **स्काच** लोकांच्या मनांत भय उत्पन्न करावें; ह्मणून त्यानें त्यास बिड्या घालून **लंडन** शहरांत नेऊन फांशीं दिलें; आणि त्याचें शरीर कापून तुकडे तुकडे केले.

**राबर्ट ब्रूस** राज्याविषयीं पूर्वीं सत्ता करीत होता, त्यास धरून **लंडनांत** कैदेंत ठेविलें. तो तेथेंच फार दिवसपर्यंत होता; शेवटीं कैदेंतून सुटून त्यानें आपले देशाचे स्वतंत्रतेविषयीं उद्योग करायाचा निश्चय केला. त्यानें प्रथमच राजाचा एक चाकर मारून दुरात्मतेचा झेंडा लाविला; मग आपलें संरक्षण करायाचा उपाय शौर्यावांचून दुसरा राहिला नाहीं असें जाणून त्यानें आपले राज्यांत **इंग्लिशांची** फौज येऊन राहिली होती ती काढून दिली. थोडे दिवसांनंतर त्यास **स्कोन** शहरचे मठांत, **सेंट आंद्रूस** गांवांतले धर्माध्यक्षानें राज्याभिषेक केला; तेव्हां त्याच्या अधिकाराचे पुष्टीकरणार्थ बहुत लोक त्याचे जरीपटक्याजवळ जमा झाले. याच्या पूर्वीं **एड्वर्ड** राजानें तें राज्य दोन वेळां घेतलें होतें, आणि दोनही वेळां जे अन्यायी ठरले त्यांस क्षमा केली होती; परंतु या शेवटचे वेळेस त्याचे ध्यानांत आलें कीं, जर लोकांचा संपूर्ण नाश केला तरच आपल्यास स्वस्थता प्राप्त होईल. मग सर्व लोकांवर संतप्त होऊन त्यानें प्रतिज्ञा केली कीं, सर्व लोक जर माझे सेवकभावांत येतील, तरच माझा कोप उपशम पावेल. नंतर त्यानें धर्माध्यक्ष आणि आपले सरदार यांस बोलावून आणून हुकूम केला कीं, तुह्मी मला **क्यार्लैल** शहरांत येऊन भेटावें.

मग तेव्हांच त्यानें आपला सरदार **एमडीवालान्स्** यास, बरोबर फौजेची एक टोळी देऊन आपले पुढें **स्काट्लंडांत** पाठविलें, त्या सरदारानें **पर्थ** प्रांतांत **मेथुइन** गांवांत **ब्रूसाचा** पराजय केला. नंतर तो परम कोपिष्ठ राजा **एड्वर्ड**, आपले फौजेचे दोन विभाग करून, स्वतः **स्काट्लंड** देशास गेला. त्याचे मनांत असें होतें कीं, लोक आपलें निवारण करूं लागतील, तें निमित्त धरून आपण त्यांचें चांगलें शासन करावें. परंतु तेच होऊन त्यास नम्र झाले त्यामुळें राजाचा राग निष्फळ झाला. कारण कीं, जो आपणास शरण आला त्याचा नाश करावा ही गोष्ट त्यास वाईट वाटत असे.

नंतर **एड्वर्ड** राजा मृत्यु पावला तेव्हां **स्काच** लोक विपत्तींतून मुक्त झाले, आणि त्यांस सेवकभाव प्राप्त व्हायाचा होता तोही चुकला. राजास कांहीं रोग झाल्यामुळें तो **कार्लैल** गांवांत राहिला होता. त्यानें आपले अंतकाळीं लेकास सांगून ठेविलें कीं तूं **स्काट्लंडाचें** राज्य आपले ताबेखालीं येई तोंपर्यंत हा उद्योग सोडूं नको. तो आपले वयाचे एकुणहात्तरावे वर्षीं संन् १३०७ चे सालीं **जुलै** महिन्याचे सातवे तारिखेस मरण पावला. त्यानें पस्तीस वर्षें राज्य केलें. त्याचे पूर्वीं किंवा पुढें जे राजे झाले त्यांतून कोणीएकानें याचेइतकें राज्य वाढविलें नाहीं.



# प्रकरण १३.

## दुसऱ्या एड्वर्ड राजाची कथा.

ज्याचें प्रतिष्ठानाव का* अर्नार्वन असें होतें.

संन् १३०७ पासून १३२७ पर्यंत.

एड्वर्ड राजा मेल्यानंतर, त्याच नांवाचा त्याचा मुलगा होता, तो राज्य करूं लागला. ते समयीं त्याचें वय तेवीस वर्षांचें होतें. त्याचें रूप सुंदर व स्वभाव नम्र असून तो दयाळूही असे. त्यास दुष्कर्माची विशेष आवड नसे. असें प्रथम होतें खरें; परंतु पुढें लवकरच, त्याचे बापासारिखे मोठे पुरुषानंतर राज्य करायास तो योग्य नव्हे, असें चिन्ह दिसूं लागलें. त्यास राज्य भोगायाची मात्र इच्छा होती, परंतु तें संरक्षण करायाची आस्था नसे. त्याचे दरबारांतील लोक त्याची खुशामत करीत; तीं ऐकून त्यास वाटे कीं, मी राज्यपदाचा स्वीकार केला, इतक्यांनेंच मोठी कीर्ति व्हायाजोगा मी पराक्रम केला. मरते वेळेस बापानें सांगितलें होतें त्याप्रमाणें त्यानें **स्काच** लोकांशीं युद्ध केलें नाहीं; ह्मणून **ब्रूसाचा** उद्योग निर्विघ्नपणें चालिला. तो एड्वर्ड एकवेळ **स्काट्लंड** देशास गेला होता, पण लढाईच्या उद्योगाकरितां ह्मणून नाहीं, तर उगीच शोभार्थ.

भोळे राजाजवळ प्रीतींतले कांहीं सेवक असतात, आणि त्यांनीं सांगितल्याप्रमाणें ते ऐकतात, अशी रीति आहे; त्याप्रमाणें **एड्वर्ड** राजाजवळही एक **पियर्स गेव्स्तन**

---

का अर्नार्वन ह्मणून वेल्स प्रांतांत एक परगणा आहे; त्यावरून या राजाचें हें नाव पडलें.

ह्मणून त्याचे कृपेंतला होता. त्याचा बाप **गास्कनी देशाचा नैट**, राजाचे बापाजवळ चाकरीस असे. तो **पियर्स** जसा तरूण, रूपवान्, चतुर, शूर आणि उद्योगी असे, तसा दुराचारणी, वायक्या, व्यभिचारी, आणि हलकाही असे. हे त्याचे गुण राजास फार अवडत असत, ह्मणून त्याचे योग्यतेस मोल नाहीं असें झालें. कांहीं दिवसांनीं **गवस्तन** सत्तेंकरून उन्मत्त होत्साता, दरबारांतील सर्व सरदारांस तुच्छ मानूं लागला; ह्मणून त्याचा घात करायास एक बंड उत्पन्न झालें. तें करण्यांत मुख्य **इसाबेला** राणी व **लांकास्तराचा अर्ल**, हीं दोघें होतीं. या अर्लाकडे त्या वेळीं मोठा अंमल असे.

सर्व सरदार ज्या कामांत एकमत झाले, आणि राणीही त्यांचे उद्योग सिद्धीस जायाकरितां आंतून सहाय करूं लागली, त्यांत भोळ्या राजाचा आणि त्याचे आवडत्यांचा उपाय चालला नसेल, हें सहज मनांत येतें. पुढें वृत्तांत असा झाला कीं, राजा बंडापासून भय आणि संशय पावून त्यानें लागलाच आपले आवडत्यास आपणाजवळून काढून दिलें; परंतु थोडक्याच वेळानें त्यानें त्यास पुनः परत बोलाविलें, हें पाहून सर्व सभासद युद्धास तयार झाले; त्यांत **लांकास्तराचा अर्ल** मुख्य होता. तो हतभाग्य **एड्वर्ड** राजा कोणत्या तरी उपायानें निर्भय व्हावयाविषयीं उद्योग करूं लागला. तो आपल्या आवडत्यास बरोबर घेऊन **टिन्मौथ** शहरांत गलबतावर बसून **स्कार्बरो** शहरास गेला; आणि तें निर्भय ठिकाण जाणून **गवस्तनाला** तेथें ठेवून आपण परत **यार्कास** निघून गेला. तेथें जाऊन शत्रूचा प्रतीकार करायास फौज जमवावी हें, किं-

क आपण तेथें असलें ह्मणजे त्यांचा क्रोध शमेल हें, या दोहोंतून एक त्याचे जाण्यास कारण असावें. त्या समयीं **पेंब्रोकाचे अर्लानें स्कार्बरो** शहरांत जाऊन **गेवस्तानाला** वेढिलें; मग त्या **गेवस्तनानें** फौज विशेष प्रबळ नाहीं असें पाहून तहाचें बोलणें लाविलें कीं, मला दोन महिनेपर्यंत **पेंब्रोकानें** कैदेंत ठेवावें, तितक्यांत राजाचें आणि अमात्यांचें ऐक्य व्हायाचा यत्न मी करीन. त्यानें अशे थोडे श्रमानें मुक्त व्हावें हें **अर्लास** चांगलें न वाटून, यानें त्यास **बान्बरी** शहराजवळ **डेडिंग्तन** किल्ल्यावर नेऊन टाकिलें; आणि कांहीं दुसरे कामामुळें, लहानशी चौकी तेथें ठेऊन, तो निघून गेला. हें वर्तमान **वार्विक** शहरचे **अर्लाला** कळतांच त्यानें त्या किल्ल्यावर हल्ला करून **गेवस्तनास** आपले कैदेंत ठेविलें. मग **लांकोस्तर**, **हर्फोर्ड** आणि **आरंदल** शहरचे **अर्ल**, यांस ही गोष्ट समजतांच, ते एकत्र जमा होऊन त्यास काय शासन करावें याचा विचार करूं लागले. हा विचार करायास बहुत वेळ न लागतां, लागलेंच सर्वसंमतानें ठरलें कीं, तो सर्व राज्याचा शत्रु ह्मणून त्यास ठार मारावें. मग त्यास **ब्लाक्लोहिल** या नांवाचे स्थानीं नेऊन त्याचा शिरच्छेद केला.

थोडे दिवसांनंतर **बानिक्बर्न** नामक मैदानांत **ब्रूसाचे** फौजेपासून **एड्वर्ड** राजा पराजय पावला, हें त्यास अधिकच दुःख झालें. नंतर आपले मनास कांहीं विश्रांति व्हावी ह्मणून, त्यानें दुसरे एके पुरुषाशीं मैत्री केली. त्या पुरुषाचें नांव **ह्युडिस्पेनसर** होतें. तो मोठ्या कुळांतला, आणि त्याचा स्वभाव मैत्रीला फार चांगला असे. त्यापेक्षां त्याचा बाप अधिक गुणी असून वयानें पूज्य होता. त्याचे-

मध्यें चातुर्य, शूरत्व, आणि शुद्धता हेही मोठे स्तुत्य गुण होते. परंतु त्यावर आणि त्याचे मुलावर राजाची कृपा झाल्यापासून या सर्व गुणांचा कांहीं उपयोग न होतां त्याचें अकल्याण मात्र झालें. तें असें, राजानें आपले मित्रास द्यायाकरितां, कितीएक मोठमोठे **लार्ड** होते त्यांची संपत्ति कांहीं कारणावांचून काढून घेतली. राजाचे शत्रु फार दिवस निमित्ताची वाट पाहात होतेच त्यांस हें सहज सांपडलें. त्यांनीं **पार्लमेंटापासून** असा हुकूम करविला कीं, त्या दोघे बापलेकांस दरबारांतून काढून द्यावें, आणि त्यांचीं घरेंदारें जप्त करावीं. त्या समयीं राजानें सुस्तपणा सोडून आपले आवडते **स्पेन्सराचे** संरक्षणाकरितां युद्ध करायाचा निश्चय केला. तो तीस हजार लोक घेऊन **लांकास्तर** शहरचा **अर्ल** होता, त्याचे इतका नजीक जाऊन पोहोंचला कीं, **अर्लास** आपली फौज जमा करायास वेळ सांपडला नाहीं. मग तो वाट सांपडेल तिकडे पळूं लागला; शेवटीं त्यास राजाचा सखा **सर आंद्रुहार्क्ला** ह्मणून होता, त्यानें **स्काटलंडाचे** वाटेवर धरून कैदेंत टेविलें. या गृहस्थानें पूर्वीं **गेवस्तनावर** थोडीच दया केली होती सबब या प्रसंगीं त्यास विशेष क्षमा प्राप्त होईल असें नव्हतें. हें असेंच आहे, द्यावें तसें घ्यावें. मग **कोर्टमार्शल*** करून त्यास शासन ठरविलें, आणि एके मरतुकडे घोड्यावर बसवून **पामफ्रट** शहराजवळ उंच ठिकाणीं नेऊन तेथें त्याचा शिरच्छेद केला.

* लढाई खात्यांतील लोकांचे अपराधांची चौकशी करून शासन ठरवायाकरितां, त्या प्रकरणींचे कामगार लोकांची सभा होते, तिचें नांव कोर्टमार्शल.

ते बंड या रीतीनें मोडलें, तेणेंकरून या **स्पेन्सरास** अभिमान आणि लोभ अधिक उत्पन्न झाला. पुष्कळांच्या संपत्ति जप्त करून त्यानें आपले खासगीकडे लाविल्या; आणि राजाचा ज्यांणीं द्वेष केला होता, त्यांचें शासन करायाच्या निमित्तानें त्यानें बहुत अन्याय कर्मे केलीं. त्याचें आणि राणीचें वैर पडलें. ती राणी आग्रही आणि दुष्ट असे. राजाजवळून **स्पेन्सर** निघून राज्याचे पार जाईल, त्या वेळेस मी **इंग्लंडांत** पाय ठेवीन, अशी प्रतिज्ञा करून ती राणी **फ्रान्स** देशास निघून गेली. **इंग्लंडां**तील सर्व लोकांची **स्पेन्सरावर** गैर मर्जी होती, ह्मणून हें राणीचें कर्म पाहून ते तिची प्रशंसा करूं लागले. ती **इसाबेला** राणी, एक **मार्टिमर** ह्मणून मोठा गृहस्थ होता, त्याशीं आनंदानें सुख भोगीत असे; ह्मणून तिचें दरबार, जे जे राजाचे प्रतिपक्षी होते, त्यांस आश्रयभूत झालें. नंतर थोडे दिवसांनीं लढायास सिद्ध अशी तीन हजार फौज बरोबर घेऊन ती **डोर्ड** बंदरांतून निघून **सफोक** प्रांताचे कांठीं येऊन निर्विघ्नपणें उतरली. ती तेथें येतांच सर्व लोक तिला अनुकूळ झाले; तेव्हां त्या हतभाग्य राजास समजलें कीं, राज्यांत कोणाची आपणावर भक्ति राहिली नाहीं. **ब्रिस्तलाचे** किल्ल्यांत मोठ्या **स्पेन्सराचे** हाताखालीं लोक होते, त्यांवर राजानें कांहीं भरंवसा टेविला होता; परंतु त्यांनीं फितुर होऊन आपले मुख्यास धरून दिलें. त्यास अमात्यांनीं मोठ्या निर्दयपणानें मारिलें. त्याचे अंगावर कवच असतां त्यास फांशीं दिलें; त्याचें शरीर कापून तुकडे करून कुतऱ्यास घातलें; डोकें **विंचेस्तरास**

पाठविलें; आणि तेथें तें एके काठीस लावून लोकांचे मौजे-करितां ठेविलें.

त्याच्या मुलानेंही त्याच्या मागें बहुत दिवस प्राण ठेविला नाहीं. **वेल्स** प्रांतांत एके मठांत राजा जाऊन राहिला होता, तेथें त्या बरोबर तो आणि दुसरे कितीएक गेले होते, ते सर्व धरिले गेले; मग त्या निर्दय अमात्यांनीं त्याचे हाल करून आपला राग शांत करायाचा निश्चय केला. त्याची रीतिप्रमाणें उघड चौकशी होईपर्यंत वाट न पाहतां राणीनें हुकूम केला कीं, **स्पेनसराला** रस्त्यानें धिंड काढीत फिरवावें. त्याची विपत्ति पाहून जो दुष्ट आनंद होणार, तो भोगायाची तिणें इच्छा केली. त्यास मारायाकरितां पन्नास **फूट** उंच सूळ उभा केला; त्या सुळावर त्यास देऊन, त्याचें डोकें **लंडन** शहरास पाठविलें. तेथें लोकांनीं तें मोठे आनंदानें घेऊन पुलावर लाविलें. कितीएक दुसरे **लार्डांची** अवस्था तशीच झाली. त्या सर्वांनीं पूर्वीं जर दुष्कर्मेंकरून वाईट उदाहरण दाखविलें नसतें, तर ते कृपा करायास योग्य होते.

त्या वेळेस राजा **वेल्स** प्रांतांत दडून होता; तो तेथें आहे असें समजतांच त्यास धरून, लोक शिव्या देताहेत, नाना प्रकारच्या चेष्टा करिताहेत, अशा समारंभानें **लंडन** शहरास नेलें आणि किल्ल्यावर ठेविलें. नंतर त्यावर असा दोष आणिला कीं, त्यास राज्य करायास सामर्थ्य नाहीं; तो आळशी आणि ख्याली खुशालींत निमग्न; तसेंच लबाड मंत्री सांगतात तसें ऐकतो. हे दोष ठरवून त्यास पदच्युत करावें ही गोष्ट **पार्लमेंटाचे** संमतीस आली. मग त्याचे उपजीविकेकरितां कांहीं स्वास्थ्य करून दिलें; आणि

त्याचा पुत्र **एड्वर्ड** चवदा वर्षांचा होता त्यास राज्य पदावर स्थापिलें. तो मोठा होईपर्यंत काम कारभार राणीनें चालवावा असें ठरविलें.

अशी विपत्ति प्राप्त झाल्यावर, राजा फार दिवस वांचला नाहीं. तो ज्यांचे स्वाधीन होता, ते त्यास आपले मर्जीप्रमाणें या बंदिखान्यांतून त्या बंदिखान्यांत असा फिरवीत. त्याची अवस्था त्या वेळेस एखादा ज्ञाति बहिष्कृत असतो, त्यासारिखी झाली होती. प्रथम तो **लांकास्तराचे अर्लाचे** कैदेंत होता; परंतु कृपेनें तो त्याचा किंचित् मान राखूं लागला ह्मणून, त्याकडून काढून त्यास **लार्ड बार्कली, मांत्रावर्स** आणि **गुर्ने** यांचे स्वाधीन सुमारें एक महिनापर्यंत केलें. **लार्ड बार्कलीनें** त्यास कसें काय सुख दुःख दिलें असेल तें असो; परंतु दुसऱ्या दोघांनीं त्याला निर्दयपणें फारच छळिलें. ते हाल भोगून त्यानें लवकर मरावें असेंच त्यांचे मनांत असेल, ह्मणून दुसरींही त्यांनीं बहुत प्रकारचीं कंटाळवाणीं कर्मे केलीं. असें सांगतात कीं, त्यास एके शेतांत बसवून तेथील खाड्यांतलें पाणी घेऊन त्याची मौजेनें हजामत करविली. पूर्वीं जीं त्यांनीं दुःखें दिलीं होतीं, त्यांपासून त्यास वाईट वाटलें नव्हतें; परंतु त्या प्रसंगीं त्यास तें साहवेना असें झालें. त्या वेळेस त्याचे नेत्रांतून अश्रुपात येऊन तो त्यांजकडे संतापानें पाहून बोलिला कीं, कांहीं चिंता नाहीं; कधीं तरी असा दिवस येईल कीं, मी इतकें दुःख पावणार नाहीं. परंतु ही त्याची आशा व्यर्थ झाली. ती अशी, त्याचे शत्रूंनीं पाहिलें कीं, कसेंही दुःख दिलें तरी त्यास मृत्यु लवकर येत नाहीं; ह्मणून त्यांनीं त्यास तत्क्षणीं मारायाचा निश्चय केला. मग

त्याचे दोन शत्रु **गुर्नें** आणि **मांत्रावर्स** हे, तो ज्या **बर्क्ले** किल्ल्यांत होता तेथें गेले. त्यांनीं असा बेत केला कीं त्याचे शरिरावर कांहीं खूण झाल्यावांचून त्यास मारावें. मग त्यास पलंगावर पाडून त्याचे शरिरावर एक मेज ठेविलें, आणि त्याचे पोटावर एक नळी ठेवून तींत तापलें लोखंड ओतिलें. त्यांस असें वाटलें कीं, अशा काव्यानें आपला अपराध लपला जाईल, परंतु तो मोठ्यानें भयंकर ओरडला, तें किल्ल्याबाहेर दूर ऐकायास गेलें, आणि या रीतानें त्या खुनाचा शोध लागला. एड्वर्ड राजासारिखी विपत्ति पाहून दया उत्पन्न व्हावीच; आणि त्यानें जीं कांहीं दुष्कर्में केलीं असतील, तीं त्याचा असा घोर परिणाम पाहून मनांतून जावीं.

# प्रकरण १४.

## तिसऱ्या एड्वर्ड राजाची कथा.

संन् १३२७ पासून १३७७ पर्यंत.

ज्या **पार्लमेंटाचे** आश्रयानें, **एड्वर्ड**, आपला बाप असतां, राज्य पावला, त्या सभेनें राज्यांतला कारभार चालवायाकरितां बारा आसामी त्याचे मुख्य मंत्री नेमिले. राणीचा मित्र जो **मार्टिमर** त्याची त्यांत नेमणूक व्हावी, परंतु त्यानें साधेपणाचा डौल करून आपणच नको ह्मटलें. तथापि ते मंत्री जें काय करीत तें आंतून त्याच्या मर्जीप्रमाणें करीत असत. त्यानें जमाबंदीचा बहुतकरून वसूल त्या विधवा राणीला मिळावा असें केलें. तो राजाचे एकादे मोठे कामाविषयीं कधींही मंत्र्यांशीं मसलत करीत

नसे. त्या **मार्टिमराचे** लोक राजाजवळ सर्वत्र असत, ह्मणून त्याजवळ कोणाचा प्रवेश होत नसे. सर्व राज्याची सत्ता राणी आणि तो **मार्टिमर** या दोघांच्या हातीं होती. राणी, आपली त्या **मार्टिमरावर** प्रीति होती, ती लपवीतो नसे.

शेवटीं ती त्याची सत्ता प्रजांचे दृष्टीस कंटाळवाणी आणि आपल्यास प्रतिबंधकारक, असें मनांत आणून **एड्वर्डानें** ती नाहींशी करायाचा निश्चय केला. परंतु त्या **मार्टिमराचें** सामर्थ्य असें होतें कीं, राज्यपदवी संपादन करायास जितका प्रयास लागावा, तितकाच त्यास काढून टाकायास पाहिजे होता. कांहीं दिवसपर्यंत राणी आणि तो **मार्टिमर नाटिंगम** शहरचे किल्ल्यांत राहत असत; त्या किल्ल्यावर चांगला पाहारा असे; त्याचे दरवाजे प्रतिदिवशीं सायंकाळीं लावीत; आणि त्यांच्या किल्ल्या राणीजवळ नेऊन देत. यावरून कितीएक सभासद लोक आणि राजा यांनीं असें ठरविलें कीं, त्या किल्ल्यांत न कळतां जाऊन त्या दोघांस धरावें. त्या कामाकरितां **सरविलियम ब्लांड** ह्मणून तेथील **गवर्नर** होता त्यास फितुर केलें. त्या किल्ल्यांत नळासारिखी पूर्वी जमिनींतून वाट केली होती, ती दगड माती पडून बुजली असे, आणि तेव्हां एक दोघांस मात्र ती ठाऊक होती. त्या **गवर्नरानें** त्या वाटेनें त्यांस आंत घ्यावयाचें कबूल केलें. मग राजाचे पक्षाचे गृहस्थ एके रात्रीस त्या वाटेनें आंत गेले; तेव्हां **मार्टिमरास** आपलें संरक्षण करायाचा उपाय नाहींसा झाल्यामुळें तो धरिला गेला. त्या वेळेस राणी आणि तो जवळ जवळचे खोलींत होतीं. ती त्याचें संरक्षण करायाविषयीं

पुष्कळ त्यांजवळ बोलिली, परंतु व्यर्थ. ती ह्मणाली, **माझे मार्टिमरास** कृपा करून सोडून द्या, परंतु ते सभासद तें ऐकेनात. सारांश, तिला बहुत वेळ जशी लोकांची कीव आली नाहीं, त्याच रीतीनें तिचीही त्यांस आली नाहीं. तेव्हां **पार्लमेंटाचा** सभासमय होता, परंतु त्या सभेंत त्यास बोलावून आणिलें नाहीं, किंवा त्याचे अपराधाविषयीं साक्ष-हीं विचारिली नाहीं, आणि तत्क्षणींच त्याचा वध करावा असें ठरविलें. मग **लंडन** शहरापासून सुमारें अर्ध को-शावर **एल्म्स्** ह्मणून ठिकाण आहे, तेथें त्यास सुळीं दिलें; आणि त्याचें शरीर तेथेंच दोन दिवस ठेविलें. राणीचा अपराध वास्तविक त्यापेक्षां अधिक; परंतु तिची प्रतिष्ठा आणि कुल हीं मोठीं होतीं, ह्मणून तिला सोडिलें. इतकें मात्र केलें कीं, तिला कशाची सत्ता नाहींशी करून **रैझि-गस** किल्ल्यावर ठेविलें, आणि चरितार्थाकरितां ३००० **पौंड** वर्षास द्यावे असें ठरविलें. या कैदेंतून पुढें ती कधीं-हीं मुक्त झाली नाहीं. राजा प्रतिवर्षीं कांहींशा समारंभानें एक वेळ तिच्या भेटीस जाई, तथापि तिला असें वाटे कीं, माझेसारिखी या पृथ्वींत दुःखी कोणी नाहीं. असे दुः-खांत तिनें पंचवीस वर्षें घालविलीं. ही गोष्ट पाहून कि-मपि आश्चर्य वाटूं नये, सर्व मनुष्यांनीं आपले पापाचीं फळें भोगावीं, असा ईश्वराचा संकेतच आहे.

लोकांची प्रीति यापेक्षां अधिक संपादावी ह्मणून, **एडवर्ड** राजा मोठा चढाव करून **स्काट्लंड** देशांत गेला, तेव्हां **हालिडौन** डोंगराजवळ एक लढाई झाली; तीमध्यें सु-मारें तीस हजार **स्काट** लोक मेले. त्यानंतर थोडेच दिवशीं त्यानें **फ्रान्स** देशाशींही युद्ध केलें. तो देश

त्या वेळेस मोठे हलाखांत होता. तें वर्तमान असें, **फिलिप दिफे अर*** राजाचे तीन मुलगे होते. त्यांनीं, आमच्या बायकांनीं व्यभिचार केला, असा त्यांवर **पार्लमेंटांत** आरोप ठेविला; त्यामुळें त्यांस जन्मवर बंदींत ठेविलें. मग **फ्रान्स** देशाचे राजपदावर **लुइस ह्युटिन** ह्मणून झाला. त्यानें आपले बायकोस मारिलें, आणि तिचे जार होते त्यांचे अंगाचीं चामडीं काढून त्यांचा वध केला. त्यास एकच मुलगी होती. तो मेल्यानंतर त्याचे पाठचा भाऊ **फिलिप दिटाल**,† त्या मुलास एकीकडे ठेवून आपणच राज्याविषयीं सत्ता करूं लागला. **सालिकला** ह्मणून राज्य नियम आहे, त्यांत असें आहे कीं, बायकोस राज्य करायाचा अधिकार नाहीं; तेणेंकरून तो आपणास सत्ता आहे असें ह्मणत असे. एडवर्ड राजाची आई **फिलिफ दिफेअर** राजाची मुलगी, आणि शेवटचे तीन राजांची बहीण, या नात्यानें **एडवर्ड** राजाही त्या पदाविषयीं आपणास अधिकार आहे ह्मणून तंटा करूं लागला. हें करायाचे पूर्वी त्यानें, तो उद्योग केला असतां बरें किंवा वाईट, ही मसलत **पार्लमेंटास** विचारिली. त्या सभेनें त्यास संमत दिलें. मग त्यानें **फ्लांडर्स** देशांतले लोकांशीं व्यापार करायाकरितां लोकर पुष्कळ जमा केली; आणि बहुत सैन्य, तसेच कितीएक मोठे सरदार, बरोबर घेऊन तो तेथें निघून गेला.

नंतर **फ्लांडर्स** देशाचे कांठावर पाण्यांतून लढाई झाली. तींत **इंग्लिश** जय पावले. तेथें **फ्रेंचांचे दोनशें तीस** गलबतांचा नाश झाला, व तीस हजार खलाशी लोक आणि दोन सरदार मेले.

---

* सुंदर. † उंच.

**एड्वर्ड** राजा येऊन पोहोंचला, आणि त्याचें सैन्य **देश**-भर पसरून विध्वंस करूं लागलें, ही बातमी **फ्रेंचांचे** दरबारांत समजून तेथें मोठें भय उत्पन्न झालें. **इंग्लिशांनीं कान** शहर घेऊन निर्दयपणानें लुटलें, आणि **पारिस** शहरापर्यंत सर्व गांवांचें तसेंच केलें. तेव्हां **फ्रेंच** लोकांनीं **एड्वर्ड** राजाचें पुढें येणें होऊं नये, याकरितां नद्यांचे पूल पाडायाची युक्ति योजिली. तेव्हां **फ्रान्स** देशचें राज्य **फिलिप** राजा करीत असे, त्यानेंही शत्रूंचें निवारण करायाविषयीं प्रयत्न चालविला. **एड्वर्ड** राजा **सोम** नदी उतरून जाणार असें समजून त्यानें आपला एक **गाडिमर डीफे** ह्मणून सरदार होता, त्यास त्या नदीपाशीं ठेविलें, आणि आपण एक लक्ष योद्धे बरोबर घेऊन **इंग्लिशां** बरोबर लढाई करायास गेला.

कांहीं वेळपर्यंत दोनही सैन्यें एकमेकांचे दृष्टीचे टप्यांत येऊन राहिलीं होतीं; आणि लढाइस प्रारंभ केव्हां होईल याची वाट पाहात होतीं. त्या वेळेस **फ्रेंचांची** फौज एक लक्ष वीस हजार, आणि **इंग्लिशांची** तीस हजार होती. असें असतां ही लढाई तर करायाचा, मग जें काय व्हायाचें असेल तें होवो, असा **एड्वर्ड** राजाचा निश्चय होता. तो **क्रेसी** खेड्याजवळ तळ देऊन, शत्रूंनीं प्रथम हल्ला करावा, याची स्वस्थपणें वाट पाहात बसला. त्यानें आपले फौजेच्या तीन टोळ्या केल्या. पहिले टोळीचा सरदार राजानें आपले मुलास केला; दुसरे टोळीचे **नर्थंप्टन** आणि **आरंदल**, एर्थील **अर्लांस** केले; आणि तिसरी टोळी रिकामी ठेवून ती आपले हाताखालीं राखिली.

इकडे **फिलिप** राजा गर्वानें आपली फौज पुष्कळ जा-

शून स्वस्थ बसला होता. युकांनें उद्योग करावा तें सोडून शत्रूस कसें तरी लढायास लावावें असें तो इच्छीत असे. त्यानेंही आपले फौजेच्या तीन टोळ्या करून **इंग्लशांचे** समोर चालविल्या. पहिलींत **जिनोआ** देशचे तिरकमठेवाले पंधराशें होते; दुसरींत राजाचा भाऊ मुख्य होता; आणि तिसरींत स्वतः राजाच होता.

संध्याकाळचा दिवस एक प्रहर राहिला होता त्या वेळेस, **फ्रेंच** राजानें आपले तिरकमठेवाल्यांस लढाई सुरू करायाचा हुकूम दिला. परंतु ते पुष्कळ चालून आले होते त्यामुळें थकून गेले; आणि राजास त्यांनीं विनंति केली कीं, आह्मी थोडासा विसांवा घेतों. **कौंट आलेनसान** ह्मणून **फ्रेंचांचा** सरदार होता, त्यास हें वर्तमान समजतांच तो घोड्यावर बसून आला; आणि त्यांस धिक्कारून बोलिला कीं, तुह्मीं भ्याड आहां; उठा, आणि युद्धास प्रारंभ करा. इतक्यांत मोठा पावसाची झड लागली, तेणेंकरून त्यांच्या धनुष्यांच्या दोऱ्या शिथिल झाल्या; आणि त्यांस अगदीं हुशारी नाहींशी झाली. मग त्यांनीं रडत खडत लढाई केली; परंतु तीणेंकरून शत्रूंचा किमपि नाश झाला नाहीं. इकडे **इंग्लशांनीं** आपलीं धनुष्यें गवसण्यांत ठेविलीं होतीं, आणि त्यांस मध्यें थोडेंसें ऊनही सांपडलें, तेणेंकरून **फ्रेंचांचे** डोळे दिपून गेले. मग त्यांनीं लक्ष्यें धरून मोठी दाट बाणांची वृष्टि केली, त्यामुळें **जिनोईस*** लोकांत धांदल होऊन ते परम भयभीत झाले. त्यांची धांदल पाहून **एडवर्ड** राजाच्या पुत्रानें आपली टोळी पुढें लढायास नेली.

---

* जिनोईस ह्मणजे जिनोआ देशचे राहणार लोक. जिनोआ देश युरोप खंडाचे दक्षिण भागीं आहे.

ते समयीं **फ्रेंचांचे** घोडेस्वारांचा सरदार **कौंट आलेन्सान** होता, त्यानें **इंग्लिशांचे** सभोंवतीं घोडेस्वारांचा वेढा देऊन लढाई चालविली; तेव्हां राजपुत्र लढाईंत पुढें आहे असें पाहून, **आरंदेल** आणि **नर्थंप्टनाचे अर्ल**, त्याचे मदतीस धांवून गेले. तो राजपुत्र जेथें जाई तेथें विजयच चालून येतो असें दिसे. त्याचे सभोंवतें बहुत सैन्य जमा झालें होतें. त्याचें तें शौर्य पाहून मोठमोठे ह्मातारे योद्धे विस्मित झाले, आणि त्यांचे मनांत असें भय उत्पन्न झालें कीं, हा यांतून कसा निभावेल? त्यास केव्हां तरी एखादा अपाय होईल अशी भयशंका वाटून **अर्लांनीं** राजास एके जासुदाबरोबर सांगून पाठविलें कीं, आपले पुत्रास कांहीं मदत पाठवून द्यावी. तोंपर्यंत **एड्वर्ड** राजा एके पवनचक्कीवर उभा राहून स्वस्थपणें युद्धाची मौज पाहात होता. त्यास निरोप पोंचतांच त्यानें किंचित दुःख झालें असें दाखवून पुसलें कीं, तो मेला कीं आझून जिवंत आहे? तो जिवंत आहे असें समजल्यावर राजा त्या जासुदास बोलिला, "अरे, सरदार लोकांस माझा निरोप सांग कीं, मी कांहीं मदत पाठविणार नाहीं; आजचे दिवशीं जी प्रतिष्ठा मिळेल ती त्याची; त्यानें युद्धाविषयीं आपण योग्य आहें असें आज दाखवावें, आणि दुसऱ्या कोणाचे मदतीवांचून विजय मिळवावा." हे राजाचे शब्द राजपुत्रास आणि त्याचे सोबत्यांस कळतांच त्यांस विशेष धीर आला. मग त्यांनीं आवेशानें **फ्रेंचांचे** घोडेस्वारांवर हल्ला केला, त्या वेळेस **फ्रेंचांचा** परम शूर सरदार जो **कौंट आलेन्सान**, तो पडला. तेव्हांपासून **फ्रेंचांचा** नाश व्हायास प्रारंभ झाला. कारण त्यांचा सरदार मेल्यामुळें ते घाबरे हो-

ऊन पळूं लागले. **इंग्लिशांनीं** त्यांचे पाठीस लागून ते जसे सांपडले तसे ठार मारिले. **इंग्लिश** असा विध्वंस करीत असतां सूर्य अस्तास गेला; तेव्हां ते शत्रूंस सोडून देऊन मागें फिरले. इतके थोडे लोक मरून असा जय **इंग्लिशांस** कधीं प्राप्त झाला नव्हता. शत्रूंचे लोक पुष्कळ मेले; परंतु यांचा एक **इस्क्वयर**, तीन **नैट**, आणि खालच्या पायरीचे कांहीं थोडे बहुत, इतके मेले. या लढाईंत **इंग्लिशांनीं** प्रथम चार तोफा चालू केल्या, अशी कथा सांगतात.

या विजयापासून दुसरें मोठें हित झालें. तें असें, **एड्वर्ड** राजा जसा पराक्रमी तसाच शाहणाही असे; ह्मणून पुढें **फ्रान्स** देशांत सहज जातां यावें याविषयीं कांहीं यत्न करावा असा त्यानें निश्चय केला. या उद्देशानें त्यानें **कालेइस** शहरास वेढा घातला. त्या किल्ल्यावरचा सरदार जुना व अनुभवलेला होता. त्याचें नाव **जान डीविएन.** त्यांत पुष्कळ सामानही भरले होतें. असा हळू हळू उद्योग चालवून **एड्वर्ड** राजानें तें काम सिद्धीस नेलें. त्या किल्ल्यावरचे अधिकाऱ्यानें आपल्याकडून झाला तितका यत्न केला; शहरांत जे कोणी रिकामे लोक होते ते बाहेर काढून दिले; त्यांस **एड्वर्डानें**ही थोरपणें जायाची मोकळीक दिली; परंतु हे सर्व त्याचे यत्न निष्फळ झाले. **एड्वर्डानें** त्या शहरांत दुष्काळ पाडून तें घ्यायाचे मसलतीनें वीस महिनेपर्यंत वेढा घालून शेवटीं लोकांस धान्यादिकांचा तोटा पाडिला, आणि आपला मतलब सिद्धीस नेला. त्या लोकांनीं इतके दिवस आग्रह धरिला त्याचें कांहीं शासन करावें ह्मणून लोकांतून मुख्य मुख्य

सहा होते, त्यांस मारावें असा त्यानें बेत केला. ते आपलें गळ्याभोंवतीं दोऱ्या बांधून मार ह्मणून त्याजवळ आले; त्या वेळेस राणीनें मध्यस्थि करून त्यांस वांचविलें.

या रीतीनें **एड्वर्ड** राजा महाद्वीपांत जय मिळवीत असतां, **स्काट** लोक, ज्यांस सर्वदा लूट आणि नाश करायाची मोठी आवड असे, त्यांनीं ती संधि साधून पुष्कळ सैन्य जमा करून **इंग्लंड** देशाचे कांठावर हल्ला केला. त्यांचा राजा **डेविड ब्रुस**, तोही त्यांचे बरोबर आला होता. तशा प्रसंगीं अकस्मात् त्या लोकांचा दंगा पाहून **इंग्लिश** चकित झाले; परंतु त्यांस किमपि भीति वाटली नाहीं. **एड्वर्ड** राजाचे मागें **इंग्लंडांतील** खबरदारी त्याचा मुलगा **लयोनल** ह्मणून होता, त्याकडे सांगितली होती. तो फार लहान ह्मणून त्याच्यानें युद्धाचें काम होईना; परंतु राजा विजयी होत चालिला हें पाहून बायकांस देखील हुशारी आली. राजाची बायको **फिलिपा** ह्मणून होती, तिनें युद्धांतलें आधिपत्य स्वतां करून शत्रूंचा पराजय करायाचा निश्चय केला. मग ती, **लार्ड पर्सी** नामें गृहस्थ होता, त्याला आपले हाताखालचा सरदार करून युद्धास गेली. तिची आणि **स्काच** लोकांची **दरहम** शहराजवळ **नेविलसक्रास** या नांवाचें ठिकाण आहे, तेथें गांठ पडली, आणि लढाईस आरंभ झाला. **स्काच** लोकांचा राजा लढाईविषयीं फार उतावीळ होता, याकरितां त्यास असें वाटलें होतें कीं, **इंग्लशांचे** फौजेंत कांहीं बंदोबस्त नाहीं, आणि त्यांत मुख्य बायको आहे; याकरितां मी त्यांचा सहज पराजय करीन. परंतु तो ठकला गेला. त्याची सगळी फौज लढाई सोडून पळाली; पंधरा हजार लोक

मेले; मग **इंग्लिशांनीं** त्यास आणि त्याचे बहुत **नैट** सरदार, यांस धरून मोठ्या उत्साहानें **लंडन** शहरास नेलें.

त्यानंतर लवकरच, **पाइटियर्स** शहराजवळ **ब्लाक्*** **प्रिन्सानें** विजय मिळविला. त्यांत **फ्रान्स** देशाचा राजा **जान**, यास धरून, उत्साह करून, पुष्कळ लोक पाहताहेत अशा समारंभानें **लंडन** शहरास नेलें. एके दरबारांत दोन राजे एकदाच कैदेंत पडले हें लोकांस प्रतिष्ठित कर्म वाटलें; परंतु यापासून नुसता कीर्तीचा मात्र लाभ झाला. इतक्या युद्ध संकटांत पडून, तसेंच, लढाईची सिद्धता करायाकरितां पुष्कळ खर्च करून, जें काय मिळविलें, तें सगळें नकळत हळू हळू गेलें, इतकेंच कीं पराजय मात्र झाला नाहीं.

**इंग्लिशांनीं** बहुत दिवस युद्धांत फौजेचा पुरावा केला; शेवटीं लढाईंत नवी फौज पाठवायाचें त्यांस सामर्थ्य राहिलें नाहीं. तिकडे **फ्रान्स** देशचा राजा कैदेंत होता तो **सेवाय** शहरांत मृत्यु पावला. तेव्हां त्याचे स्थानीं त्याचा पुत्र **चार्लिस** राज्य करूं लागला. तो मुद्दाम, समोरासमोर लढाईचा प्रसंग चुकवीत असे. त्यानें असें मनांत आणून ठेविलें होतें कीं, आपले देशांत पुष्कळ किल्ले आहेत; **इंग्लिशांनीं** तेथें उगीच आपलें बळ खर्चिलें तर काय चिंता? या रीतीनें त्यानें अगदीं उद्योग सोडून दिला पाहून, **इंग्लिश** उगीच श्रम करितां करितां थकून गेले. तें पाहून त्या **चार्लिस** राजानें, जीं ठिकाणें त्यांच्यानें राखव-

---

* ब्लाक् प्रिन्स् ह्मणजे काळा राजपुत्र, हें एड्वर्ड राजाचे लेंकाचें नांव. तो काळें कवच धारण करी, यामुळें त्यास हें नांव पडलें होतें.

णार नाहींत अशीं होतीं, त्यांवर जाऊन हल्ला केला. पहिं त्यानें त्यानें **पांथिउ** शहर घेतलें; **आब्बिल** शहरांतले लोकांनीं तर त्यास दरवाजे उघडून आंत घेतलें; **सेंटवा-ल्वारु** आणि **क्रोताय**, या शहरच्या लोकांनींही तसेंच केलें. मग थोडकेच काळांत सर्व देश त्याचे स्वाधीन झाला. याच रीतीनें त्याचे सरदारांनीं राज्याचे दक्षिणे-कडचे भाग घेतले. तेव्हां राजपुत्र **इंग्लंडांतून** पुरावा येत नाहीं, आणि जिकडे तिकडे धांदल झाली आहे, असें पाहून स्वदेशीं गेला. तो गेला तेणेंकरून **फ्रान्स** देशाचे दक्षिणेकडे अधिक गडबड झाली.

पुढें राजपुत्र मरण पावला, तेणेंकरून असें शोभायमान राज्य अतिविशोभित झालें. तो शूर तसाच गुणी पुरुष शेचाळिसावे वर्षी मरण पावला. त्याची मागें निर्दोष की-र्ति राहिली; आणि त्याचे मरणेंकरून जें लोकांत दुःख झालें, तें काळेंकरूनही जायास संकट पडलें.

पुत्रासाठीं **एडवर्ड** राजास तर अतिशयच दुःख झालें; तें मनांतून जायासाठीं त्यानें बहुत यत्न केले. त्यानें राज्य-भार आणि सर्व कामें सोडून दिलीं. तेव्हां त्याचें राज्य दुष्ट मंत्री लुटूं लागले. असें अविचाराचें फळ भोगण्यास तो फार दिवस वांचला नाहीं. पुत्र मेल्यावर तो एक व-र्षानें **सरे** प्रांतांत **शीन** शहरीं संन् १३७७ चे वर्षी मरण पावला. पूर्वी जे त्यापासून वक्षीस मिळवून द्रव्यवान् झाले होते, त्यांसुद्धां सर्व सरदार लोकांनीं त्यास शेवटीं सोडून दिलें. त्यानें एकावन्न वर्षे राज्य केलें. तो मेला त्या वे-ळेस त्याचे वयास पांसष्ट वर्षे होतीं. तो राजा असा होऊन गेला कीं, लोकांनीं त्यावर प्रीति करावी; आणि त्यास पा-

हून अधिक आश्चर्य पावावें; तसेंच त्यासाठीं दुःखी व्हावें, आणि त्याची स्तुतिही करावी.

याच राज्यांत **ग्यार्टर*** पदवीची उत्पत्ति झाली.

**हेनाल्ट** शहरचे **फिलिपा** राणीपासून **एड्वर्ड** राजास मुलें वहुत झालीं. त्याचा वडील मुलगा त्याचे अगोदरच मेला. परंतु त्या मुलाचा **रिचर्ड** ह्मणून एक मुलगा होता तो, राजा मेल्यानंतर राज्य करूं लागला.

---

## प्रकरण १५.

### दुसऱ्या रिचर्ड राजाची कथा.

संन् १३७७ पासून १३९९ पर्यंत.

**रिचर्ड** आपले अजाचे राज्यपदावर बसला त्या वेळेस अकरा वर्षांचा होता. तेव्हां त्यानें आपल्या प्रजा दुःखी आणि दरिद्री अशा पाहिल्या; तसेंच त्यास कारभारी अभिमानी आणि कृत्रिमी दिसून आले. त्याचें वय अल्प होतें ह्मणून, त्याचे तिघे मामा, **लांकास्तर**, **यार्क**, आणि **ग्लोसेस्तर**, एथचे **ड्युक** होते ते, राज्यांतील सर्व काम कारभार चालवीत असत. **एड्वर्ड** राजानें पुष्कळ मोठ्या मोठ्या खर्चाच्या लढाया आरंभून ठेविल्या होत्या, तिकडे नेहमीं फौजेचा पुरावा करावा लागत असे, ह्मणून उत्तरोत्तर लोक विशेष आंतून कुरकुरूं लागले. जिकडून तिकडून शत्रूंस संभाळायाकरितां लढाऊ गलबतें ठेविलीं होतीं,

---

* युद्धादिकांत जे पुरुष पराक्रम करितात, त्यांस प्रतिष्ठेसाठीं एक चिन्ह देतात; तें धारण करणारे लोकांचे पदवीचें नांव ग्यार्टर.

त्यास बहुत खर्च लागे; आणि राज्यांत उधळपटी चालत असे; या कारणामुळें जामदारखाना केवळ रिकामा झाला होता. त्यांत कांहीं भर पडावी ह्मणून **पार्लमेंटानें** अशी आज्ञा केली कीं, पंधरा वर्षांचे वयावर जेवढीं मनुष्यें आहेत तितक्यांनीं तीन **ग्रौट*** द्यावे. याचे पूर्वींच लोक संतापले होते; आणि तो कर, मातबर, गरीब, यांस सारिखाच द्यावा लागतो, असें पाहून गरीब ज्या प्रजा होत्या, त्यांचा क्रोधाग्नि फारच प्रदीप्त झाला. त्याचा प्रारंभ **एसेक्स** प्रांतांत झाला. तो असा, त्या प्रांतांत कोणी मुद्दाम अशी बातमी उठविली कीं, सरकार गरीब लोकांस पीडा करणार, त्यांचीं घरें जाळणार, आणि शेतें लुटणार. त्या लोकांस प्रथम एके लोहारानें युद्धास प्रवृत्त केलें. त्याचें नांव **वाटटैलर** असें प्रसिद्ध आहे. तो एके दिवशीं आपले घरीं काम करीत बसला होता, इतक्यांत सरकारचा कराचा पैका जमा करणारे तेथें गेले, आणि त्याचे मुलीचा पैका मागूं लागले. तेव्हां तो बोलिला कीं, माझे मुलगीस कायद्यांत लिहिलीं आहेत तितकीं वर्षें नाहींत. तें ऐकून त्यांतून एके अम्मलदारानें आग्रह धरिला कीं, ही चांगली मोठी बायको आहे, आणि तो त्या गोष्टीचा पुरावा कांहीं लाजिरवाणें कर्म करून करूं लागला. तें पाहून लोहारास फार आवेश आला, आणि त्यानें त्या पुरुषास आपले घणाचा एक तडाखा देऊन ठार मारून टाकिलें. त्या वेळीं लोक वाटेनें जात होते त्यांनीं तें पाहून त्याचे धैर्याची स्तुति केली, आणि सर्वांनीं त्यास सहाय होऊन युद्ध करायाचा

* चार पेनीचे वजनाचा तुकडा. हीं सर्व इंग्रजी मानें शिक्षामाला पुस्तकाचे प्रथम भागांत पाहावीं.

निश्चय केला. त्यास लोकांनीं आपला मुख्य केला. मग त्या एकत्र झालेले लोकांनीं बहुत धुंदाई केली; सर्व जवळचे प्रांतांतले लोक युद्धास सिद्ध झाले; आणि जेथें ते गेले तेथें त्यांनीं लुटलें आणि जाळिलें. धन्यापासून जीं पूर्वीं दुःखें सोसिलीं होतीं त्यांचा त्यांनीं या रीतीनें सूड उगवला. सर्व लोकांची राजावर इतराजी झाली होती ह्मणून, जसें जसें तें बंड राजधानी जवळ येत चालिलें, तस तसे, त्यास नवे पुष्कळ लोक येऊन मिळूं लागले. मग तो क्रोधाग्नि, **केंत, हरीफोर्ड, सरे, सफक, नार्फक, केंब्रिज, लिंकन,** या प्रांतांत पेटूं लागला. ते **ब्लाकहीथ** मैदानाजवळ आले तेव्हां, त्यांची मंडळी एक लाख जमली. त्यांतील एके टोळीचा सरदार **वाटटैलर** होता; तो आपले लोक घेऊन **स्मिथ्फील्डांत** गेला; तेथें त्याची आणि राजाची भेट झाली. राजानें त्यांशीं कांहीं खलबत करायाकरितां त्यास बोलावयास पाठविलें. त्यास कळविलें कीं, तुह्मी भेटलेत ह्मणजे तुमचीं काय संकटें आहेत तीं ऐकून आह्मी दूर करूं. **टैलरानें** आपल्या लोकांस सांगितलें कीं, मी खूण करीपर्यंत तुह्मी उगीच दूर असावें. असें सांगून तो मोठा धीर करून राजाचे स्वारींत जाऊन राजाशीं खलबत करूं लागला. त्या वेळेस जें त्यानें अविचारानें पुष्कळ मागणें केलें, त्याची सर्व ग्रंथकार निंदा करितात; परंतु तें सर्व योग्य होतें. तें असें, जितके सेवक आहेत तितक्यांस मुक्त करावें; सर्व जमिनीवर गरीब आणि मातबर यांचा अधिकार समान असावा; आणि सांप्रत जें राज्यांत बंड झालें आहे त्याची क्षमा करावी. तो राजाशीं बोलते वेळेस मध्यें मध्यें डौलानें आपली तरवार वर उच-

ली, तें पाहून **विलियम वालवर्थ**, **लंडन** शहरचा **मेयर*** राजाजवळ होता, त्यास फार राग आला. त्यानें राजाचें काय होईल हा कांहीं विचार न करितां, त्या **टैलरावर** आपले हातीं आयुध होतें तें मारिलें; इतक्यांत राजाचे एके **नैटानें** उठून तरवारीनें त्याचा वध केला. त्या बंडवाल्यांनीं आपला मुख्य पडला पाहून लागलींच राजाचा सूड उगवावयाचा यत्न आरंभिला, आणि आपलीं धनुष्यें नमविलीं. त्या वेळेस **रिचर्ड** राजाचें वय सोळा वर्षांचें नसतांही तो मोठ्या धीरानें घोड्यावर बसून त्या बंडवाल्यांजवळ गेला, आणि स्थीर मनानें बोलिला, "हे माझे प्रजाहो, तुह्मी आपले राजाचा वध करूं इच्छिता कीं काय? तुमचा मुख्य मेला यासाठीं तुह्मांस वाईट वाटलें असेल, तर कांहीं चिंता करूं नका, मी स्वतः सरदार होतों, मला युद्ध करायाची मोकळीक द्या, ह्मणजे तुमचे मनांत आहे तें सर्व तुह्मांस प्राप्त होईल." हें ऐकून ते भ्यालेले लोक तत्क्षणींच आपला उद्योग सोडिते झाले. ते युद्धाकरितां राजाच्या मागून गेले. त्यानें त्यांस पूर्वी जसा नियम करून दिला होता तसा करून दिला; परंतु पुढें तो **पार्लमेंटांत** खोटा ठरवून रद्द केला.

त्या काळपर्यंत राजा आपले दरबाऱ्यांचे आज्ञेप्रमाणें वर्तत असे; ते त्याची सत्ता अगदीं कमी करायास यत्न करीत असत. मग त्यानें **ईस्तर**† नंतर सर्व कारभारी लोकांची मोठी सभा करून विचारिलें कीं, मला वय किती

---

*प्रांतांत एके मोठे गांवांत सरकारचे अमलदार असतात; त्यांतील माजिस्त्रेटीचें ह्मणजे फौजदारीचें काम पाहाणाराचें नांव मेयर.

† ईस्तर ह्मणून एक सणाचा दिवस एप्रिल महिन्यांत येतो.

आहे? तें ऐकून सर्वांस आश्चर्य वाटलें. आपलें वय बावीस वर्षांचें आहे, असें कळल्यावर तो बोलिला कीं, तर आतां दुसऱ्याचे साहाय्यावांचून स्वतः राज्य करायाचा माझा समय झाला. माझ्या गरीब प्रजांसही जितकी सत्ता आहे तितकी मला नसावी याचें कारण कांहीं मला दिसत नाहीं. असें बोलून त्यानें अधिकार स्वाधीन करून घेतला खरा, परंतु ज्या गुणांनीं लोकांची राजावर सतत प्रीति राहते, ते त्यामध्यें नव्हते, असें पुढें लवकरच त्यास कळून आलें. तें असें, त्यास विषयोपभोगाची आणि दंभाची आवड असे; तो हलके लोकांशीं स्नेह ठेवी; आणि आपलें सामर्थ्य तशीच नीति यांची लोकांचे मनांत जरब बसावी असें त्याचें भाषण नसे. अशा गुणांनीं अगोदरच राज्यांत त्याविषयीं तिरस्काराचा उद्भव झाला होता, तशांत त्यानें **ग्लौसेस्तराचे ड्युकावर** कांहीं आरोप ठेवून त्यास **कालेइस** शहरांत पाठविलें, आणि तेथें बंदींत ठेवून मारविलें. हें आणि कितीएक दुसरीं दुष्ट कर्में ईहींकरून तो तिरस्कार वृद्धि पावला.

सन् १३८९.

राजानें कितीएक आपले मित्रांस एकाएकींच मोठ्या पदास चढविलें तेणेंकरूनही लोकांस राजाचा अधिक कंटाळा आला. अशा आचरणांनीं लोकांची आपलेवर इतराजी करून घ्यावी, असा त्याचा दृढ निश्चय दिसत होता खरा; परंतु तो पदच्युत होण्याचें कारण सहज घडून आलें. तें असें, **हरीफोर्डाचे ड्युकानें, नार्फोकाचे ड्युकावर पार्लमेंटांत** असा आरोप ठेविला कीं, तो राजाशीं एकांतीं बोलत असतां कांहीं धट्टाईचे शब्द बोलिला. **नार्फोकानें** ती गोष्ट खोटी असें ह्मटलें; आणि **हरीफोर्डा**-

बरोबर अशी प्रतिज्ञा केली कीं, तूं आणि आपण लढाई खेळूं म्हणजे माझे हातून तें कर्म घडलें नाहीं हा निश्चय होईल. सर्व **लार्डांनीं** त्यास संमति दिली. मग ती लढाई कोठें आणि केव्हां व्हावी तें ठरविलें; आणि सर्व लोक ती केव्हां होईल याची वाट पाहूं लागले. शेवटीं तो लढाईचा दिवस आला, तेव्हां त्या दोघांनीं युद्धास आरंभ केला; इतक्यांत राजानें तेथें जाऊन तें बंद केलें, आणि त्या दोघांसही राज्यांतून निघून जावें म्हणून आज्ञा केली. **नार्फोकाचे ड्युकास** जन्मपर्यंत बाहेर राहावें म्हणून सांगून काढून दिलें, आणि **हरीफोर्डास** दाहा वर्षेपर्यंत बाहेर राहायाची ठेप दिली. असा एकानें कांहींच अपराध केला नसतां, आणि दुसऱ्याचे अन्यायाचा पुरावा न होतां, राजानें दोघांकडूनही देशत्याग करविला. निष्कारण अशी आपली अवस्था झाली पाहून **नार्फोकास** परम क्लेश वाटून तो **वेनिस** शहरास निघून गेला; आणि कांहीं दिवशीं फार दुःख झाल्यामुळें मृत्यु पावला. त्या प्रसंगीं **हरी फोर्डानें** विशेष विचारीपणानें वर्तणूक केली; तें पाहून राजा खुश झाला, आणि त्यास दाहा वर्षांची ठेप दिली होती ती चार वर्षांवर आणिली. राजानें त्यास सनद करून दिली. ती अशी कीं, तो बाहेर असतां जें त्याचे वारशास येईल तें त्यानें भोगावें; परंतु पुढें लवकरच त्याचा बाप **लांकास्तराचा ड्युक** मेला, तेव्हां राजानें ती सनद फिरविली, आणि त्याची संपत्ति सरकारांत घेतली.

अशीं बहुतवेळ राजापासून दुःखें पावून शेवटीं **हरीफोर्डाचे** मनांत राजाविषयीं फार त्रास उत्पन्न झाला. त्यानें तो तंवपर्यंत सोसिला, परंतु त्या समयीं अतिशय संतापून तो

-त्या राजास पदच्युत करायाचा विचार करिता झाला. तो शांत, सावध आणि दृढ मनाचा होता, ह्मणून तें काम करायास त्याचे सारिखें दुसरे कोणास सामर्थ्य नव्हतें. **लिथुनिया*** देशचे नास्तिकांशीं लढाई झाली त्या वेळेस त्यानें मोठा शूरपणा प्रगट केला होता; तो भक्तिमान् आणि पराक्रमी असे; आंतून दुःखें सोसून सोसून त्यास आवेश आला होता; आणि त्याजवळ आपला बेत सिद्धीस न्यायाजोगी संपत्ति आणि सहाय्यही होतें. मग तो इतकीच वाट पाहात होता कीं, राजानें कोठें तरी वाहेर जावें, आणि आपण धुंदाई सुरू करावी. अशांत राजा **अयर्लंडांत** गेला, तो त्यास संधि सांपडली.

मग तो साठ लोक बरावर घेऊन **नातझ** शहरीं धाकऱ्या तारवांत बसला; आणि **इंग्लंडांत** प्रांतांतले **रेवन्स्पर** गांवांत गेला. **नर्थंबलैंडाचा अर्ल**ही फार दिवस राजाशीं वांकडा होता; तो आणि त्याचा पुत्र **हेनरी पर्सी**, ज्याचें नांव शौर्येंकरून **हाट्स्पर** असें पडलें होतें–हे दोघे आपलीं सैन्यें घेऊन त्यास मिळाले. त्यानंतर त्याचे आश्रयास बहुत लोक येऊन राहूं लागले. अशी थोडे दिवसांत त्याची फौज साठ हजार जमली.

असें **इंग्लंडांत** वर्तमान होत असतां, राजा **रिचर्ड अयर्लंडांत** सुखानें वास करीत होता. आपले राज्यांत बंड झालें ही बातमी त्यास वारा उलटा होता यामुळें पाऊण महिनापर्यंत कळली नाहीं; ह्मणून तो निर्धास्तपणानें वीस हजार फौजेनिशीं **मिल्फोर्ड** बंदरीं आला. तेव्हां त्यानें पाहिलें कीं, आपण क्रोधसंतप्त लोकांमध्यें येऊन पडलों;

---

* लिथुनिया हें सांप्रत पोलंड देशाचे एके भागाचें नांव.

यांमध्यें एकही असा नाहीं कीं, ज्यावर विश्वास ठेविला असतां चिंता नाहीं. या राजाच्या उदयकाळांत ज्यांनीं त्याकरवीं पुष्कळ पातकें मात्र करविलीं असे जे पुरुष होते, तेही त्या वेळेस त्यास सोडून गेले. त्याजवळ जी कांहीं थोडी फौज होती, तीही त्याकडून निघून जाऊं लागली; असें होतां होतां, शेवटीं त्यानें पाहिलें तों साहा हजार मात्र फौज जवळ राहिली. तेव्हां शत्रूंस शरण गेल्यावांचून दुसरा उपाय नाहीं असें पाहून, **रिचर्ड** राजानें **हरीफोर्डास** सांगून पाठविलें कीं, तुमची मर्जी जशी असेल तसें करायास मी सिद्ध आहें, आणि तुमचें माझें कांहीं बोलणें व्हावें अशी माझी परम उत्कंठा आहे. **हरिफोर्डानें** तें मान्य करून निरोप पाठविला कीं, **चेस्टर** शहरापासून दहा मैलांवर किल्ला आहे तेथें तुह्मी यावें, ह्मणजे तुह्मी आह्मी बोलूं. दुसरे दिवशीं आपण सर्व सैन्य घेऊन तेथें गेला. त्याच्या पूर्वदिवसींच **नर्थंबर्लंडाचा ड्युक**, **रिचर्ड** राजास तेथें घेऊन गेला होता. **हरीफोर्ड** येतो असें भिंतीवरून पाहतांच राजा खालीं जाऊन त्यास सामोरा गेला. तेव्हां **हरिफोर्डानें** कवच अंगावर धारण केलें होतें त्यासुद्धां तो आंत गेला. त्या गरीब राजाचा मान इतका मात्र रक्षिला कीं, डोक्यावर* कांहीं घातलें नव्हतें. असें असतां, **रिचर्ड** राजानें त्याची मोठे आदरानें भेट घेतली; आणि भाषण केलें कीं, आपण उत्तम समयीं आलां. (असें करण्याविषयीं त्या राजाची प्रख्याति होती.) तें पाहून **हरीफोर्ड** नम्र होऊन शांतपणें ह्मणाला कीं, "हे राजाधिराज, तुह्मीं सांगितलें

---

* आपलेपेक्षां जो मोठा असेल त्याजवळ उघडे डोक्यानें जाणें हा त्याचा मान, अशी विलायती लोकांत चाल आहे.

-होतें, त्यापेक्षां मी अंमळसा लवकर आलों. याचें कारण, मी असें ऐकिलें कीं, एकवीस वर्षेपर्यंत तुह्मी अविचारपूर्वक राज्य केलें. अशा गुणांनीं लोक तुह्मांवर बहुत असंतुष्ट आहेत; परंतु ईश्वराचे इच्छेस आलें तर यापुढें तरी चांगलें राज्य करायास मी तुह्मांस सहाय होईन." या भाषणावर राजानें उत्तर दिलें कीं, "दादा, ही गोष्ट तुमच्या मर्जीस आली, तस्मात् मलाही आवडली."

त्या **हरिफोर्डाचे** सगर्व उत्तरावरून **रिचर्ड** राजास दुःख झालें तें कांहींच नव्हे, पुढें त्यापेक्षां विशेष दुःखाचीं कारणें घडलीं. तीं अशीं, **हरिफोर्ड**, राजाचे सेवकांतून एकाशीं कांहीं शब्द बोलिला; आणि त्यास त्यानें हुकूम केला कीं, राजाचे पागेंतलीं घोडीं बाहेर आणा. त्यानें दोन भिकारी तट्टें त्याजवळ नेलीं. त्यांतून एकावर **रिचर्डास** बसविलें, आणि दुसऱ्यावर राजाचा स्नेही जो **सालस्बरीचा अर्ल** त्यास. अशी राजाची स्वारी **चेस्तरास** नेली. वाटेनें बहुत लोक बरोबर होते, आणि करण्याचा ध्वनि मोठा होत होता. ही राजाची फजीती पाहून लोकांचे मनांत किमपि दया आली नाहीं. या समारंभानें त्यास गांवोगांव हिंडविलें. त्या वेळेस सर्व लोकांनीं त्याची निंदा आणि त्याचे शत्रूची स्तुति केली. आमचा कल्याणकर्ता असा जो **लांकास्तराचा ड्युक** तो बहुत काळपर्यंत वांचो! असा घोष होऊं लागला. या रीतीनें पुनः पुनः त्याची फजीती करून शेवटीं त्यास किल्यावर बंदींत ठेविलें. अशी निकृष्ट दशा पावल्यामुळें, राजसंपत्ति आणि राजाभिमान यांनींच त्या हतदैव राजास सोडून दिलें असें नाहीं, तर जसा त्याचा अवस्थाभेद झाला,

तशी त्याची बुद्धिही खचली. मग त्याच्या शत्रूंनीं असा एक राजीनामा सजिवला, कीं मी राज्य करायास अयोग्य, ह्मणून राज्य सोडून दिलें असे. त्यावर त्याची सही घ्यायास त्यांस संकट पडलें नाहीं. तें झाल्यावर हरिफोर्ड आपणास राज्य असावें असें इच्छूं लागला; परंतु आपला अधिकार पायाशुद्ध व्हावा ह्मणून, त्यानें पार्लमेंटाची संमति घेतली. नंतर रिचर्ड राजाचें अपराधपत्र केलें, त्यांत तेहेतीस कलमें लिहिलीं; त्यांवरून त्यास न्यायानें पदच्युत केलें, आणि चवथा हेनरी असें नांव ठेवून हरिफोर्डास राजा केला. यार्क आणि लांकास्तर या दोन संस्थानांत असा तंटा प्रथम उत्पन्न झाला, तेणेंकरून पुढें कितीएक वर्षेपर्यंत राज्यांत रक्तें पडलीं; आणि शेवटीं राज्यव्यवस्था स्थिर झाली.

असा राजा रिचर्ड पदच्युत झाल्यावर नर्थंबर्लंडाचे अर्लानें, लार्डांचे सभेंत प्रश्न करायाचा उपक्रम केला कीं, रिचर्ड राजास पुढें कोणत्या रीतीनें ठेवावें, याचा काय विचार? त्यावर त्यांनीं उत्तर दिलें कीं, त्यास एखादे चांगले ठिकाणीं कैदेंत ठेवावें, कीं जेथें त्याचे मैत्र आणि साथी यांचा प्रवेश व्हावयाचा नाहीं. असा पुष्कळ बंदोबस्त केला; परंतु तो जीवंत होता तोंपर्यंत हेनरीस सुख झालें नाहीं. पुढें कांहीं दिवसांनीं राज्यांत बंडें आणि दंगे होऊं लागले; तेव्हां हेनरी, रिचर्डाचे मृत्यूकरितां उद्योग करूं लागला. त्यानें त्यावर एक मारेकरी घातला; तो बरोबर आठ आसामी घेऊन हतभाग्य रिचर्ड, पामफ्रेट किल्यांत ज्या ठिकाणीं होता तेथें एकाएकीं गेला. त्यांस पाहून त्यानें जाणिलें कीं, यांचा बेत माझा जीव घ्यायाचा आहे. मग

-कोणत्या तरी उपायानें तो चुकवावा अशा निश्चयानें त्यानें त्यांतून एकाच्या हातांतलें हत्यार काढून घेतलें, आणि तेणें-करून चवघांस मारून आपले पायांजवळ पाडिलें; परंतु शेवटीं त्यांनीं एक वार करून त्याचा जीव घेतला. कितीएक ग्रंथकार ह्मणतात कीं तो बंदींतच असून अन्नासाठीं मेला. असो, ही गोष्ट त्याचे वयाचे चवतिसावे वर्षीं घडली. त्यानें राज्य तेवीस वर्षें केलें. त्याचीं कर्में वाईट खरीं; परंतु अन्यायापेक्षां त्यास शासन फार घडलें, आणि त्यानें दुःखें भोगिलीं, तेणेंकरूनच शेवटीं बहुत लोक त्याचे कुटुंबास आणि पक्षास अनुकूळ झाले. त्यानें फार पवित्र कर्में केलीं असतीं तरीही इतके अनुकूळ होतेना. त्यास धर्मस्त्रीपासून किंवा दुसरे कोणते रीतीची कांहींच संतति झाली नाहीं.

## प्रकरण २६.

### चवथ्या हेनरी राजाची कथा.

संन् १३९९ पासून १४१२ पर्यंत.

अपहरकाचें सिंहासन ह्मणजे कांट्यांची शेज, ही गोष्ट हेनरी राजास लवकर समजली. तो राज्य करूं लागल्यावर पार्लमेंटाचे पहिलेच सेशनांत सभासदांचा त्याविषयीं द्वेष बाहेर फुटला. असे प्रथमचे बखेडे त्याचे व्यवस्थितपणामुळें मोडले गेले खरे; परंतु नर्थंबर्लंडाच्या अर्लानें जो बखेडा केला तो मोठा बळकट झाला. तो होण्याचें मूळ असें, इंग्लिश आणि स्काच यांमध्यें लहानशी एक लढाई झाली; तींत डौग्लासाचा अर्ल आर्चि-

**ग्लेंड**, आणि दुसरे कितीएक मोठे **स्काच** लोक **नर्थंबर्लं-डाचे अर्लानें** धरून **आल्विक** किल्ल्यास नेले. ही बातमी राजा **हेनरीस** समजतांत, त्यानें **अर्लास** सांगून पाठविलें कीं, **स्काच** लोकांशीं तह करायाचे वेळेस कांहीं अधिक मागणें केलें पाहिजे; ह्मणून तुझ्या हातीं सांपडले आहेत त्यांस तसेंच कैदेंत ठेवायाची माझी इच्छा आहे; तर तूं त्यांस पैका घेऊन सोडूं नको. या निरोपाचा **न-र्थंबर्लंडाचे अर्लानें** धिक्कार केला. कारण त्या काळचे युद्धनीतीप्रमाणें तो ज्यांस लढाईंत धरील त्यांस पैका घेऊन सोडून द्यायाचा त्यास अधिकार होता; आणि त्याच्या मनांत होतें कीं, निर्भयपणा आणि राज्य हें राजावर आपलें ऋण आहे. हा अपराध मनांत धरून त्यानें राजास पदभ्रष्ट करायाचा उद्योग आरंभिला, ज्यास राज्य मिळायास मुख्यत्वें साहित्यही त्यानेंच केलें होतें. मग त्यानें **स्काच** आणि वेल्श लोकांची सेना एकत्र मि-ळवून, **मार्टिमर** ह्मणून पुरुष होता, त्यास राज्य द्यायाचे उद्योगास सहाय व्हावें असा एक कावा केला. सर्व त-यारी झाली; परंतु तो **अर्ल**, **बेरिक** शहरांत दुखण्यांत पडला, ह्मणून त्याच्यानें फौजेबरोबर जाववेना असें झालें. ही गोष्ट त्यास फार वाईट वाटली; परंतु त्याचा पुत्र **हेनरी पर्सी**, **हाट्स्पर** या प्रतिष्ठानांवाचा, त्या सैन्यांत होता; त्यानें बाप नव्हता ह्मणून कांहीं न्यून पडूं दिलें नाहीं. **ग्लेंडर** ह्मणून एक वेल्श सरदार त्या पूर्वीं कांहीं दिवस बंदींतून सुटला होता तो आपली फौज घेऊन **श्राप्** प्रांता-पर्यंत पोहोंचला; त्यास जाऊन मिळायाकरितां तो **पर्सी** आपली फौज घेऊन **श्रुस्बरी** जवळ गेला. तीं दोन

सैन्यें एकत्र झाल्यावर त्यांनीं राजापासून आपणांवर झा-लेले जुलुमाचा मोठा विस्तार लिहून प्रसिद्ध केला. त्या बंडाचें वर्तमान ऐकून **हेनरी** मोठा विस्मित झाला. परंतु त्या काळीं दैव त्यास अनुकूळ होतें ह्मणून त्याजवळ थोडी-शी फौज तयार होती, ती घेऊन **स्काच** लोकांशीं लढाई करायाचा त्यानें निश्चय केला; आणि त्या बंडवाल्यांशीं युद्ध करावें ह्मणून तो त्वरेनें **श्रुसबरीस** निघून गेला.

तीं दोन सैन्यें जवळ जवळ आलीं तेव्हां, आपआपला पक्ष सुशोभित करून दाखवायाकरितां, सला करून तंटा मोडावा अशी उभयपक्षांची इच्छा दिसली; परंतु मागणी करून ठराव होऊं लागला तेव्हां तहाचें बोलणें तंट्यावर गेलें; आणि परस्परांची भर्त्सना करण्यास प्रारंभ झाला. एकीकडे बंडाई आणि अनुपकारिता; आणि दुसरेकडे अप-हार आणि औद्धत्य हीं होतीं; ह्मणून परस्परांची निंदा करूं लागले. एक एकाचे सैन्यांत फौज सुमारें बारा बारा हजार होती; आणि त्या दोहोंमध्यें द्वेषही फार वाढला होता. मग युद्धास प्रारंभ झाला, त्यामध्यें उभयपक्षांचे सरदारांनीं मोठ्या शौर्यानें बंदोबस्त राखिला, जेथें लढाई दाट होई तेथें **हेनरी** आहे असें दिसे; आणि जो पुढें **फ्रान्स** देश घेऊन विख्यात झाला असा त्याचा पुत्र, तोही त्याचे जवळ असून युद्ध करी. त्याचे तोंडावर एक बाण लागला, तरी त्यानें युद्ध न सोडितां बहुत पराक्रम केला. तिकडे **हाट्स्परानें**ही बहुत संग्रामांत जी कीर्ति संपादिली होती ती गमाविली नाहीं. राजा कसा तरी हातीं यावा याविषयीं त्यानें फार प्रयत्न केला. शेवटीं कोणी न कळत त्यावर बाण मारून त्यास मारिलें, तेव्हां युद्ध समाप्तीस गेलें; आणि

हेनरी राजाचें दैव पुनः एकवेळ फळफळलें. त्या दिवशीं सुमारें दोन हजार तीनशें प्रतिष्ठित गृहस्थ मेले, आणि दुसरे लाहान सहा हजार पडले; त्यांतून दोन तृतीयांश हाट्स्पराचे सैन्यांतले; अशी कथा सांगतात.

असें भयंकर कर्म चालिलें असतां, नर्थंबर्लंड दुखण्यांतून वरा होऊन कांहीं फौज घेऊन बंडवाल्यांचे मदतीस जात होता; तेव्हां त्यानें वाटेनें आपला मुलगा आणि भाऊ यांची विपत्ति श्रवण केली. त्या वेळेस विजयेंकरून चढून गेलेली जी शत्रूंची पुष्कळ फौज तिजपुढें थोडें सैन्य घेऊन त्यास जायाचा धीर होईना, ह्मणून त्यानें लोकांस निरोप दिला. मग कांहीं दिवसपर्यंत तो अर्ल पळून जाऊन तरी निर्भय व्हावें ह्मणून प्रयत्न करीत होता. परंतु जिकडे तिकडे लोक पाठीस लागल्यामुळें तो केवळ निरुपाय झाला; आणि समजला कीं, जन्मवर कोठें देशांतरीं राहून दारिद्र्य दुःख भोगावें, त्यापेक्षां राजासच शरण जावें हें चांगलें. असें मनांत आणून तो यार्क शहरांत जाऊन हेनरी राजास भेटला, आणि बोलिला कीं, मी लढाईची तयारी केली याचें कारण इतकेंच कीं, मार्टिमर आणि आपण या दोघांमध्यें मध्यस्थी करून तंटा मिटवावा. हें त्यानें सांगितलेलें लाहान तर खरें, परंतु तेणेंकरून राजाची खातरी होऊन अर्लास क्षमा मिळाली. बहुधा हेनरी राजानें मनांत असें आणिलें असेल कीं, याचें सैन्य नाश पावलें आणि प्रियपुत्र मेला, हें यास पुष्कळ शासन झालें.

राज्यांत अशी स्वस्थता झाली तेणेंकरून, राज्याचे प्रारंभीं कांहीं दुष्ट आचरण केल्यामुळें आपली लोकांत जी अपकीर्ति झाली होती, तिचा वि- इ. सं. १६०७

सर पडावा अशी राजाचे मनांत इच्छा होती याकरितां पूर्वीं जी प्रतिनिधी जवळ सत्ता नव्हती ती त्यानें त्यांस दिली. त्याचे राज्याचे सहावे वर्षीं, त्यानीं त्यास खर्चाची पुरवणी करण्याकरितां संमति दिली; तेव्हां पैका जातो याचा खर्च होतो कीं नाहीं हें पाहायाकरितां त्यांनीं जामदार नेमिले; आणि त्यांनीं आपले हिसाब आणून दाखवावे असा हुकूम केला. तसाच राजाचे घरगुती खर्चवेचाचे वगैरे बंदोबस्ताप्रकरणीं तीस कलमांचा कायदा ठरविला. सारांश, पूर्वींच्या सर्व राजांपेक्षां चवथ्या **हेनरीचे** राज्यांत त्यांची सत्ता आणि अखत्यार नीट चालिला. एकवेळ गेलेली कीर्ति पुनः मिळवायाचे **हेनरी** राजाचे या प्रकारचे उद्योग सफळ होत चालिले असतां, त्याचा पुत्र **हेनरी** याचा प्रयत्न लोकांचा द्वेष संपादान करायाकरितां चालिला होता. तो सर्व रीतींचा व्यभिचार करी, अशी त्याची प्रसिद्धि होती; त्याजवळ नेहमी हलके लोकांची मंडळी असे; आणि तो त्यांत मुख्य होत्साता नाना प्रकारचीं दुष्कर्में करीत असे. त्या राजपुत्रानें पूर्वीं बहुत वेळ आपलें शौर्य, सुवृत्त आणि औदार्य, यांच्या प्रचीति दाखविल्या होत्या; परंतु त्या वेळेस आपले थोर पदवीची त्यास केवळ विस्मृति पडून तो दुराचरणीं प्रवृत झाला; असें पाहून राजा **हेनरीस** परम दुःख वाटलें. त्याचे अविनयाची इतकी पराकाष्ठा झाली कीं, त्याच्या एके सोबत्यास, कांहीं अन्यायाची चौकशी करायासाठीं, राजाचा मुख्य न्यायाधीश **सरविलियम ग्यासकाइन** होता त्यानें बोलावून नेलें, तेव्हां राजपुत्रास तें पाहून क्रोध आला, आणि भरकचेरींत त्यानें न्यायाधीशाच्या तोंडांत मारली. त्या वेळेस आपले पदाच्या मानाप्रमाणें तो न्यायाधीश

आपले थोरपणास योग्य असें वर्तला. त्यानें हुकूम केला कीं राजपुत्रास नेऊन बंदींत ठेवावें. हेनरी राजा मनुष्यमात्राचा यथायोग्य परीक्षक होता; त्यास वें वर्तमान समजतांच मोठ्या हर्षानें तो बोलिला;"असे अपराधाचें शासन करायास ज्यामध्यें धीर, असा न्यायाधीश ज्या जवळ आहे त्या राजाचें दैव काय सांगावें! आणि दुसरें, ज्याचा पुत्र त्या शासनास कबूल झाला, त्याचा भाग्योदय तर विशेषच." राजाचे सत्तेशीं विरुद्ध न्यायाधीश चालिला अशीही कथा प्रथमच आली. याचे पूर्वींच्या अशा कथा वाचिल्या आहेत कीं, न्यायाधीश ह्मणजे राजाचे मर्जीप्रमाणे वागणारा होय.

पूर्वीं कांहीं दिवस हेनरी राजाची शरीर प्रकृति बरी नव्हती. ह्मणून तो हें वर्तमान झाल्यावर फार वांचला नाहीं. त्यास नेहमीं मूर्छा येत असे, आणि शुद्ध नाहींशी होई; शेवटीं त्यानेंच तो वेस्त्मिन्स्तरांत मृत्यु पावला. त्या वेळेस त्याचें वय चाळीस वर्षांचें होतें. त्यानें चवदा वर्षें राज्य केलें.

## प्रकरण १७.

### पांचव्या हेनरी राजाची कथा.

संन् १४१२ पासून १४२२ पर्यंत.

या राजानें प्रथम चांगलें आचरण केलें. त्यानें पूर्वींच आपले लुचे सोबत्यांस बोलावून आणलें, आणि सांगितलें कीं, पुढें चांगले गुण धरावे असें माझे मनांत आहे, तर तुह्मीही असेंच करा. असा उपदेश करून त्यांस लावून

दिलें; त्यांस तेव्हां उपजीविकेपुरतें मात्र स्वास्थ्य करून दिलें; आणि सांगितलें कीं, तुह्मी दुर्व्यसनें सोडून योग्य झालां असें मला दिसलें, ह्मणजे मी तुमची कांहीं तरी मोठी सोई करीन. त्याच्या बापाचे वेळचे विश्वासू कारभाऱ्यांनीं पूर्वीं जो राज्य कारभार केला होता, त्याविषयीं त्यांचे मनांत भय होतें; परंतु यानें आश्वासन देऊन त्यांशीं सख्य केलें. **सरविलियम ग्यास्काइन** ह्मणून जो पूर्वीं न्यायाधीश सांगितला, तो तर फारच भय पावला होता कीं, राजा आपणाशीं अधिक द्वेष करील; परंतु राजानें त्याची योग्य स्तुति करून त्यास बोध केला कीं, पक्षपातावांचून पुढेंही असाच कर्डा अंमल बजावीत जावा.

ज्यास **विक्लिफाचें** पांखड, किंवा **लालर्डिझम्** (धर्मांतर व्यवस्थेचें मूळ) ह्मणत असत, तें या समयीं उत्पन्न झालें; आणि दिवसानुदिवस जिकडे तिकडे पसरत चालिलें. **काभम** शहरचा **बारन** जो **सरजान ओल्डक्यास्तिल**, त्याचे आश्रयानें व तो त्यास साधक भाषण उघड सभेमध्यें करी, तेणेंकरून तें मत वाढत चालिलें. तो राजाचे घरगुती कामगारांतला एक होता, आणि त्यावर राजाची फार कृपा होती. महा धर्माध्यक्षानें त्यास धरून नेऊन आपले दुसरे **बिशपांचे** मदतीनें, त्यास स्वेच्छाचारी ठरवून जीवंत पुरावें असा हुकूम केला. त्यास किल्ल्यावर ठेविलें होतें, तेथून तो मारायाचे पूर्व रात्रीं पळून आपले पक्षाचे लोकांजवळ चोरून गेला; आणि त्यांस धीर देऊन आपले शत्रूंचा अकस्मात् सूड उगवायाकरितां **लंडनास** घेऊन चालिला. राजास त्याचा बेत समजला, ह्मणून त्यानें शहरचे दरवाजे लावयाचा हुकूम केला, आणि आपण कांहीं लोक बरोबर

घेऊन रात्रीं सेंट जैल्स् फील्डांत गेला. त्या ठिकाणीं जेवढे बंडवाले होते तितक्यांस धरिलें; आणि पुढें कितीएक टोळ्या नेमिलेले ठिकाणीं जात होत्या त्यांसही हस्तगत केलें. त्यांतून कितीएकांचा शिरच्छेद केला; आणि बहुतांस क्षमा केली. त्या वेळेस काभम तर सुटून पळाला; परंतु पुढें चार वर्षांनीं तो सांपडला. त्याजकडून जीं दुःखें भोगविलीं, तीं मनुष्यांस कधीं पूर्वीं सुचलीं नव्हतीं. त्याचे शरिराच्या मध्यभागीं सांखळी बांधून त्यास टांगलें, आणि हलका विस्तव पेटवून होरपाळून टाकिलें.

अशीं दुष्ट कर्मे लोकांच्या मनांतून जावीं ह्मणून हेनरी राजानें बेत केला कीं, फ्रान्स देश या वेळेस मोठ्या विपत्तींत आहे, तेथें जाऊन आपलें कार्य साधावें. मग त्यानें सौथप्टन शहरांत पुष्कळ फौज आणि गलबतें जमविलीं. तेव्हां त्याजवळ साहा हजार पायदळ जमलें. त्यांत बहुतकरून तिरकमठेवाले फार होते. त्या फौजेसहित तो जाऊन हार्फ्लुअर गांवांत उतरला. त्याचे शत्रूंस युद्ध करायाचें विशेष सामर्थ्य नव्हतें; परंतु शत्रूंनीं कर्तव्य जें काम तें तेथील हवेनेंच सिद्धीस नेलें. तें असें कीं, कांहींएक जातीचा रोग उत्पन्न होऊन हेनरी राजाचें तीन चतुर्यांश सैन्य मेलें. तेव्हां तो पश्चात्ताप पावला कीं, जेथें रोग आणि बलिष्ठ सैन्यहीं जिकडून तिकडून नाश करितात, तेथें आपण आलों हा मूर्खपणा केला. मग त्यानें कालेइस शहरांत जाऊन राहायाची मसलत केली.

राजा तेथें जात असतां, वाटेंत त्याचा घात करावयाचा शत्रूंनीं बेत केला होता. मग तो ब्लांजी शहराजवळची तर्नोइस नदी उतरला तों, आजिन् कोर्टाचे मैदानांत

**फ्रेंचांची** सर्व फौज पाहून चकित झाला. त्याचें सैन्य अशो ठिकाणीं येऊन पडलें कीं, युद्ध केल्यावांचून पुढें जातां येऊं नये. त्या वेळेस तो परम प्रतिकूळ अवस्थेंत पडला. दुखण्यानें फौजेचा नाश झाला; श्रमानें शिपाई थकले; सामान नाहीं; आणि मागें फिरल्यामुळें हिंमतही खचली. त्याची सर्व फौज सुमारें नऊ हजार, आणि शत्रूंची सुमारें दहापट अधिक असून शूर सरदार, आणि सामान सुमानही पुष्कळ; सारांश अशाशीं युद्धास उभें राहायाचा त्यास प्रसंग आला. मग **फ्रेंचांजवळ** सैन्य पुष्कळ आहे असें पाहून त्यानें दोन अरण्यांचे मध्यें एक अरुंद स्थळ होतें तेथें तळ दिला. त्या दोहीं अरण्यांचा सैन्याचे दोन्ही बाजूंस बंदोबस्त होता; ह्मणून तेथें तो स्वस्थपणें शत्रूंनीं हल्ला करायाची वाट पाहात राहिला. **फ्रेंच** सैन्याचा सरदार **फ्रान्स्** देशाचा **कान्स्तेबल्*** होता; आणि **इंग्लिशांचे** फौजेत स्वतः **हेनरी** राजा, आणि **यार्कांचा ड्युक एड्वर्ड** हे होते. कांहीं वेळपर्यंत दोन्ही फौजा जशा काय युद्धास प्रारंभ करायास भ्याल्याच, अशा एकमेकांकडे पाहात राहिल्या; आणि चढून जाऊन आपल्या रांगा फोडीनात; असें पाहून **हेनरी** राजा हास्यमुख करून बोलिला, "हे माझे मित्रहो, ते प्रारंभ करीत नाहींत तर आपण त्यांस करून दाखवूं. व्हातर आतां पुढें, देव त्रितय तुमचें संरक्षण करील." हें ऐकून शब्द करीत ते **इंग्लिश** पुढें झाले; तंवपर्यंत **फ्रेंच** त्यांस न भिऊन वाट पाहात वसले होते. ज्या **इंग्लिश** तीरंदाजांची मोठी कीर्ति होती, त्यांनीं तीन फुट लांब

---

* कान्स्तेब्ल ह्मणून जुना फ्रेंच लोकांत किताब असे. आतां कोतवालाचे हाताखालीं जो कामगार असतो, त्यास कान्स्तेब्ल ह्मणतात.

असे बाणांची एकदम वृष्टि केली; तीपासून शत्रूंचा बहुत नाश झाला. ते तीरंदाज तोंपर्यंत कोठें लपून होते, आणि अकस्मात् येऊन बाण मारूं लागले; त्यांवर फ्रेंचांचे घोडेस्वार चढून गेले; त्यांची अशी धांदल झाली कीं, इंग्लिशांनी तें पाहून धनुष्य बाण टाकून दिले; आणि ते तरवारी घेऊन त्यांमध्यें शिरले. इंग्लिश दुखण्यामुळें अशक्त झाले होते, ह्मणून प्रथम त्यांस फ्रेंचांनी मागें पळविलें; परंतु त्यांचा पराक्रम असा कीं, ते अकस्मात् शत्रूंवर जाऊन कोसळले; तेणेंकरून फ्रेंचांचा पराजयच झाला.

फ्रेंच त्या लढाईत सर्वत्र पराभव पावले; त्यांची फौज अरुंद जाग्यांत होती, ह्मणून तीस पळतां येईना; आणि लढाईही साधेना. यामुळें त्यांनीं इतकें मात्र केलें कीं, प्रेतांचे ढिगांनीं भूमि व्यापिली. शत्रूंपासून निवारणाचें भय अगदीं गेल्यावर, सैन्याचे पाठीमागच्या बाजूनें एक दंगा झाला. तो असा, कितीएक भिकाऱ्यांनीं येऊन इंग्लिशांचे बुणग्यावर हल्ला केला; आणि तें राखीत होते, त्यांस मारूं लागले. मग हेनरी राजा चहुंकडून शत्रूंचा उपद्रव पाहून मनांत भिऊं लागला कीं, आपले फौजेपेक्षां बंदीवान अधिक आहेत, हे आपल्यास एखादें अरिष्ट करितील. ह्मणून त्यानें हुकूम केला कीं, त्या सर्वांस मारावें. परंतु आपल्यास निश्चयें विजय प्राप्त झाला हें त्यास समजतांच, त्यानें तो बंद केला; आणि बहुतांचे प्राण रक्षिले. हा विजय मिळाला त्यापासून त्याची मोठी कीर्ति झाली असती, पण अशा दौरात्म्यानें ती फुकट गेली. त्या काळीं असेंच होतें कीं, शौर्य आणि क्रूरपणा यांनीं एकत्र वास करावा. त्या लढाईत फ्रेंचांचे सुमारें दहा हजार लोक

पडले, आणि चवदा हजार धरिले गेले; आणि **इंग्लिशांचे** सर्व मिळून चाळीस मेले.

इ. स. १४१७ त्या काळीं **फ्रान्स** देशाची मोठी हलाखी होती; सर्व राज्य असें दिसूं लागलें कीं, जशी, अपराध, खून, अन्याय आणि नाश, यांची शाळाच. **बर्गंडीचे ड्युकानें, आर्लियन्साचे ड्युकास** मारिलें, व त्याला **फ्रान्स** देशचे वडील राजपुत्रानें मारिलें. **चार्लिस*** भितरा होता ह्मणून तो कोणते कामाची चौकशी करीत नसे. राजा **हेनरीनें** विजय मिळवून आणि तह करून शेवटीं **फ्रेंच** राज्याचा अधिकार मिळविला. त्या तहनाम्यांत मुख्य कलमें हीं होतीं—**फ्रान्स** देशाचे राजाची मुलगी **क्याथेरैन** इशीं **हेनरीनें** लग्न करावें; **चार्लिस** राजानें जन्मवर आपलें पद आणि अधिकार यांचा उपभोग करावा; **हेनरीला** राज्याधिकारी ह्मणावें; आणि त्यानें राज्य कारभार करावा; पुढें **फ्रान्स** आणि **इंग्लंड** या दोन देशांचें राज्य एका राजानें करावें; परंतु दोन्ही देशांत तेथील राज्यनीति आणि अधिकार पूर्ववत् राखावे.

इ. स. १४२१ हा अधिकार मिळाल्यावर **हेनरी** राजा **पारिस** शहरांत राहूं लागला. त्या दोन राजांमध्यें **चार्लिसाचे** दरबारांत लोक फार नसत; परंतु **हेनरी** जवळ मोठी सभा असे. एके दिवशीं ते दोन राजे आणि त्यांच्या बायका, मस्तकांवर मुकुट घातलेल्या, एकत्र जेवायास होत्या. लोक **चार्लिसास** बाहेरून मात्र मान देत असत; परंतु राजा **हेनरी** सत्तेनें आज्ञा करीत असे. अशी त्याची कीर्ति शिखरास जाते आहे, आणि दोन्हीं

---

* फ्रान्स् देशीं जो त्या काळीं राज्य करीत होता.

राज्यें त्यास प्राप्त झालीं आहेत; अशांत, त्यास एक रोग झाला; तेणेंकरून तो आपले वयाचे चवतिसावे वर्षी मरण पावला. त्यानें दाहा वर्षे राज्य केलें.

---

## प्रकरण १८.

### साहाव्या हेनरी राजाची कथा.

संन् १४२२ पासून १४६१ पर्यंत.

राजाचा भाऊ बेड्फोर्डोचा ड्युक त्या काळचे पुरुषांत मोठा गुणी होता. त्यास पाण्यांतून आणि जमिनीवरून युद्ध करायाचा सारिखा अभ्यास असे; ह्मणून हेनरी राजाचा पुत्र (जो एक वर्षाचाही नव्हता) तो मोठा होईपर्यंत त्या ड्युकानें काम चालवावें असें पार्लमेंटानें ठरविलें. त्यानें इंग्लंडाचें पालन करावें, धर्माची संस्थापना करावी, आणि राजपुत्रास मसलत सांगावी, असें केलें. तेव्हां फ्रान्स देशाकडे सर्व इंग्लिशांचें लक्ष्य लागलें आहे, असें पाहून ड्युकानें सर्व लोकांचें सामर्थ्य त्या देशाकडे लावण्याचा यत्न केला.

पुढें फ्रान्स देशांत दुसरी एक अदलाबदल झाली. तिला जीं कारणें झालीं त्यांचा विचार केला असतां तीं असें काम सिद्धीस जाण्याविषयीं फार निर्बळ होतीं असें दिसतें. तीं अशीं.–

लरेइन प्रांताचे कांठास वोकुलोर शहराजवळ डाम्रेमि गांवांत एके खेडें गांवाची बायको राहात असे. ती सत्तावीस वर्षांची होती. तिचें नांव जोन आफ् आर्क. ती

बायको एके लाहान पांथशाळेंत* चाकरीस असे. त्या गरीब दशेंत काम करून तिचें शरीर इतकें कठीण झालें होतें कीं तें लढाई करायाचे उपयोगीं पडावें. तिचें आचरण निर्दोष होतें; आणि पुढें थोडे दिवशीं तीमध्यें जे गुण दृष्टीस पडले, त्यांचें अगोदर कांहींच लक्षण दिसत नव्हतें. आपला देश विपत्तींत पडला, ही गोष्ट तिच्या मनांत येऊन तिला फार वाईट वाटे; आणि तिच्या चित्तांत कितीएक संकल्प उत्पन्न होत. ते ईश्वरानेंच सुचविले, असें तिला वाटे. पुढें आपली मसलत नीट आहे, अशी तिची खातरी झाली; आणि ती वोकुलोर शहरचा अंमलदार बाद्रीकोर्ट ह्मणून होता त्याजवळ जाऊन बोलिली कीं, आपला देश या दुष्ट लबाडांपासून मुक्त करायास मला देवानें निर्माण केलें आहे. तें ऐकून प्रथम बाद्रिकोर्टानें तिची फारशी वासपूस केली नाहीं; परंतु शेवटीं तिचा अतिशय आग्रह पाहून त्यानें बरोबर कांहीं लोक देऊन तिला चिनन शहरास पोंचतें केलें. त्या शहरांत तेव्हां फ्रेंचांचें दरबार असे.

ती बोलत असे तें सर्व व्यर्थ, असें तेथील दरबारी लोकांचे बहुधा ध्यानांत आलें असेल, परंतु आपलें क्षयास जाणारें जें राज्य त्याचें रक्षण ज्या उपायानें होईल, तो करायाचा ठेवूं नये, असें त्यांचे मनांत होतें. ह्मणून असें प्रसिद्ध केलें कीं, जोनेच्या शरीरांत ईश्वरी संचार झाला आहे. ती राजा जरी सर्व अलंकार भूषणें टाकून आपले अमात्य मंडळींत बसला, तरी त्यास ओळखते; राजास

---

* पांथशाळा ह्मणजे, वाटसरू लोकांस पैका घेऊन खाया पियास घालायाचा सरंजाम ज्यांत असतो, तें घर.

मात्र त्या कितीएक खुणेच्या गुह्य गोष्टी ठाऊक आहेत, त्या ती सांगते; आणि **सेंटक्याथेरिन डीफयर्बोआचे** देवळांत एक तरवार आहे, ती तिनें कधीं पाहिली नसतां, ती अमके रीतीची आहे हें यथास्थित सांगून ती आपले जवळ घेऊन या असें बोलते. या रीतीनें साधारण अज्ञान लोकांचे मनांत तिच्या दर्शनाविषयीं औत्सुक्य उत्पन्न झाल्यावर, तिच्या अंगांत डोकीपासून पायांपर्यंत कवच घातलें, आणि लढाईचा वेष देऊन लोकांचे दृष्टीस पाडिली. पुढें तिला सर्व विद्यालयांतील विद्वानांपाशीं नेलें. ते तत्समयानुसार भोळेपणाचे योगानें, अथवा तें ढोंग सिद्धीस जावें अशे मसलतीनें, ह्मणाले की, वास्तविक, इच्या मनांत ईश्वरी संचार झाला आहे खरा.

या रीतीनें तिचे उद्योगाची तयारी लोकांस उघडपणें जाहीर झाल्यानंतर, तिला शत्रूंवर पाठवायाची त्यांनीं मसलत केली. त्या वेळेस **चार्लिस** राजा चोरून **आर्लियन्स** शहरांत जाऊन राहिला होता; **इंग्लिशांनीं** त्या शहरास वेढा घातला होता; आणि तें अनायासें त्याचे स्वाधीन होईल असें दिसत होतें. **जोननें** तो वेढा उठवायाचें काम पत्कारिलें, आणि आपली कीर्ति विशेष व्हायाकरितां, पूर्वी ज्या तरवारींची इतकी प्रख्याति झाली होती, ती कमरेस बांधिली. या रीतीनें सिद्ध झाल्यावर, तिणें फौजेस, पुढें जायाचे पूर्वीं, शपथा घ्यायाचा हुकूम केला; आपले हातांत एक ईश्वरी चिन्ह धारण केलें; आणि सैन्यास आश्वासन दिलें कीं, फत्ते झालीच ह्मणून समजा. तिनें असा निश्चय दाखविला तेणेंकरून **फ्रेंचाचे** फौजेस हुशारी आली. पुढें जे **इंग्लिश** पूर्वीं तिचे उद्योगाची थट्टा करीत होते, तेही

तिला मनांतून भ्याले; आणि आपला प्रयत्न हळूहळू कमी करीत करीत, शेवटीं अकस्मात् वेढा उठविते झाले. पुढें **फ्रेंचांचा** उत्तरोत्तर जय होत चालिला. शेवटीं त्यांच्या राजास **रीम्स** शहरांत राज्याभिषेक झाला. असें घडून येईल ह्मणून पूर्वींच **जोनेनें** सांगितलें होतें.

हा उत्साह झाल्यावर उत्तरोत्तर **फ्रेंचांची** फत्ते होत चालिली. परंतु पुढें **जोन** एक फौजेची टोळी घेऊन **कोंपेन** शहर, ज्यास **बर्गंडीचे ड्युकानें** वेढा घातला होता, त्यांत शिरली; आणि तेथून ती शत्रूंशीं युद्ध करीत होती; इतक्यांत त्या शहरचे अम्मलदारानें दरवाजे लाविले, ह्मणून ती कैदेंत पडली. **बेड्फोर्डचे ड्युकास** तें वर्तमान समजतांच, ज्या **कौंट वांडामानें** तिला धरिलें होतें, त्यापासून तीस विकत घेऊन बंदींत घातलें. **इंग्लंड** आणि **फ्रान्स** या दोन्ही देशांतील लोकांमध्यें भोळेपणा त्या वेळेस इतका होता कीं, एखादी गोष्ट त्यांचे मनोगतास मिळाली ह्मणजे, ती खरी वाटायास चिंता नव्हती. थोडे दिवसांपूर्वीं, फत्ते झाल्यामुळें **जोनेला** सिद्ध अशी मानीत असत; परंतु पुढें बंदींत पडल्यावर तिला गौडबंगाली ह्मणूं लागले. असें बोलत कीं, कोणी भूत तिला कांहीं दिवसपर्यंत सहाय झालें होतें तें सोडून गेलें. ह्मणून तिची **रुआन** शहरांत चौकशी केली, आणि तीवर गौडबंगाल आणि लुच्चाई यांचा आरोप ठेवून तीस जीवंत पुरावें असा हुकूम दिला; आणि तो निर्दयपणानें सिद्धीस नेला.

पुढें **इंग्लिशांस** जीं संकटें येऊं लागलीं, त्यांस कांहीं उपाय चालेना. **पारिस** शहर पूर्वींप्रमाणें **फ्रेंच** राजाचे हातीं आलें; आणि या रीतीनें हळूहळू **फ्रेंचांनीं** पाय

शिरकविला. पुढें थोडीं वर्षें गेल्यावर, **फ्रान्स** देशांत जीं **इंग्लिशांनीं** ठाणीं केलीं होतीं, त्यांतून एक **क्यालेइस** मात्र त्यांकडे राहिलें. त्या देशांत इतकीं माणसें आणि पैका खरचला, त्याचें हें कायतें फळ झालें. पुढें **हेनरीची** अशक्तता स्पष्ट दिसून आली; आणि बाहेर कोठें लढाई नाहींशी झाली ह्मणून लोक आंतलेआंत तंटा लागायाविषयीं उद्योग करूं लागले. पूर्वीं संपत्तिकाळांत जो पक्ष गुप्त होता, तो त्या वेळेस उघड झाला. तें वर्तमान असें, तिसऱ्या **एड्वर्डाचा लयोनल** ह्मणून जो वडील पुत्र, त्याचे कन्यावंशाकडचा **रिचर्ड** नामें एक पुरुष **यार्काचा ड्युक** होता; आणि त्या वेळेस राज्य करणारा जो **हेनरी** तो, त्या **एड्वर्डाचा** धाकटा मुलगा जो **जानआफगांट** होता, त्याचे वंशांतला; ह्मणून **हेनरीचे** पूर्वीं आपणास राज्य करायाचा हक्क, असा **रिचर्डानें** अभिमान धरिला. त्यास वाटलें कीं, आपला लोभ सिद्धीस जायास हा चांगला समय आहे. मग **रिचर्डाचा** पांढरा गुलाब, आणि **हेनरीचा** तांबडा गुलाब अशीं दोन चिन्हें त्या दोघांनीं धारण केलीं. त्यावरून त्या दोन पक्षांसही तीं नांवें पडलीं; ज्यांहींकरून पुढें सर्व राज्यांत बहुत रक्तपात झाला.

त्या राज्यांत लोक संतुष्ट नव्हते, ह्मणून जिकडे तिकडे हाहाःकार उठला; तेणेंकरून बंडें उत्पन्न होऊं लागलीं; त्यांत एक फारच प्रबळ झालें. त्यामध्यें मुख्य **जानकेड** होता. त्या **जानकेडाचें** जन्म **अयर्लंडांतलें**; तो कांहीं अन्यायाकरितां **फ्रान्स** देशांत पळून गेला होता; आणि परत आला तेव्हां लोकांचें लक्ष्य कांहीं तरी भयंकर कर्म करण्याकडे पाहून त्यानें आपलें नांव **मार्टिमर** ठेविलें.

पुढें तो वीस हजार **केंतिश** फौज घेऊन राजधानीकडे आला, आणि **ब्लाकहीथ** ठिकाणीं तळ देऊन राहिला. राजास ही गोष्ट समजतांच, त्यानें निरोप सांगून पाठविला कीं, आमच्या मनांत दुष्ट अमात्यांचें शासन करून लोकांचीं दुःखें दूर करावीं असें आहे. पुढें त्यानें लबार्डानें गांवांतले लोकांशीं कांहीं तरफदारी केली; यामुळें तो **राचेस्तरास** चोरून निघून गेला, आणि तेथून एकटा **केंत** प्रांतांतील रानांत पळाला. पुढें त्याचें डोकें जो घेऊन येईल त्यास अमूक इनाम मिळेल असें जाहीर केल्यावर, त्यास धरून मारिलें.

त्या काळीं **यार्कांचा ड्युक** आंतून हा तंटा वृद्धिंगत व्हावा ह्मणून प्रयत्न करीत होता; आणितो लोकांचे पक्षाचें आपणास अगत्य आहे, असें दाखवून आंतून राज्य मिळवायाची इच्छा करीत असे. या गोष्टीचें तर त्यास अतिशयच अगत्य होतें खरें; परंतु कांहीं वेळपर्यंत, तें राज्य जबरदस्तीनें घेतलें असतां कसें होईल, असा आपलेच मनांत संशय आणून तो उगींच होता. जी गोष्ट त्याचे युक्तींनीं घडून येईना, ती दैववशात् त्याचे इच्छेप्रमाणें घडून आली. ती अशी, राजास कांहीं दुखणें लागलें, तेणेंकरून त्याचा जो स्वाभाविक भित्रेपणा होता तो अधिक झाला. तो इतका वाढला कीं, बाह्यात्कारेंहा राज्य धारण करायाची त्यास शक्ति राहिली नाहीं. ह्मणन **यार्क** नांवाच्या पुरुषास राज्याचा **लेफटेनंट*** आणि संरक्षक हीं पदें देऊन कामावर स्थापिलें. त्याजकडे सत्ता इतकी दिली कीं, त्यानें मर्जीस येईल तेव्हां **पार्लमेंटाची** सभा करावी.

---

* लेफटेनंट ह्मणजे प्रतिनिधि. हें लढाई खात्यांत एक पद आहे.

या रीतीनें मोठी सत्ता हातांत आल्यावर, तो **यार्क** कांहीं दिवसपर्यंत स्वस्थपणें तिचा उपभोग घेत होता; इतक्यांत हतदैव **हेनरी** राजा सुस्तीचे दुखण्यांतून बरा झाला. तेव्हां जसा एखादा स्वप्न पडून अकस्मात् जागा होतो, तसा तो आपली सर्व सत्ता गेली असें पाहून चकित झाला. राजा **हेनरीनें, मार्गारेट आफ आंजु** नामक स्त्रीशीं लग्न केलें होतें. त्या बायकोची बुद्धि पुरुषासारिखी शूरत्वाची होती, ह्मणून तिनें राजास युद्ध करणें अवश्य केलें. मग उभय पक्षांची लढाई होऊन **यार्काचा** पूर्ण जय झाला. त्या लढाईंत वार लागल्यामुळें **हेनरी** एका जवळचे झोपड्यांत जाऊन दडून राहिला होता, तेथें तो धरिला गेला; परंतु कैदेंत असतांही **यार्कानें** त्याचा ममतेनें चांगला समाचार घेतला.

**हेनरीचे** कैदेंतही राजासारिखे उपचार चालिले होते; आणि तो जातीनें आळशी आणि अशक्त होता ह्मणून, त्या दशेंतच त्यास संतोष आहे असें दिसे. ज्या सत्तेचा उपभोग श्रमानें होतो, ती गेली ह्मणून त्यास खेद झाला नाहीं. परंतु, जी पूर्वीं त्याची **मार्गारेट** ह्मणून राणी सांगितली, तिनें त्यास पुनः एक वेळ त्याच्या अधिकारीं स्थापण्याचा उद्योग केला. तिचें आणि **यार्काचें** सैन्य **स्ताफोर्द** प्रांतांत **बोर्हीथ** ठिकाणीं येऊन राहिलें. तेथें प्रथम **यार्काचा** थोडासा जय झाला; परंतु **सर आंद्रु त्रालप** ह्मणून एक सरदार होता, तो त्यापासून आपले सगळे लोक घेऊन राजपक्षास मिळाला. तें पाहून **यार्काचे** लोक मनांत फार भय पावले, आणि एकही वार न करितां दुसरे दिवशीं त्यांची फाट-

ता० २३ सप्तंबर संन् १४५९

फूट झाली. पुढें कितीएक लढाया झाल्या, त्यांत उभय **पक्षांचाही** जय झाला. असें होई कीं एक वेळ **मार्गारिटचा** जय होई, दुसऱ्यानें तिला देश सोडून जायाचें पडे. शेवटीं **वेकफील्ड्ग्रीन** या नांवाचे मैदानांत जी लढाई झाली, तींत **यार्कचा ड्युक** पडला, आणि तिचा जय होऊन भाग्योदय स्थिर झाला, असें दिसूं लागलें.

पुढें **यार्कांचे** लोकांचा मुख्यपणा **वार्विकाचा अर्ल** करूं लागला. त्याची त्या वेळेस मोठी कीर्ति असे. तो संकटसमयीं मोठा कावेबाज आणि शूर; तसाच दरबारांत आणि लढाईंत सारिखाच दक्ष असे. अशा त्या पुरुषाचे मनांत राणीशीं असा कांहीं द्वेष उत्पन्न झाला कीं, तो कोणत्याही गोष्टीनें जाईना. तो आपले हाताखालीं पुष्कळ फौज घेऊन त्या बंदिवान राजास बरोबर घेऊन जात असे. त्याचे फौजेंत एक **लंडन** शहरचे लोकांची ठोळी होती, ती त्याचे पक्षास अनुकूळ असे. अशी आपली फौज घेऊन तो **अर्ल** राणीचा पक्षाचे लोक येतात पाहून पुढें चालिला. **सेंट आल्बान्स** शहराजवळ त्याची आणि राणीची लढाई झाली; तीमध्यें त्याचा पराजय झाला; त्याचे सुमारें दोन हजारांवर लोक पडले; राजा हातीं सांपडला; त्यावर त्याचे लोक बाहेरून मात्र ममता करीत; परंतु आंतून फार कंटाळले होते.

पूर्वी मरण पावल्या **यार्कांचे ड्युकाचा** पुत्र **एड्वर्ड**, तो आपल्या पक्षाची जी हानि झाली तिला उपाय करून **यार्क** शहरांतील लोकांस धीर यावा ह्मणून उद्योग करूं लागला. तो तारुण्यांत आला असून सुंदर शरीर, शौर्य, आणि मनामिळाऊ स्वभाव, हे गुण त्यामध्यें चमत्कारिक

होते. तो **वार्विकाची** बाकीची फौज घेऊन **लंडनाकडे** गेला; आणि **मार्गारेट** राणीला पळवून लोक जयजयकार करिताहेत, अशा डौलानें शहरांत प्रवेश करिता झाला. लोकांची आपल्यावर खुश मर्जी पाहून **एड्वर्डानें** मनांत आणिलें कीं, राज्यावर आतां जर सत्ता केली तर वेळ बरा आहे. मग त्याचा स्नेही जो **वार्विक** त्यानें **सेंट् जान्स फील्ड्** मैदानांत सर्वांस बोलावून आणून उघड सांगितलें कीं, राज्याचा अधिकार **एड्वर्डास** आहे.

इ० स० १४६१

**लांकास्तराचे** घराण्याच्या दौरात्म्याविषयीं त्यानें बहुत व्याख्या केली. पुढें राज्य कोणीं करावें हें ठरावण्याकरितां पुनः एक वेळ उभयपक्षांचीं सैन्यें येऊन भिडलीं. त्या भयंकर युद्धांत जितका लोकांचा नाश झाला तितका कधींही झाला नव्हता. एकाच देशचे एक लक्ष लोक परस्परांचा जीव घ्यावयाविषयीं उद्योग करीत आहेत, (आणि तो उद्योग कशा करितां कीं, सर्व मनुष्यांत अतिशय नीच आणि दुर्बळ असे जे पुरुष, त्यांचा लोभ तृप्त करायासाठीं.) असें पाहणें ही मोठी भयंकर गोष्ट होय! **एड्वर्डाची** फौज युद्धासाठीं पुढें चालिली होती, इतक्यांत पुष्कळ हिंव पडलें. तें शत्रूंचे तोंडासमोरच पडल्यामुळें त्यांस दिसेनासें झालें, हें एक, आणि तेव्हांच ते चढून पुढें गेले, या दोन कारणांनीं **एड्वर्डाचा** विजय झाला. त्यानें हुकूम केला कीं, दया करूं नये; तेणेंकरून जी एकाएकीं मारामार झाली, तींत सुमारें चाळीस हजार **लांकास्तर** प्रांतांतील लोक पडले.

दुर्बळ, हतभाग्य, मूर्ख आणि अपेशी असा जो **हेनरी** तो सांपडून बंदींत पडला. मग त्यास **लंडनांत** मोठ्या

फजीतीनें नेऊन किल्ल्यावर टाकिलें. **मार्गारेट** त्यापेक्षां किंचित् विशेष दैववान् ह्मणून ती कांहीं युक्ति करून पळून गेली; आणि **फ्लांडर्स** देशांत तिचा बाप होता त्याचे आश्रयास जाऊन राहिली.

या रीतीनें **वार्विकाचे अर्लाचे** मदतीनें राजा सिंहासनावर स्थिर झाल्यानंतर, **पार्लमेंटास** त्याचा पक्ष होता व लोकही त्याच्या स्वाधीन होते ह्मणून तो सुखानें स्वस्थ राज्य करूं लागला. असें सर्वत्र निर्भय झालेंसें पाहून तो आपले मर्जीस येईल त्याप्रमाणें विषयोपभोग करूं लागला. आणि त्याचे दरबारांत व्यभिचार आणि घातुकपणा, यांचा प्रचार बहुत होऊं लागला. ज्या ठिकाणीं एके दिवशीं भयंकर असें दुष्ट कर्म घडावें, त्याच ठिकाणीं दुसरे दिवशीं नाच, रंग तमाशे, हीं व्हावीं; आणि तेथें राजानें एके दिवशीं एखादे स्त्रीस– आणि दुसरे दिवशीं दुसरे कोणाचा शिरःछेद करून तें पाहावें; असें वर्तमान चालिलें असे. अशा गोष्टींनीं लोक त्याची निंदा करूं लागले. त्याचे ते दुर्गुण सुटावे असें **वार्विकानें** मनांत आणून त्यास लग्न करायाची मसलत सांगितली. मग त्या **अर्लाची** संमति घेऊन राजानें **फ्रान्स** देशांत जाऊन **सेवाय** शहरची **बोना** राणी होती तिशीं लग्न करायाचा विचार ठरविला. पुढे **फ्रान्स** आणि इंग्लंड यांचें लवकर ऐक्य व्हावयाविषयीं **वार्विक फ्रान्स** देशांत जाऊन उद्योग करीत असतां, **एड्वर्डानें** तें बिघडलें. तें असें, **इलिझाबेथ वुड्विल** ह्मणून एक बायको होती, तीवर राजाची इच्छा गेली; परंतु ती नाना प्रकारच्या युक्तींनींही वश होईना ह्मणून त्यानें तिशीं लग्न केलें. असा **वार्विकाचा** अपमान करून, पुढें

**एड्वर्डानें** त्यास मंत्र्याच्या स्थानापासून दूर करून चिड-
विलें. ज्याचें चातुर्य आणि शौर्य हीं दोन्हीं समान, असा
जो **वार्विक**, त्यानें राजाचा नाश करायाविषयीं तीं दोन्हीं
खर्चून असें संधान केलें कीं, तेणेंकरून त्या **एड्वर्डास** रा-
ज्यांतून पळून बाहेर जावें लागलें.

या रीतीनें पुनः एकवेळ त्या भयंकर सिंहासनावर बसा-
याकरितां बिचाऱ्या कष्टी **हेनरीची** बंदींतून मुक्तता झाली.
तेव्हां **पार्लमेंटाची** सभा झाली, तींतील सभासदांनीं संतो-
षानें ठरविलें कीं, **हेनरी** राजास राजा करावा; आणि
**वार्विकास** राजा करणारा असें पद द्यावें.

त्या वेळेस जरी **एड्वर्डाचा** पक्ष क्षीण झाला होता, तरी
केवळ मोडला नव्हता. तो **एड्वर्ड हालंड** देशांत परा-
गंदा असतांही बहुत लोकांस त्याचा अभिमान होता; ह्म-
णून त्यास देश सोडून नऊ महिने झाल्यावर, थोडीशी फौज
**बर्गंडीचे ड्युकानें** दिली, तिच्या आश्रयानें तो **यार्क** प्रांतां-
तले **रेवन्स्पर** गांवांत येऊन उतरला. त्याच्या येण्याचा
**इंग्लिशांनीं** प्रथम विशेष उत्साह दाखविला नाहीं; परंतु
उत्तरोत्तर त्याची फौज वाढत चालली. तो स्वस्थचित्त
आणि भलेपणा दर्शवी, या कारणामुळें बहुतांस त्याचा अभि-
मान पडला. तो येऊं लागला तेव्हां **लंडन** शहरचे दर-
वाजे उघडले. असा तो राज्य पावल्यावर हतभाग्य **हेन-
री** राजा पुनः सिंहासनापासून भ्रष्ट होऊन पूर्वींचे राहाव-
याचे स्थळीं जाता झाला.

मग **वार्विकाचा** कांहीं उपाय चालेनासा झाला; परंतु
इतकें मात्र राहिलें कीं, एक शेवटची लढाई करून मना-
ची खुरखुर काढून टाकावी. त्या प्रसंगींही **एड्वर्डच** विजय

पावला. त्यां दोघांची लढाई **सेंट आल्बान्स** शहराजवळ झाली. तेथें **लांकास्त्रियन** लोकांचा पराभव झाला; तेव्हां **वार्विक** आपले फौजेची एक निवडक टोळी घेऊन जेथें दाट लढाई होत होती तेथें जात असतां, बहुत वार लागून शत्रूंमध्यें पडून मृत्यु पावला.

तो शूर **वार्विक** मेला, व आपला पक्ष केवळ मोडला, असें पाहून राणी **मार्गारेट** फार कष्टी झाली; तिच्या नेत्रांतून अश्रुधारा इतक्या चालल्या कीं अशी ती कधीं रडली नव्हती. मग ती सर्व अभिमान सोडून **हांप** प्रांतांत **बोलियु** गांवचे धर्म शाळेंत जाऊन राहिली. तेथेंही तिला मदत करणारे कितीएक मिळाले. **पेंब्रोकाचा अर्ल त्युडर**, **डेवन** प्रांताचा **अर्ल कोर्तनी**, **लार्ड वेन्लाक**, **सेंटजान**, आणि दुसरे कितीएक मोठमोठे लोक, यांनीं तिला पुनः एकवेळ उत्तेजित केलें; आणि असें कबूल केलें कीं, शेवटपर्यंत आह्मी तुला मदत करायास अंतर करणार नाहीं. तिनें **इंग्लंडाचे** बहुतकरून सर्व परगण्यांत लढाया केल्या, आणि **त्यूस्बेरी पार्क** एथें जी लढाई झाली, तिनें तिच्या उद्योगाची समाप्ति केली. तिच्या संकटसमयींही उपयोगीं पडलेला, आणि तिच्या पक्षाविषयीं मोठा आग्रही, असा जो **सामर्सेटाचा ड्युक**, त्यानें तिच्या सैन्याचा सरदारपणा स्वीकारिला. तो गृहस्थ शूर, उदार, आणि सभ्य असा होता; परंतु साहसी आणि दांडगा असे. त्यानें जेथें तळ दिला होता, तेथें प्रथम **एड्वर्डानें** येऊन हला केला; त्यास त्यानें मोठा पराक्रम करून मागें फिरविलें; तेव्हां शत्रूचें सर्व सैन्य घाबरून मागें गेलें. ते पळाले असें समजून **ड्युक** यांचे पाठीस लागला; आणि **लार्ड वेन्लाकास** सां-

गितलें कीं, तूं माझी पाठ राख. त्या **लार्डानें** त्याची आज्ञा मानिली नाहीं, ह्मणून **सामर्सेटाचे** फौजेवर बहुत लोक येऊन पडल्यामुळें ती व्याकूळ झाली. त्या भयंकर विपत्तिकाळांत सर्व उपाय हरले असें समजून **सामर्सेटास** क्रोध आवरेनासा झाला; मग ज्या ठिकाणाहून तो निघाला तेथेंच **वेनलाक** निरुद्योगी बसून राहिला पाहून, रागानें आपलें मोठें लढाईतलें हत्यार हातांत घेऊन त्या भ्याडाचे अंगावर धांवला, आणि एका फटकाऱ्यानें त्यास ठार मारिलें.

ती लढाई झाल्यानंतर राणी आणि राजपुत्र यांस धरून राजा **एड्वर्डाचे** सभेस नेलें. तो राजपुत्र **एड्वर्डाचे** समोर मोठें धीटपणानें जाऊन उभा राहिला. त्यास लागावें ह्मणून असें पुसलें कीं, अरे तुला आज्ञेवांचून **इंग्लंडावर** येऊन हल्ला करायास कसा धीर झाला? त्या वेळेस आपले विपत्तीकडे लक्ष न देऊन, तो उत्तम कुळाच्या अभिमानानें बोलिला कीं, "माझे बापानें जें दुःख भोगिलें त्याचा सूड उगवायाकरितां, आणि आपल्यास संकटांतून मुक्त करायाकरितां, मी आपले बापाचे राज्यांत आलों." असा त्या मुलाचा धीर पाहून तो निर्दय **एड्वर्ड** राजा फार कोंपला; आणि त्यानें आपले हातांत लोखंडाचें कवच होतें तें त्याचे तोंडावर मारिलें. तें पुढें लोकांस अधिक दुष्टपणा करायास उदाहरण झालें. तें असें, **ग्लौसेस्तर** आणि **क्लारेन्स** एथील **ड्युक** आणि दुसरे कितीएक गृहस्थ तें पाहून पशूंसारिखे त्यावर धांवून गेले. आणि आपले तरवारींनीं त्यास ठार मारिते झाले. तरी त्या वीररसाची पूर्णता झाली नव्हती ती पुढें अशी झाली— **हेनरी** राजा बहुत दिवसपर्यंत उगाच हे सर्व भयंकर प्रसंग पाहात होता; त्या बिचाऱ्यासही मा-

रायाचा हुकूम झाला. मग **ग्लौसेस्तराचा ड्युक**, ज्याचें नांव पुढें तृतीय **रिचर्ड** पडलें, तो त्याचे खोलींत शिरून त्यास क्रूरपणें मारिता झाला. जितके लोक धरिले होते त्यांतून एक **मार्गारेटेस** मात्र वांचविलें. **फ्रान्साचा** राजा पैका देऊन तिला सोडवील असें त्यांस वाटलें ह्मणून, त्यांनीं कदाचित असें केलें असेल; आणि त्यांस वाटलें तेंही खरेंच. कारण कीं, पुढें त्यानें **इंग्लंडाचे** राजास पन्नास हजार **क्रौन** देऊन तिला सोडविलें. ती असाधारण बायको, जिनें नवऱ्याचे पक्षास अनुसरून बारा लढाया केल्या; आणि संपत्ति, मुलें, स्नेही, हें सर्व गेलें तरी जी धीर धरून राहिली; ती पुढें कांहीं वर्षांनीं **फ्रान्स** देशीं मोठ्या दुःखांत मृत्यु पावली. तिचा शूरपणा आणि विपत्ति यांवर लक्ष देऊन मात्र कायतें तिचेविषयीं मनांत दुःख होतें.

## प्रकरण १९.

### चवथ्या एड्वर्ड राजाची कथा.

सन् १४६१ पासून १४८३ पर्यंत.

**एड्वर्ड** राजाचे मोठ मोठे शत्रु लयास गेल्यावर त्यानें लाहानांचें शासन करायास प्रारंभ केला. मग सुळांवर शत्रूंचीं शरीरें लोंबूं लागलीं; आणि त्यांची संपत्ति जप्त होऊन राजाजवळ येऊं लागली. तो या रीतीनें लोकांस भयंकर होता खरा; परंतु तसाच कुत्सित विषयसुखांतही मग्न असे. दरबारी लोकांचे मनांत त्याच्या वाईट खोडी वाढवाव्या असें

होतें; कारण, तेही तसेच होते. तो जें जें पातक करी, त्याचें लहानसें प्रायश्चित्त देऊन धर्माध्यक्ष त्यास शुद्ध करीत. त्या राजाचे वेळेस मोठमोठीं पातकें अभ्यासांत पडून गेलीं होतीं, त्यांत व्यभिचार हें कांहींच नव्हे असें वाटे. **शोर** ह्मणून एक शहरांतील व्यापारी होता, त्याची बायको अतिशय सुंदर आणि पतिव्रता होती ;. परंतु सुंदर पुरुष आणि तशांत राजा असून आपली इच्छा करितो हें पाहून, तिचें पातिव्रत्य भंगलें, आणि ती त्या राजास वश झाली.

त्यानें जीं अनेक दुष्ट कर्मे आचरलीं, त्यांत त्याचा भाऊ **क्लारेन्साचा ड्युक** यास जें त्यानें निरर्थक दुःख दिलें, ती गोष्ट चमत्कारिक आहे, ह्मणून एथें सांगतों. या **ड्युकाचा** एक **टामस बर्देट** ह्मणून स्नेही होता, त्याचे बागांत एके दिवशीं राजा पारध करीत असतां त्यानें **बर्देटाचें** आवडतें असें एक बदक मारिलें. तें पाहून **बर्देटास** राग आला, आणि तो बोलिला कीं, राजास ज्यानें अशी दुर्बुद्धि सांगितली असेल त्याचे पोटांत हरणाचीं शिंगें पडोत. अशा लहान गोष्टीवरून **बर्देटास** अन्यायी ठरवून **टैबर्न** शहरांत त्याचा शिरच्छेद केला. अशी आपले परम मित्राची दशा झाली पाहून **क्लारेन्साचे ड्युकास** फार दुःख झालें, आणि तो आपले भावाची बहुत निंदा करूं लागला. तो ह्मणाला कीं, **बर्देटास** जें शासन केलें तें केवळ अयोग्य होय. हा त्याचा उद्धतपणा पाहून राजास कोप आला. मग त्यानें तें निमित्त करून त्याची चौकशी करायाकरितां त्यास **लार्डांचे** सभेस नेलें; आणि त्याचे अन्यायाचा पुरावा करायास आपण स्वतः गेला. त्याकाळीं बळकट जो असेल त्याच्या

पक्षाचा न्याय होत असे; ह्मणून **ड्युकावर** अन्याय लागू झाला. तेव्हां त्यास विचारिलें कीं, तूं कोणत्या रीतीनें मरणार? त्याची गोडदारूवर फार प्रीति असे, ह्मणून त्यानें सांगितलें कीं तींत बुडून मी मरणार. मग त्यास किल्ल्यांत त्या दारूच्या मोठ्या पिपांत बुडवून मारिलें. या राजाचें राज्य वाईट खरें; परंतु त्यांत इतकें चांगलें मानायाचें कीं तें थोडक्यांत आटपलें. तो **फ्रान्स** देशांत युद्धास जायाची तयारी करीत असतां, त्यास एक रोग झाला; तेणेंकरून तो आपले वयाचे बेचाळिसावे वर्षी मेला. **हेनरी** राजा मेला तेव्हांपासून मोजलें तर त्यानें तेवीस वर्षे राज्य केलें.

# प्रकरण २०.

## पांचव्या एड्वर्ड राजाची कथा.

सन् १४८३

चवथ्या **एड्वर्ड** राजाचें मुलांचे भयापासून रक्षण व्हावें असें निमित्त करून राज्याचा संरक्षक, **ग्लौसेस्तराचा ड्युक** केला होता. त्या **ड्युकानें** प्रथमच त्या दोन्ही मुलांस नेऊन किल्ल्यावर टाकिलें. अशीं तीं स्वाधीन झाल्यावर, त्यानें बातमी उठविली कीं, राजाचे धर्मस्त्रीपासून तीं उत्पन्न झालेलीं नव्हत. या रीतीचीं अनेक विघ्नें करून त्यांस राज्याभिषेक व्हायाचा जो दिवस नेमिला होता तो त्यानें टाळिला. पुढें त्यानें बेत केला कीं, राज-

पुत्राचे पक्षाचा **लार्ड हेस्तिंगझ्** ह्मणून दरबारांत एक गृहस्थ होता, त्यास नाहींसें करावें.

मग त्यानें किल्ल्यांत **हेस्तिंगझ्** याला एके सभेस बोलावून नेलें, आणि आपण भिवया मोडीत, ओंठ चावीत, आणि कांहीं तरी मनांत त्रास उत्पन्न झाला आहे असें दाखवीत, तेथें गेला. तें पाहून कांहीं वेळपर्यंत कोणी कांहींच बोलेनात. त्या सभेंतील **लार्ड** एकमेकांकडे पाहूं लागले; आणि मनांत समजले कीं, आज कांहीं तरी एथें घोर कर्म होतें खरें. मग त्या **ड्युकानें** आपले हातावरचें वस्त्र काढून दाखविलें तों सर्व हात झडून जाऊन कुरूप झालेला असा दिसला; तो दाखवून तो बोलिला कीं, **जेनशोर** आणि तिचे स्नेही यांनीं कांहीं गौडबंगाल करून असा माझा हात विरूप केला. त्यावर **हेस्तिंगझ्** बोलिला, "जर त्यांचे हातून असा अपराध घडला असला, तर त्यांस शासन करावें हें योग्य." राज्यसंरक्षक हें ऐकून उच्चस्वरानें ह्मणाला, "तूं मला, 'जर घडला असला,' असें उत्तर देतोस काय? मी तुला सांगतों कीं, त्यांनीं मीं मरावें अशी युक्ति केली आहे. अरे लुच्चा! त्या अपराधांत तुझेंही अंग आहे." असें बोलून त्यानें दोन वेळ मेजावर हात आपटिले; इतक्यांत त्या खोलींत हत्यारबंद लोक येऊन भरले. तेव्हां तो राज्यसंरक्षक **हेस्तिंगझाला** ह्मणाला; "तूं सरकारचा गुन्हेगार ह्मणून तुला धरितों." असें बोलून त्यानें त्यास शिपायांचे हातीं दिलें. दैववशात् जवळ एक धर्माध्यक्ष होता त्याजवळ **हेस्तिंगझानें** आपले पातकांचा उच्चार केला. कारण, संरक्षकानें शपथ घेतली कीं, याचें डोकें तुटलेलें पाहिल्यापूर्वी मी अन्न घेणार नाहीं. मग त्यास

किल्याचे देवळापुढचे धाकटे शेतांत जलदीनें नेलें, आणि तेथें वाटेवर एक लांकूड पडलें होतें त्यावर त्याचा शिरच्छेद केला.

त्या नंतर, चवथ्या एड्वर्ड राजाची स्त्री जेनशोर होती ह्मणून पूर्वीं सांगितलें, तीवर त्यानें वक्रदृष्टि केली. त्या बिचारे बायकोशीं त्याणें द्वेष करावा इतकी तिचेमध्यें कांहींच योग्यता नव्हती खरी, परंतु दुष्टास नाश करावयास निमित्त लागत नाहीं. त्यानें तिचेवर गौडबंगालाचा आरोप ठेविला, तो केवळ खोटा अशी सर्व लोकांची खातरी होती; ह्मणून त्याचें कांहीं चालेना; पुढें वास्तवीक जें तिचे हातून पातक घडलें होतें तें बाहेर काढून त्यानें घात केला. तें वर्तमान असें, जेनशोर ही लांबर्ड गल्लींत राहाणारे एके सोनाराची बायको होती. ती त्याला सोडून एड्वर्डाशीं संयुक्त झाली, आणि त्याचे कुत्सित दरबारांत पतिव्रता स्त्रीची योग्यता पावली. ती मुळची हलकी असून, कांहीं दिवसपर्यंत चढून दरबारांतली संपत्ति भोगीत होती, ती पुनः पूर्वीची नीच पदवी पावली. ही गोष्ट पाहून लोकांस फार वाईट वाटलें नसेल, असा तर्क दिसतो. असा तिजवर जनप्रसिद्ध आरोप ठेविला तेव्हां तो तिच्यानें खोटा ह्मणवेना, मग तिनें आपले पातकांचा उच्चार केला; तेव्हां तिला अशी आज्ञा केली कीं, तूं उघड्या पायीं शहरभर फिरावें आणि सेंटपालाचे देवळांत जाऊन प्रायश्चित्त करावें. तसें तिनें हजारों लोक पाहात असतां पांढरें कापड नेसून, हातांत मेणवात घेऊन केलें. हें वर्तमान घडल्यावर ती सुमारें चाळीस वर्षे होती; आणि शेवटीं फार दारिद्र्य दुःख अनुभवून मेली.

मग राज्य मिळविण्याविषयीं उघड उद्योग केला असतां साधेल असें समजून राज्यसंरक्षकानें चोरी सोडिली. आणि पूर्वी राजपुत्रांवर जी बाहेरून तरी ममता करीत होता तीही करीनासा झाला. गुणवान आणि प्रतापी असा **बकिंगमाचा डयुक** त्या मुलांचे पक्षाचा होता, त्यास त्यानें लांच आणि वचनें देऊन पूर्वीच आपले स्वाधीन करून ठेविलें होतें. मग त्या संरक्षकानें **सेंटपालाचे** देवळाजवळ गांवचे लोकांची, आपली सर्व बुद्धि खर्चून, खुशामत केली; तेव्हां लोक कांहीं बोलेनात. अशा रीतीनें त्यांस आपल्याकडचे करून त्याचे सेवक बोलिले, "राजा **रिचर्ड** शतायुषी होवो. मग लागलाच **आल्डर्मान** आणि **मेयर** यांनीं त्यास मुकुट आणून दिला; तो त्यानें कांहींसा अनमान करून धारण केला.

# प्रकरण २१.

## तिसऱ्या रिचर्ड राजाची कथा.

सन् १४८३ पासून १४८५ पर्यंत.

प्रथम एक दुष्कर्म घडलें ह्मणजे पुढें दुसरींही होत जातात. या कारणामुळें राजा **रिचर्डानें** सिंहासनारूढ होतांच, किल्ल्यावरचे अंमलदारास हुकूम केला कीं, पूर्वी राजाच्या दोन पोरांस ठार मारून टाक. परंतु तो धीट गृहस्थ (ज्याचें नांव **ब्राकेन्बरी**) दुष्ट राजाची मर्जी सिद्धीस नेण्यास आपण हेतु झाला नाहीं. त्यानें नम्रतेनें उत्तर पाठविलें कीं, अज्ञान मुलांचे रक्तांत आपले हात कसे भिज-

घावे, हें मला कळत नाहीं. त्यानें जरी नाहीं ह्मटलें, तरी राजास तें काम करायाजोगा दुसरा पुरुष मिळायास बहुत दिवस लागले नाहींत. **सर जेम्स टिरल** ह्मणून होता, त्यानें तें काम स्वीकारिलें. तेव्हां **ब्राकेन्बरीस**, एक रात्र-पर्यंत किल्ल्याच्या चाव्या त्याजवळ द्याव्या, असा राजानें हुकूम केला. **टिरेलानें** आपले बरोबर तीन पुरुष घेतले. त्यांचीं नांवें,—**स्लेटर**, **डैटन**, आणि **फारेष्ट**. त्यांस बरोबर घेऊन तीं मुलें जेथें होतीं त्या खोलीजवळ तो गेला, आणि आपण बाहेर राहून त्यानें बरोबरच्यांस सांगितलें कीं, आंत जाऊन तुह्मी आपलें काम बजावा. ते आंत गेले तेव्हां त्यांनीं त्या मुलांस गाढ झोंप लागली आहे असें पाहिलें. मग उशा होत्या त्यांहींकरून त्यांचे प्राण कोंडून त्यांस मारिलें, आणि त्यांचीं उघडीं शरिरें **टिरला** जवळ नेलीं. त्यानें तीं जिन्याचे खालचे अंगास पुरून वर दगड घातले.

या रीतीनें आपली सत्ता दृढ करायाकरितां **रिचर्ड** राजाचे प्रयत्न चालिले असतां, ज्यानें त्यास राज्य प्राप्त व्हावयास साहित्य केलें होतें, असा जो **बकिंगमाचा ड्युक**, त्यानें जप्त झालेली कांहीं जमीन आपल्याकरितां मागितली; ती राजानें दिली नाहीं ह्मणून, तो राजाशीं बिघडला. मग तो **वेल्स** प्रांतांत पुष्कळ फौज जमवून त्वरेनें **ग्लौसेस्तरा**-जवळ आला. तेथून **सेवर्न** नदी उतरून जावें असा त्याचा बेत होता. त्या वेळेस नदीस असा पूर आला होता कीं, दोन्ही बाजूंची जमीन बुडून जाऊन कांहीं डोंगरांचे शिखरांस पाणी लागलें होतें. ह्मणून **बकिंगमाचे** लोकांस पलिकडे जातां येईना, आणि होते तेथें सामान मिळेना,

अशी दुर्दशा झाली. त्यांनीं तें सर्व सोसून तेथेंच राहावें ह्मणून **ड्युकानें** यत्न केला; परंतु ते राहीनात; आणि चहुंकडे पसरून मार्गे गेले. तसे संकटांत, **ड्युक** कांहींसा विचार करून, एक **बानिस्तर** नामें पुरुष होता, त्याचे घरीं जाऊन राहिला. तो पुरुष पूर्वीं त्याचे चाकरीस होता, आणि त्याचे कुटुंबाचे त्यावर बहुत उपकार झाले होते; परंतु, **ड्युकाचें** डोकें आणील त्यास मोठें इनाम मिळेल, असें जें ठरविलें होतें त्याचा लोभ त्याच्यानें जिंकवेना; तेव्हां त्यानें **श्राप** प्रांताचे **शेरीफास** जाऊन तें वर्तमान सांगितलें. त्यानें त्या भिकाऱ्याचें सोंग घेतलेल्या **ड्युकास** धरून **साल्सबेरीस** नेलें. तेथें त्याची चवकशी होऊन शासन ठरून त्याचा शिरच्छेद केला. पुढें अशी बातमी आली कीं, **रिच्मंडाचा अर्ल इंग्लंडांत** येऊन राज्य आपण घ्यावयाकरितां तयारी करितो आहे. तो कोठून येऊन हला करील हें **रिचर्ड** राजास कळेना; ह्मणून तो राज्याचे मध्यभागीं **नातिंगमांत** जाऊन राहिला, मनांत कीं शत्रू कोठून आला तरी त्याचें निवारण करितां येईल.

कांहीं दिवसांनंतर **जान अफगांट** याचे कन्येकडील वंशाचा **रिचमंडाचा अर्ल** होता, तो राज्याकरितां बखेडा करूं लागला. त्याशीं आणि **यार्कोचे** संस्थानाशीं वांकडें होतें, ह्मणून तो राज्यांतून बाहेर गेला होता; परंतु राजाचा लोक फार कंटाळा करितात हें पाहून, तो बरोबर सुमारें दोन हजार लोक घेऊन **नार्मंडी** प्रांतांतले **डार्फ्लुअर** गांवांतून निघाला; आणि साहा दिवसांनीं **वेल्स** प्रांतांतले **मिल्फोर्ड** गांवास येऊन पोहोंचला, तोंपर्यंत कांहीं प्रतिबंध झाला नाहीं. तो आला ही गोष्ट कळतांच **रिचर्ड**,

ज्यामध्यें शौर्य आणि धीटपणा हे मात्र गुण होते, त्यानें असा निश्चय केला कीं, शत्रूशीं भिडून एकाएकीं लढाई करावी. इकडे **रिच्मंडास, सर टामस बौचियर, सर वाल्टर हंगफोर्ड** आणि दुसरे कितीएक येऊन मिळाले. मग तो सुमारें सहा हजार फौज घेऊन पुढें झाला. थोडेच दिवशीं दोन्ही सैन्यें येऊन **बासवर्थफील्डा**जवळ पोंहचलीं. त्या दोघांची लढाई झाली तींत **रिचर्ड** मेला; आणि **रिच्मंडास** सातवा **हेनरी** असें नांव ठेवून राजा केला. राज्यांत सुमारें चाळीस वर्षेंपर्यंत आंतून बरकशा लागून जीं मैदानें रक्तानें भरत असत, त्यांची अशी समाप्ति झाली.

# प्रकरण २२.

## सातव्या हेनरी राजाची कथा.

संन् १४८५ पासून १५०९ पर्यंत.

**हेनरी** राजा सिंहासनावर बसतांच प्रथम त्यानें **इलिझाबेथ** राणीशीं लग्न केलें. **इलिझाबेथ** चवथ्या **एड्वर्ड** राजाची कन्या ह्मणून त्यानें तिशीं लग्न करून **यार्क** आणि **लांकास्तर** या दोन संस्थानांमधील वैर मिटवून ऐक्य केलें. मग कधीं त्या दोन संस्थानांत वैमनस्य पडलें नाहीं.

पूर्वज्यांचा ख्यालीखुशालींत पैसा खर्च होऊन दारिद्य प्राप्त झाल्यामुळें त्यांस इतकीं संकटें प्राप्त झालीं, ही गोष्ट **हेनरी** राजाचे मनांत येऊन त्याची खातरी झाली कीं, पुष्कळ द्रव्य संपादन केलें, तरच आपलें दैव आपणास अनुकूळ होईल. ह्मणून शत्रूंची जी संपत्ति जप्त होऊन त्यास मिळे, ती तो मोठ्या विचारानें खर्च करी.

**इलिझाबेथ** आणि तो या दोघांचें लग्न झाल्यानंतर, लागलीच त्यानें जाहीर खबर लाविली कीं, ज्यांची इच्छा असेल त्यांस मी क्षमा करितों. परंतु त्या वेळेस आंतले-आंत चुरस लागल्यामुळें लोक असे बेपर्वा झाले होते कीं, कोणत्या अंमलदाराचे हातून त्यांचा बंदोबस्त होत नसे, किंवा कोणत्या राजाच्यानें मनोरंजन होत नसे. ह्मणून पुढें असें झालें कीं, एक बंड मोडलें ह्मणजे लागलेंच दुसरें व्हावें.

**आक्सफर्ड** शहरांत **रिच्चर्ड सैमन** ह्मणून एक धर्मपक्षी राहात होता; तो किंचित् धूर्त होता, परंतु त्याच्यामध्यें दांडगेपणा फार असे; त्यानें **लांबर्ट सिम्नेल** ह्मणून एके रोटीवाल्याचा मुलगा होता, त्यास **क्लारेन्साचे ड्युकाचा** मुलगा जो **वार्विकाचा अर्ल** त्याचें सोंग घ्यावयाची युक्ति शिकवून तयार केलें— ज्या **क्लारेन्सास** दारूचे पिपांत बुडवून मारिलें अशी मागें गोष्ट सांगितली—- परंतु तो तसा सर्व लोकांचे लागलाच दृष्टीस पडला असतां कठीण, ह्मणून प्रथम **अयर्लंडांत** त्यानें तें सोंग घ्यावें असा विचार केला.

नग त्या **सिम्नेलास लार्ड लोवेल**, आणि विरुद्ध पक्षाचे दुसरे कितीएक **लार्ड** येऊन मिळाले; आणि त्या रूपानें त्यानें **इंग्लंडास** जावयाचें योजिलें. मग तो प्रथम **लांका** प्रांतास गेला, आणि तेथून पुढें **यार्क** प्रांतास चालिला. त्याच्या मनांत असें होतें कीं वाटेनें गांवोगांवचे लोक येऊन आपल्यास सहाय होतील; परंतु अशी आशा करून तो फसला गेला. त्याजवळ **जर्मन** आणि **ऐरिश फौज** होती तिशीं जाऊन आपण मिळावें हें लोकांस ठीक वाटेना; आ-

णि राजाचे सुनीतीचाही त्यांस धाक होता; या दोन कारणांमुळे ते स्वस्थ राहिले; आणि जितकें त्यांचे हातून झालें, तितकें त्यांनीं राजाचे पक्षास साहित्य केलें. ह्मणून त्या तोतयाचे सैन्याचा सरदारपणा ज्याचे जवळ होता, असा जो राजाशीं विरुद्ध **लिंकनाचा अर्ल**, त्यानें तत्क्षणींच, युद्ध केल्यावांचून उपाय नाहीं असें पाहून, तें करायाचा निश्चय केला. मग उभयपक्षांचीं सैन्यें **नाटिंगम** प्रांतांत **स्टोक** शहरांत भिडलीं; आणि लढाई सुरू झाली. तीं दोन सैन्यें समान नसतां त्यांमध्यें लढाई मोठी निकराची झाली, आणि लोक फार पडले; परंतु शेवटीं राजाचा विजय झाला. **लार्ड लिंकन** त्या लढाईंत पडला; आणि **लार्ड लोवेलाची** दशा काय झाली तें कांहीं समजलें नाहीं; त्यावरून असा तर्क करितात, कीं त्याचीही गति तशीच झाली असेल. **सिम्नेल** आणि त्याचा गुरु **सैमन** यांस धरून बंदींत घातलें. त्या लढाईंत चार हजार लोक पडले. **सैमन** धर्मपक्षी होता ह्मणून त्याची चौकशी न्यायगृहांत होईना. त्यास नुसतें कैदेंत मात्र ठेविलें. **सिम्नेलापासून** राजास कांहीं भय किंवा शंका व्हावयाचें कारणच नव्हतें, ह्मणून त्यास राजानें क्षमा केली; आणि आपले मुतपाकांत हलकें काम सांगितलें. पुढें त्याजकडे ससाणे बाळगायाचें काम झालें. अशा हलके स्थितींत तो मृत्यु पावला.

मग **यार्क** प्रांतांत नवें एक बंड उत्पन्न झालें. तें असें, प्रजांवर कर बसवायाविषयीं कितीएक लोकांस मुखत्यार करून नेमिलें होतें. त्यांचें लोक ऐकेनात, ह्मणून **नर्थंबलेंडाचा अर्ल** राजाची आज्ञा सिद्धीस न्यावयाविषयीं प्रयत्न करूं लागला. परंतु तो मसलत सांगून आपणास दुःखें

देववितो असें समजून लोकांनीं धट्टाईस येऊन त्याचे घरा-वर हला केला; आणि त्याचा प्राण घेतला. इतकें करून-ही ते उगे राहिले नाहींत. पुढें त्यांनीं एक नीच कुळां-तला **जान आर्चेबर** ह्मणून लबाड पुरुष होता त्याचे बु-द्धीस लागून **सरजान एग्रिमंट** ह्मणून एक होता, त्यास आपला सरदार केला आणि राजाशीं उघड वैर करावया-करितां सिद्ध झाले. राजानें, ही अविचारी मसलत सम-जतांच, पुष्कळ फौज जमवून ती **सरेचे अर्लाचे** स्वाधीन केली, त्या गृहस्थानें त्या बंडवाल्यांचा पराजय करून दंगा मोडून त्यांचा मुख्य **आर्चेबर** होता, त्यास धरून कै-देंत ठेविलें. थोडे दिवसांनीं त्याचा शिरच्छेद केला; परंतु **सरजान आग्रिमांट, बर्गंडीचे डचेसेचे*** दरबारांत पळून जाऊन राहिला. असेच त्या वेळेस जे **इंग्लंडाचे** राजा-शीं वांकडे असत, ते तेथें जाऊन राहात.

ही वाचणारांचे मनांत गोष्ट अशी येते कीं, **सिम्नेलाचें** बंड सिद्धीस गेलें नाहीं, हें पाहून तसा तोतयाचा उद्योग करावा असें को-णाचे मनांत आलें नसेल; परंतु ती **बर्गंडीची डचेस** आपले पूर्वींचे उद्योग सिद्धीस गेले नाहींत ह्मणून संतापून ज्या **इंग्लं-डाचे** राज्याचा तिच्यानें नाश करवेना, त्यांत गडबड तरी करावी असा बेत करिती झाली. प्रथम तिनें जिकडे ति-कडे वातमी पसरली कीं, **यार्कांचा** धाकटा **ड्युक**, ज्यास किल्ल्यांत मारिलें असें ह्मणतात, तो आझून जीवंत आहे. ती बातमी मोठ्या आशेनें लोक खरी मानितात असें पाहून

इ० सं० १४९२

---

* डचेस हें ड्युक शब्दाचें स्त्रीलिंगीरूप. बर्गंडी प्रांत फ्रान्स देशाचे दक्षिण भागीं आहे.

तिनें एक मुलगा मिळविला. त्यास त्या **ड्युकाचें** नांवरूप दिलें. **ड्युकाचें** नांव **आस्बेक** किंवा **वार्बेक** होतें. मुलगा मिळविला होता तो, चवथ्या **एड्वर्ड** राजाचे वेळेस एक **क्रिस्तियन** इस्राएल झालेला **इंग्लंडांत** येऊन राहिला होता त्याचा मुलगा. त्याचें नांव **पीटर**, परंतु त्या नांवाचा अपभ्रंश होऊन त्यास **पिटर्किन** किंवा **पर्किन** असें ह्मणत असत. तें पोर आपले कामास अतिशय उपयोगीं पडेल असें त्या **डचेसेला** वाटलें; आणि तो मुलगा चपळ होता ह्मणून तिनें **यार्कचे ड्युकाचें** सोंग घ्यावयाविषयीं जो उपदेश केला तो सर्व त्यानें लागलाच शिकून मनांत दृढ धरून ठेविला. सारांश, त्याचें सुंदर शरीर, दरबारी वेष, प्रौढ व्यवहार, आणि मनोरंजक भाषण, हीं पाहून सर्व लोक मोहित झाले. ज्यांस ती खचींत लबाडी असें समजलें होतें, ते मात्र झाले नाहींत.

**इंग्लिशांस** बंड करावयाची मोठी हौस, ह्मणून त्यांनीं त्या बडबडीवर विश्वास ठेविला; आणि दुसरें असें झालें कीं, त्यांचा असंतोष आणि भोळेपणा यांहींकरून ज्या गोष्टीचा प्रारंभ झाला होता, ती, त्या मुलाचें चातुर्य, भाषण, आणि सौंदर्य, यांहींकरून सिद्धीस गेली.

**पर्किनाचे** पक्षाचा अभिमान **इंग्लंडांतही** कितीएक गृहस्थांस पडला, त्यांत **लार्ड फिझ्वाल्टर, सरसैमन मांत्फोर्द, सरटामस थ्वेट्स** आणि **सरराबर्ट क्लिफोर्ड** हे होते. परंतु या सर्वांत मोठा वजनदार आणि निवारण व्हावयास कठीण, असा **सर विलियम स्तान्ली,*** **लार्ड-चेंबर्लिन** हा होता. हा गृहस्थ, ज्यानें राजा **हेनरीस**

* राजाची घरगुती वहिवाट पहाणारे अमात्यांतलें हें एक पद आहे.

राज्य मिळायाविषयीं साहित्य केलें असा जो प्रसिद्ध **लार्ड स्तान्ली**, त्याचा भाऊ. त्याचा त्या गोष्टीवर विश्वास बसला असो, किंवा त्याचे मनांत लोभाची कल्पना असो; या दोहोंतून एके लक्ष्यानें त्यानें राजाशीं उघड द्वेष आरंभिला. मग **इंग्लंडांतले** आणि **फ्लांडर्स** देशाचे बंडवाले यांमध्यें कागदपत्र होऊन ठराव होऊं लागले.

असे चहुंकडे राजाच्या नाशाविषयीं बेत चालिले असतां, राजा **हेनरीनें** शत्रूंचे मसलतीची चौकशी राखिली होती. राज्याविषयीं स्पर्धा करणारे त्या मुलाचें हें बंड आहे, हें प्रसिद्ध करण्याविषयीं त्यानें श्रमाची किंवा पैसा खर्चावयाची कमती केली नाहीं. त्या पोराचे पक्षास कोण कोण अनुकूळ आहेत हें शोधून काढायाचाही त्याचा उद्योग चालिला होता. या कामाकरितां त्यानें सर्व **फ्लांडर्स** देशांत आपले गुप्त दूत पाठविले; आणि शत्रूंच्या पक्षाचे जे कोणी आढळले त्यांस पुष्कळ लांच देऊन आपले जवळ आणिलें. त्यांत **सररावर्ट क्लिफोर्ड** त्याचे पक्षास अनुकूळ होऊन फार उपयोगास पडला; आणि त्यावर राजानें बहुत विश्वास ठेविला. त्यापासून **पार्किनाचीं** सर्व जन्म कर्मे **हेनरी** राजास समजलीं; आणि त्याचें साहित्य करणारे जे होते त्यांचींही नांवें कळलीं. राजास या गोष्टी समजल्यामुळें हर्ष झाला; परंतु आपले दूतांवर जितका त्यानें विशेष भरंवसा ठेविला, तितका त्यांचा त्यास पुढें संताप आला

त्याजवळ जे होते त्यांचा निरुपकारीपणा पाहून प्रथम त्यास कोप आला; परंतु चांगला समय येईपर्यंत आपला राग लपवून त्यानें तेव्हांच **फिझ्वाल्टर, मौंतफर्ड, थ्वेट्स, विलियम डान्बरी, राबर्ट रात्क्लीफ, टामस**

**क्रसफेनर** आणि **टामस आस्त्वूड** या सर्वांस धरून, **कैदेंत** ठेवून सरकार गुन्हेगारीचें शासन ठरविलें. **मौंतफोर्ड, रातक्लीफ** आणि **डानबरी** यांचा लागलाच शिरच्छेद करून बाकीच्यांस सोडिलें.

या रीतीनें **इंग्लंडांत** आशेची निराशा झाल्यानंतर तो मुलगा आपले दैवाची परीक्षा पाहावयास **स्काट्लंडांत** गेला. **इंग्लंडांतले** पेक्षां तेथें त्याचें दैव अनुकूळ असें दिसलें. तेथील राजा चवथा **जेम्स** यानें तो येतांच त्याचा मोठा सत्कार केला; व त्याचे जन्मकर्मांचा सर्व वृत्तांत वास्तविक मानिला. त्याचा विश्वास त्या गोष्टीवर इतका बसलों कीं, आपले जवळचे नात्याची **हंत्लीचे अर्लाची** मुलगी **क्याथेरीन गार्डन** ह्मणून होती, तिशीं त्याशीं लग्न लाऊन दिलें. ती बायको स्वरूपानें सुंदर आणि गुणी होती. इतका उपकार करूनही संतुष्ट न होतां त्या राजानें त्या मुलास **इंग्लंडाचे** तख्तावर बसवायाची प्रतिज्ञा केली. त्याच्या असें मनांत होतें कीं, **पर्किन इंग्लंडांत** गेला ह्मणजे लागलेंच **यार्कांचे** संस्थानाचे जे इष्ट आहेत, ते येऊन त्यास मिळतील. या भरंवशावर तो त्या मुलास घेऊन **इंग्लंडांत** जात असतां, जेथें तेथें जाहीरनामे लावीत सुटला. परंतु **पर्किनाचे** पक्षाची बहुतवेळ निराशा झाल्यामुळें लोकांचें मन त्यावरून उतरलें होतें; ह्मणून कोणी येऊन त्यास मिळाला नाहीं, हें त्यास मोठें वाईट वाटलें.

इ० सं० १४९७. या रीतीनें त्या **पर्किनास स्काट्लंड** सुटलें; आणि **फ्लेमिश** लोकही त्याचा विशेष आदर करीनात असें झालें. कारण, त्यांची मसलत **इंग्लिशांशीं** तह करावयाची होती. ह्मणून असें झाल्या-

पर त्यानें **अयर्लंडांतले** अरण्याचा आश्रय करून आपला प्रयत्न पुढें चालवावा असा निश्चय केला. त्याच्यानें निरुद्योगी राहावेना; ह्मणून **हर्न**, **स्केल्टन**, आणि **आस्लली** या नांवांचे तीन मोडलेले व्यापारी त्यास येऊन मिळाले होते त्यांशीं त्यानें मसलत केली; आणि त्यांच्या बुद्धीस लागून **कार्न्वाल** प्रांतांतले लोकांची आपल्यावर प्रीति आहे कीं नाहीं, हें पाहावयाचा निश्चय केला. मग तो **कार्न्वाल** प्रांतांतले **बाटमिन** शहरास गेला. तेथें लागलेंच तीन हजार लोक त्याचे जरीपटक्याजवळ येऊन हजीर झाले. असा किंचित् भाग्योदय दिसूं लागला, तेणेंकरून चढून जाऊन त्यानें आपल्यास **इंग्लंडाचा** राजा चवथा **रिचर्ड** असा किताब घेतला; आणि आपले पक्षास मिळालेले लोकांची हिंमत खचूं नये ह्मणून त्यांस **एग्झिटर** शहरचे दरवाजाजवळ नेलें. तेथील लोकांनीं त्यांस आंत न घ्यावयाचा आग्रह धरिला; आणि धट्टाईनें आंत शिरायापुरता त्याजवळ दारू गोळाही नव्हता, ह्मणून तो तेथील वेढा उठवून **टांटन** शहरास गेला. त्याजवळ त्या वेळेस लोक सात हजार जमले; व ते सर्व त्याच्याकरितां मरून जावयास तयार होते; परंतु यानें त्यांसच ठकविलें. तें असें, आपले पारिपत्याकरितां राजा **हेनरी** निघून येतो आहे, असें समजतांच त्यानें लढाईकरितां सैन्य तयार करावें तें न करितां तो त्यांस न कळत पळून गेला; आणि **न्युफारेष्ट** प्रांतांत **बालियूच्या** मठांत जाऊन राहिला. त्याजवळचे बिचारे लोक सहज राजाचे हातीं सांपडले; असें असतांही, त्यानें त्यांस क्षमा करून सोडून दिलें. मुख्य मुख्य कारणीभूत जे होते त्यांचें मात्र यथायुक्त शासन केलें. या

**काळीं राजा हेनरीनें** आपले कितीएक लोकांबरोबर **पर्किनास** निरोप सांगून पाठविला कीं, तूं आह्मांस शरण ये, आणि आपली सगळी लबाडी कबूल कर, ह्मणजे मी तुझी क्षमा करीन. तो **पर्किन** त्या वेळेस मोठ्या संकटांत होता, ह्मणून त्यानें लागलेंच राजाचें सांगणें मान्य केलें; आणि ती धर्मशाळा सोडून निघाला. राजाचे मनांत त्यास पाहावेसें वाटलें ह्मणून, **लंडन** शहरचे रस्त्यांतून थट्टेचे समारंभानें लोक चेष्टा करीत आहेत, अभद्र शब्द बोलत आहेत, अशा डौलानें त्यास नेलें. हें सर्व त्यानें मोठ्या दृढ मनानें सोशिलें. मग त्याच्या पूर्वींचे जन्मचरितांची एक कबुलात करून तिजवर त्याची सही घेतली; आणि ती छापून राज्यभर प्रसिद्ध केली. परंतु तीपासून त्या लबाडीचा पक्का निश्चय न होतां, पूर्वींपेक्षां त्याविषयीं लोकांस अधिक संशय उत्पन्न झाला. त्या मुलास राज्याधिकाराचा कायद्याप्रमाणें हक्क होता किंवा नाहीं, याविषयीं आजचे दिवशींही विद्वानांत विवाद आहे.

त्यानें एक दोन वेळ कैदेंतून मुक्त व्हावयाकरितां यत्न केला; परंतु तो सिद्धीस गेला नाहीं, आणि शेवटीं त्यास **तैबर्न** शहरीं फांशीं दिलें. त्याचे पक्षाचे कितीएक लोकांसही तसाच मृत्यु आला.

या राजाच्या राज्यांत दुसरें कांहीं झालें नाहीं; परंतु कावे, खून, बंडें, लबाड्या, आणि फांशीं देणें, इतकें मात्र पुष्कळ झालें. सर्वत्र **हेनरी** राजा लबाड्या पाही ह्मणून त्याची प्रकृति निर्दय झाली होती खरी; परंतु वास्तविक पाहिलें असतां त्याचे सारिखी स्वास्थ्याची आवड दुसरे कोणास नव्हती. लोकांचे लढाईचे उद्योग मोडावे ह्मणून

तो प्रयत्न करीत असे, याकरितां त्यांची त्यावर गैरमर्जी होती. तहनाम्याचे प्रारंभीं बहुतकरून त्यांची असें लिहिण्याची चाल असे कीं, "ख्रिस्त जेव्हां विश्वांत अवतरला तेव्हां त्या समागमें स्वास्थ्याचें आगमन झालें; आणि तो जेव्हां गेला तेव्हां एथें तें स्वास्थ्य ठेवून गेला."

त्याचें लक्ष सर्वदा या पुढील दोन गोष्टींकडे लागलें, असे. एक सरदार आणि धर्मपक्षी, यांचा अंमल कमी करावा; आणि दुसरी, लोकांस वाढवून सुदशेस आणावें. हीं दोन लक्ष्यें सिद्धीस न्यावयाच्या मसलतीनें त्यानें एक हुकूम प्रसिद्ध केला. तो असा कीं, सरदार लोकांस आपली स्थावर संपत्ति विकायाचा अधिकार आहे. हा नियम साधारण लोकांस फार आवडला; आणि सरदारांसही विशेष वाटला नाहीं. कारण, त्यांचे इच्छेस येईल तसा पैका उधळायास त्यांस सांपडूं लागला, आणि आपले कर्जदारांचा पैका द्यावयास हा एक त्यांस उपाय झाला. त्या कायद्यापासून तोटा त्यांचे संततीचा मात्र होता; परंतु अशा दूरचे नाशावर दृष्टि देऊन वाईट वाटावें इतके ते लोक शहाणे नव्हते.

तो पोपाच्या आज्ञा सर्वदा मस्तकावर धारण करीत असे, आणि धर्मपक्षाचाही मान बहुत राखीत असे; परंतु पोपाची सत्ता कमी करावी याविषयीं आंतून त्याचा प्रयत्न चालिला होता. सरदारांची आणि धर्मपक्ष्यांची सत्ता या रीतीनें उणी करावयाविषयीं, आणि प्रजांचें हित करावयाविषयीं, तो आपलें सर्व चातुर्य खर्चीत होता. वास्तविक पाहिलें असतां व्यापार धंदा वाढवायाविषयीं मात्र तो फार प्रयत्न करी. कारण येणेंकरून लोक सहजच स्वतंत्र

होतात; आणि राजा व कायदे यांवांचून कशाची खातर बाळगीत नाहींत. त्या काळाचे पूर्वीं सर्व शहरांतली वस्ती जवळचे एखादे बळकट किल्ल्याचे आश्रयानें असे. त्या किल्ल्यांत कोणी तरी मोठा एक लार्ड राहात असे. तो किल्ला गरीबांस आश्रय, आणि अपराध्यांस बंदीखाना होत असे. अशा ठिकाणीं कारागीर, वाणी, आणि दुकानदार यांची गरज लागे; ह्मणून ते त्या किल्ल्याचे जवळ कोठें तरी वस्ती करून, त्या लार्डास आणि त्याचे सेवकांस जें लागे तें पुरवीत. त्या वेळेस चोरांचा उपद्रव फार होता. चोर दिवजास रानांत लपून राहात, आणि रात्रीं देश लुटीत. त्यांचे उपद्रवापासून सुटावयाकरितां शेतीभाती लोकही त्या किल्ल्याचे शेजारीं आपलीं घरें बांधून राहात. तसे गांवांतील लोकांस, त्यापेक्षां चांगले व व्यापार करायाजोगे अशा ठिकाणीं बोलावून ते गांव हेनरी राजानें उजाड पाडिले. त्यानें आपण स्वतः तसें आचरण करून प्रजांस अल्पव्यय करावयाचा, आणि कर्ज मुदतीप्रमाणें चुकवून द्यावयाचा उपदेश केला. त्यानें बाहेरचे राजांशीं जितके तह केले, तितक्यांत त्या व्यापाऱ्यांचा हक्काचा अगोदर करार करून घेतला.

आपल्या प्रयत्नानें इंग्लंडांतले लोक बरेच सुधारले; निमुटपणें करभार देऊं लागले; सरदार लोक आज्ञेत वर्तूं लागले; राज्यनीतीनें दंड होऊं लागला; शहरांत मातबराची खातर न बाळगितां वस्ती होऊं लागली; व्यापार उत्तरोत्तर वृद्धिंगत होत चालिला; पक्षपाती लोक नाहींसे झाले; आणि बाहेरचे राजे इंग्लंडास भिऊन आपणांशीं तह करायास येऊं लागले; अशा सर्व आनंदाच्या

गोष्टी पाहिल्यानंतर, पुढें हेनरी राजास आपले शरीरीं मृत्यूचीं चिन्हें दिसूं लागलीं. त्याचे पोटांत कांहीं वायूचा रोग होऊन तो बावन्नावे वर्षी मृत्यु पावला. त्यानें तेवीस वर्षे राज्य केलें. **आल्फ्रेड** राजा झाल्यापासून **इंग्लंडाचे** दृष्टीस असा राजा पडला नव्हता. त्यानें आपल्या प्रजा सामर्थ्यवान् आणि सुखी केल्या; त्यानें त्याचे पूर्व वृत्तांत जो भेद पाडिला तो अशे थोडे काळांत पडेल असें मनांतही येत नव्हतें. इ०सं०१५०९

# प्रकरण २३.

## आठव्या हेनरी राजाची कथा.

संन् १५०९ पासून १५४६ पर्यंत.

पूर्वील राजाचा पुत्र आठवा **हेनरी** हा अठरावे वर्षी राज्य करूं लागला. जितके राजे झाले तितक्यांमध्यें या सारिख्या सर्व गोष्टी अनुकूळ कोणास नव्हत्या. याचेजवळ पन्नास हजार बळकट फौज होती. त्या वेळेस **फ्रान्स** देशाशीं लढाई करणें हें लोकांस फार प्रिय असे; ह्मणून त्यानें आपली फौज तेथें नेऊन तें राज्य घ्यावें अशी मसलत केली. तेव्हां **फ्रान्स देश** घ्यावयाविषयीं तोच एकटा उद्योग करीत होता असें नाहीं; **स्विस*** लोक पंचवीस हजार फौज घेऊन दुसरे बाजूनें त्यावर जाऊन हल्ला करावयाचे मसलतींत होते; तसाच **स्पेन** देशचा राजा **फर्दिनंद**, आपले कडचे एके बाजूवर येऊन हल्ला करायावि-

* स्विसर्लंड ह्मणून युरोप खंडांत देश आहे, तेथील लोकांचें नांव स्विस.

षयीं समयप्रतीक्षा करीतच होता. **फ्रेंचांचें** राज्य अशा विपत्तींत कधीं पडलें नव्हतें; असें असतांही शत्रूच्या वेडे-पणामुळें तें पुनः निर्भय झालें.

एकवेळ लढाई होऊन गेल्यावर **इंग्लंड** अणि **फ्रान्स** या दोन राज्यांत तह ठरला. त्यानंतर **हेनरी** राजाचे पूर्वजानें कांहीं सुकर्माकरितां जें असंख्य द्रव्य मिळवून ठेविलें होतें, तें तो ख्याली खुशालींत उधळूं लागला. तो **हेनरी** आनंदांत वेळ घालवीत असतां वारंवार लढायांची तयारी करण्यांत त्याचा जामदारखाना रिकामा होत चालिला. त्याचे बापानें जे अमात्य त्यास मसलत सांगायाकरितां नेमिले होते, ते असे ढंगांस संमति देईनात; ह्मणून **हेनरी** राजा त्यांस मसलत पुसेनासा झाला. आणि ज्याचें नांव पुढें **क्यार्डिनल बुल्सी** पडलें, असा जो **टामस**, त्याची बहुधा मसलत ऐकूं लागला. तो **बुल्सी** राजा ह्मणे तें मान्य करून त्याची खुशामत करीत असे. तो एके बेरोजगारी गृहस्थाचा मुलगा होता. कितीएक ह्मणत कीं, त्याचा बाप खाटकी होता, परंतु ती गोष्ट खोटी. त्यास लहानपणींच **आक्सफर्डाचे** सर्व विद्यालयांत पाठविलें; आणि चवदावे वर्षीं त्यास **बाचलराची*** पदवी प्राप्त झाली; तेव्हां त्यास **बाय† बाचलर** असें ह्मणूं लागले. शाळेंतून निघाल्यावर तो हळूहळू वाढत चालिला; शेवटीं त्यानें **डार्सोटाचे मार्किसाचे** मुलांस शिकविलें होतें ह्मणून त्यानें संतुष्ट होऊन त्यास **लिमिंग्तन** गांवाचे धर्माध्यक्षाच्या पदावर योजिलें. त्यास त्या कामावर जाऊन फार

* बाचलर ह्मणून एक शाळेंतील पद आहे.

† बाय ह्मणजे मुलगा.

दिवस झाले नाहींत, तों त्यानें एके दिवशीं मद्य पिऊन जवळ एके ठिकाणीं बाजार भरला होता, तेथें दांडगाई केली; ह्मणून तेथील न्यायाधीशानें त्यास धरून कैदेंत ठेविलें. अशी फजीती झाली तरी त्याचे भाग्योदयास विघ्न झालें नाहीं. पुढें सातव्या **हेनरी** राजाचे धर्मपक्ष्याचे स्थानीं त्यास योजिलें. त्या राजास **सेवाय** देशचे **मार्गारेट** राणीशीं लग्न करायाचें होतें, त्यासंबंधी कांहीं नाजूक काम त्यास सांगितलें. तें त्यानें यथास्थित बजाविलें पाहून राजाची मर्जी सुप्रसन्न झाली, आणि त्यानें त्याचें शहाणपण आणि उद्योग यांची वाहवा केली. **माक्सिमिलियन** ह्मणून राजा **ब्रुसेल** गांवांत राहात होता, तेथें कांहीं काम सांगून **हेनरीनें वुल्सीस** पाठविलें; तें काम करून तो तिसरे दिवशीं परत आला, असें पाहून राजास चमत्कार वाटला; आणि त्यानें लबाडी केली असें वाटून तो त्यावर रागें भरला. मग **वुल्सीनें** त्याची खातरी केली कीं, मी तुमच्या सर्व आज्ञा बजावून आतांच **ब्रुसेलाहून** आलों. त्या गोष्टीवरून त्यास **लिंकोन** शहरचे **डीनाची*** जागा मिळाली. त्या पदावर तो असतां **विंचेस्तराचा विशप, फाक्स**, यानें राजपुत्राची आणि त्याची ओळख करून दिली. कारण, त्या वेळेस राजाची कृपा **सरेचे अर्लावर** जशी होती तशी यावर व्हावी असें त्याचे मनांत होतें. पुढें त्या दरबारांत **वुल्सीस** खासगीचे अमात्याचें पद मिळालें. त्यामध्यें मार्दव, शौर्य, आणि भलेपणा, हे सर्व गुण होते; ह्मणून राजाची त्यावर प्रीति बसली. राजाचा आणि आपला स्वभाव मिळून जावा याकरितां **वुल्सी** आपला सर्व प्रयत्न खर्च करीत असे. तो गाई,

---

* डीन ह्मणून विशपाचे ह्मणजे धर्माध्यक्षाचे खालचें पद आहे.

हांसे, आणि निर्भिडपणें नाचे. त्यास वर्षें चाळीस होतीं, आणि तो जातीचा धर्मपक्षी होता, तरी तो आपल्या वयाकडे आणि अधिकाराकडे कांहींच लक्ष न देतां यथेच्छ आचरण करी; आणि त्याचे सोबतीही त्याचा मान न राखितां त्याची थट्टा करीत. **हेनरी** सारिखे दुष्कर्मी आणि भोळे राजास हे गुण फारच आवडत ह्मणून **वुल्सी** राजास परमप्रिय वाटूं लागला; आणि त्यानें सगळा राज्यकारभार त्याजवळ दिला. तो राजाजवळ नीच रीतीनें वागतो, आणि आपणाजवळ मोठी प्रतिष्ठा दाखवितो, ही गोष्ट पाहून लोकांस मोठा संताप येई. त्या वेळेस धर्मपक्ष्यांचा दुराग्रह आणि त्यांस अयोग्य असा त्यांचा डौल पाहून लोकांच्या मनांत पूर्वींच मत्सर आणि द्वेष उत्पन्न झाला होता; तशांत **वुल्सी** थोरपदास चढला पाहून लोक सर्व धर्मपक्ष्यांशीं बहुतच द्वेष करूं लागले. पुढें उत्तरोत्तर त्याचे गुण लोकांस उघड दिसून आले. त्यास द्रव्य मिळवायाची फार आस्था असे, परंतु उधळ्या पराकाष्ठेचा; बुद्धिवान मोठा पण उतावळा भारी; सत्तेची इच्छा, परंतु कीर्त्तिविषयीं त्यापेक्षांही अधिक; एखादे वेळेस तो, चावट, खुशामती आणि आग्रही, व दुसरे वेळेस थोर, प्रौढ आणि सत्ताधारी असा होई; बराबरीच्यांस त्रासक, परंतु आपलेपेक्षां लाहानावर दया करणारा; लोकांवर क्रूर, परंतु मित्रांशीं उदार; तसाच उपकारी, आणि धार्मिक; असा तो सर्व कामकाजांत मुख्यपणा धारण करी. परंतु आपला थोरपणा गुप्त ठेवीत नसे त्यामुळें आपलें मौर्ख्य प्रकाशित करी.

तो अकस्मात् उच्चपद पावला ह्मणून लोक त्याचा मत्सर करूं लागले. तो त्यांचे मनांतून जावा, याकरितां त्यानें

**फ्रान्स** देशाचा राजा प्रथम **फ्रान्सिस** याशीं स्नेह ठेविला. त्या राजानें बहुत प्रयत्न करून **वुल्सीस** आपले पक्षाचा केला होता; ह्मणून **वुल्सीनें हेनरी** राजास भीड घातली कीं, त्याची आणि आपली एकवेळ भेट व्हावी.

**हेनरी** समुद्र उतरून गेला; तेव्हां त्याचा सन्मान करायाकरितां, **इंग्लिशांचे** सीमेंत **गीन्स** आणि **आर्डर्स** या दोन गांवांमध्यें **क्यालेइस** शहरांत बहुत खर्च होऊन उभयतांची भेट झाली.

आपले बापाचें जें अपरिमित द्रव्य होतें तें **हेनरी** राजानें व्यसनांत खर्च केलें, मग तो आपले जामदारखान्यांत भर पाडायाकरितां **वुल्सीची** प्रार्थना करूं लागला. प्रथम त्यानें कर ह्मणून लोकांकडून पुष्कळ पैका काढिला; परंतु तो पैका उत्पन्न करायास **वुल्सीस** कांहीं संकट पडलें. त्यानें धर्माध्यक्षांपासून बहुत पैक्याचा पुरावा केला; आणि प्रतिनिधी जवळही मागूं लागला. त्यांनीं मागितल्याचे अर्धा पैका दिला. असा त्यांचा लोभ पाहून **वुल्सीस** राग आला, आणि त्यानें सांगून पाठविलें कीं, मला तुमचे सभेत येऊन बोलायाचा हुकूम व्हावा. त्यावर त्यांनीं उत्तर केलें कीं, ज्याची एथें नेमणूक झाली आहे त्यावांचून दुसरे कोणास एथें बसून वाद करायाची परवाणगी नाहीं. **पार्लमेंटांत** जे वादविवाद होतात त्यांत मुख्य राजा असावा, याविषयीं या राज्यांत हा प्रथमच यत्न होता. पुढें **वुल्सीनें** आंत प्रवेश केला; आणि **हेनरीनें** लवकरच तो बेत उत्तम रीतीनें सिद्धीस नेला.

या काळपर्यंत राज्यांतील सर्व कारभार **वुल्सी** चालवीत असे; आणि लोक येऊन फिर्यादी करीत त्या मनास

न आणितां राजा आपले अंतःपुरांत नेहमीं रमत असे. परंतु या अमात्याचे सत्तेचा नाश करणारा असा काळ पुढें आला. मोठी विलक्षण आणि उपयोगी अदलाबदल करायाकारतां त्या काळीं सिद्धता झाली होती. ही अदलाबदल ह्मणजे धर्मांतरव्यवस्था. तें वर्तमान असें.–

त्याकाळीं **रोमन** धर्मपक्षाचे दुष्कर्मांचा आणि लबाडीचा कळस झाला होता. त्याचे अगोदर कांहीं दिवस पुस्तकें छापण्याची युक्ति प्रसिद्ध झाली होती; तेणेंकरून विद्या, कला, कौशल्यें, यांचा प्रसार होऊन लोक त्या धर्मपक्षाची सत्ता मानीनात, असें झालें. त्या वेळेस दहावा **लिओ पोपाचे** अधिकारावर होता, तो मोठ्या उत्साहानें **रूम** शहरांत **सेंटपीटराचें** देवालय बांधायाच्या उद्योगास प्रवृत्त झाला होता. त्या कामास बहुत द्रव्य पाहिजे होतें तें त्यानें मुक्तिपत्रें विकून लोकांकडून उत्पन्न केलें. अशी गोष्ट पूर्वींही बहुतवेळ घडली होती. तें मुक्तिपत्र विकत घेईल त्यास जन्मांतरीं यातना भोगावी लागणार नाहीं, असें ह्मणत; आणि एखाद्यानें जरी तें आपल्या मित्राकरितां घेतलें तरी त्यास उपयोगीं पडे. तीं मुक्तिपत्रें जेथें विकायास नेत तेथें दुकानें उघडून तयार असत; परंतु मद्यशाळा, मांसगृहें, द्यूतसभा, एथें बहुधा तीं विकत मिळत. या मुक्तिपत्रांची प्रशंसा करायास **साक्सनी** प्रांतांत **आगुस्तिनाचे** मताचे महंतांस पाठविलें. त्यांनीं पैका आणि अबरू हीं दोन्हीं मिळविलीं. असे ते चोरून पैका छपवितात हें **पोपाचे** मंत्र्यांस समजतांच त्यांनीं तें नफ्याचें काम त्यांपासून काढून **डोमिनिकन** मताचे महंतांचे स्वाधीन केलें. **वर्टिंबर्ग** शहरचे सर्व विद्यालयांतला शाळागुरु **मार्तिन लूदर** ह्म-

णून **आगुस्तिन** महंताचे सांप्रदायाचा असे; त्यास, तें मुक्तिपत्राचें काम एकापासून काढून दुसऱ्यास दिलें ही गोष्ट पाहून, फार संताप आला; आणि तो त्या मुक्तिपत्राचा कांहीं उपयोग नाहीं असें लोकांस प्रसिद्धपणें सांगूं लागला. त्याची प्रकृति तापट असे; आणि तशांत त्यास अपमानामुळें चीड आली होती, ह्मणून त्यानें प्रत्यक्ष **पोपाचीही** निंदा आरंभिली. त्याचे प्रतिस्पर्ध्यांनीं त्याचें कांहींच चालू नये असें केलें; परंतु त्यानें बहुत ग्रंथ वाचून आपलें मत पुष्ट करायास **रोमन** धर्मपक्षावर दुसरे कांहीं दोष शोधून काढिले. त्या वादांत राजा **हेनरी** पर्यायेंकरून दोहोंकडचे पक्षांस अनुकूळ झाला. त्याचे बापानें त्यास सद्विद्या प्राप्त व्हावयाकरितां धर्माच्या शाळेंत कांहीं दिवस ठेविलें होतें. त्यावेळेस मोठमोठे विद्वानांची मुख्यविद्या काय ती हीच होती. त्या शास्त्रांत आपली गति आहे असें लोकांस कळवायाकरितां राजानें **लुदराचीं** पुस्तकें वाचायास **पोपाची** आज्ञा घेतली; कारण एऱ्हवीं तीं वाचलीं असतां जातिबाहिष्कृत होतो असा त्यावेळेस नियम होता. राजानें **सेंटटामस अक्विनसाचे** पुस्तकाचे आधारावरून सात* संस्कार स्थापिले; आणि त्या शास्त्रांत कांहीं आपली प्रवीणता प्रगट केली; परंतु कितीएक असें ह्मणतात कीं, हें सगळें **वुल्सीचे** मदतीनें झालें. असा त्वरेनें ग्रंथ करून तो **पोपाचे** संमतिकरितां **रूम** शहरास पाठविला. त्या ग्रंथांतील पांडित्य आणि गांभीर्य पाहून **पोपानें** प्रसन्न होऊन त्यास **सेंटजेरोम** आणि **सेंट आगुस्तिन**, यांचे प्रयत्नाची उपमा दिली;

* पोपाचे मतानुसारी सात संस्कार मानितात, आणि प्रातेस्तंत ह्मणणाऱ्यांनीं पोपाचें मत खंडून धर्मांतर स्थापिलें ते दोनच मानितात.

आणि त्याचे कर्त्यास धर्मसंरक्षक असें पद दिलें. परंतु **पोपाचे** ध्यानांत आलें नाहीं कीं, थोडेच दिवशीं हाच **हेनरी** राजा या धर्माशीं वैर करील.

**स्पेन** देशचे **आरागन** प्रांतांतली **क्याथरीन** राणी **हेनरी** राजाची बायको होती; तिला प्रथम आणून **हेनरीचे** भावानें तिशीं लग्न केलें होतें. त्यानंतर लवकरच तो मेला; तेव्हां त्या बायकोशीं राजानें लग्न केलें; या गोष्टीस अठरा वर्षे झालीं होतीं. लोक धर्मपक्षाचा फार मान राखीत असत खरे; परंतु तिशीं **हेनरीचें** लग्न झालें ही गोष्ट तो आणि लोक या दोघांसही ठीक वाटली नाहीं. त्याचे राणीचें दास्यत्व करणाऱ्या बायका होत्या, त्यांत एक **आनाबुलिन** ह्मणून होती; तिच्या बापाचें मोठमोठें दरबारी लोकांशीं नातें होतें, आणि तो प्रतिष्ठित होता. त्याचे नांव **सरटामस बुलिन.** राजानें त्यास बहुतवेळ वकिलातीचे कामावर पाठविलें होतें. त्यानें **नार्फोकाचे ड्युकाचे** मुलीशीं लग्न केलें होतें. दरबारांत जितक्या स्त्रिया होत्या त्यांमध्यें त्या **आनेचे** बराबरीची कोणीच नव्हती. तिनें **पारिस** शहरांत उत्तम विद्याभ्यास केला होता; त्यामुळें तर तिच्या सौंदर्यास विशेषच शोभा आली होती. तिचें स्वरूप स्वच्छ, सौम्य, आणि मोहक होतें. ती अंमळ ठेंगू होती. ती फार चांगली, हे सर्व गुण तिचे शहाणपण आणि उद्योग यांपुढें कांहींच नव्हते. **हेनरी** राजाचा स्वभाव असा होता कीं, मनांत कामविकार उत्पन्न झाला ह्मणजे तो आवरूं नये; ह्मणून तिला पाहातांच तो अतिशय मोहित झाला. त्यानें पुढें बहुत यत्न केला, परंतु लग्न केल्यावांचून तिचा उपभोग घेतां येईना. त्यानें या

विघ्नाचें निवारण करण्याचा चांगलाच यत्न आरंभिला. तो असा, त्याची राणी त्यास आवडेना अशी झाली होती; तिचा आपला वियोग झाला पाहिजे ह्मणून तो असें बोलूं लागला कीं, इतके दिवस मी आपले भावाचे बायकोशीं संग केला या गोष्टीचा मनांत विचार येऊन मला पश्चात्ताप होतो. आपण विचारांत पडलों असें, दाखवून, सातवा क्लीमेंट जो त्या वेळेस पोप होता, त्यास त्यानें विनंती केली कीं, मागील पोपानें जी मला क्याथेरिनेशीं लग्न करायास आज्ञा दिली होती ती फिरवावी ; आणि असें ह्मणावें कीं, शास्त्रानें जो अवश्य नियम सांगितला आहे तो मोडायाची पोपासही शक्ति नाहीं. पोपाचे मनांत तसें करायाचें नव्हतें; परंतु राजाचे त्यावर उपकार होते ह्मणून तो नाहीं ह्मणायास भ्याला; आणि त्यानें प्रथम होय ह्मणावें, मग नाहीं ह्मणावें, त्यासाठीं वाद कांहीं करावा, पुनः आश्वासन द्यावें; असें आरंभिलें. त्याच्या मनांत होतें कीं, धर्मसंबंधी असा विवाद जोंपर्यंत चालेल तोंपर्यंत राजा उतावीळ होणार नाहीं; परंतु हेनरीस कज्जाचा अभ्यास होताच, ह्मणून त्यानें आपले मताचे किंवा मनोविकाराचे पुष्टीकरणार्थ शास्त्रांतून कितीएक प्रमाणें काढिलीं.

असा बहुत दिवस त्या राजाचा आणि पोपाचा विवाद चालिला होता. तो ठरला ह्मणजे राजानें सुखी व्हावें असें होतें. त्या कामांत आपले पक्षाचा अभिमान धरून आपला स्नेही वुल्सी साहाय्य करील असें राजाचे मनांत होतें; परंतु तोही पोपाचे मतास अनुसरला. त्या वुल्सीस मोठें संकट येऊन पडलें. तें असें कीं, राजाचे आपणावर सहस्रशः उपकार, ह्मणून त्याची मर्जी मोडितां

नये; इकडे **पोपाचा** अपमान करावा तरी ही कठिण; कारण तो आपला स्वामी, आणि शासन करायास समर्थ. **वुल्सी** अतिशय हट्टी आणि भांडखोर होता खरा, परंतु त्या प्रसंगीं त्यानें **पोपाचा** वकील **क्यांपीजी** ह्मणून होता त्याचे सांगितल्याप्रमाणें केलें. बाहेरून निमित्त असें दाखविलें कीं, **क्याननला** ह्मणून ग्रंथ आहे त्यामध्यें त्याची गति फार, ह्मणून त्याचे मतास मी मान्य झालों. हें पाहून राजास फार राग आला; परंतु चांगली संधि सांपडे तोंपर्यंत तो त्यानें तसाच मनांत ठेविला होता. पुढें तो राजा एखादा तसाच बुद्धिवान् आणि लबाडीमध्यें किंचित् कमी असा पुरुष आपले जवळ असावा ह्मणून शोध करूं लागला; इतक्यांत त्यापेक्षां शाहाणा आणि अधिक विश्वासू, असा एक **टामस क्रामर** ह्मणून पुरुष त्यास सहज प्राप्त झाला.

या रीतीनें **वुल्सीची** जागा संभाळणार पुरुष मिळाल्यावर तो राजा **हेनरी** त्या धर्माध्यक्षावर आपला कोप उघडपणें दाखवूं लागला. राज्याचा **आटर्नी जनरल*** होता, त्यास **वुल्सीचें** अन्यायपत्र करायास सांगितलें; पुढें त्याजवळची सरकारी मोहोर काढून **सरटामस मोर** ह्मणून होता त्याजवळ दिली; वाड्यांतून त्यास निघून जायाचा हुकूम केला; आणि त्याचे घरचीं भांडीं, सामान, हें सर्व राजानें आपल्याजवळ आणविलें. त्याचे दवलतीची याद करून पाहूं लागले तों ती पराकाष्टेची दिसली; **हालंडां**-

* आटर्नी जनरल ह्मणून एक कामगार असतो; त्याचा उद्योग हा कीं सरकारसंबंधी न्यायांत सरकारचे पक्षाचे कागद पत्र तयार करून बोलणें बोलावें. जसा मुंबईचे कोडतांत आड्वोकेट जनरल आहे तसा.

तले चांगले कापडाचीं वस्त्रें त्याचे घरांत पन्नास सांपडलीं, आणि त्याचे वाड्याच्या भिंतीवरून सोनेरी आणि रुपेरी कापडांचे पडदे सोडिलेले पाहिले. मग त्यास सरकार गुन्हेगार ठरवून राजाचे आज्ञेवरून **नर्थंबलंडाचे अर्लानें** धरिलें, आणि तो **यार्क** शहरांत होता, तेथून चौकशी-करितां त्यास **लंडनास** न्यायाची सिद्धता केली. पहिल्यानें आपण दुय्यम धर्माध्यक्ष ह्मणून तो जायास कबूल होईना; परंतु पुढें त्या **अर्लाचा** दृढ निश्चय पाहून तो जायास सिद्ध झाला; आणि लहान लहान मजला करीत **लंडनास** चालला. वाटेनें तो **श्रूस्बरीचे अर्लाचे** घरीं पंधरा दिवसपर्यंत राहिला. तेथें एके दिवशीं जेवीत असतां तो अकस्मात् दुखण्यांत पडला. लोक तर्क करितात कीं त्यानें विष खालें असेल. तेथून त्यास पुढें **लेसेस्तराचे** मठापर्यंत नेलें. तेथें आपल्यास महंत भेटावयास आले पाहून तो बोलिला, "हे मठाध्यक्षहो! मीं तुमच्या मध्यें आपलें शरीर पाडावें ह्मणून आलों आहें." मग त्यानें आपलें आंथरूण घालायास सांगितलें. आपलें दुखणें एकाएकीं वाढत चालिलें पाहून त्याजवळ सेवेकरितां एक चाकर ठेविला होता त्याजपाशीं तो **वुल्सी** मरायाचे पूर्वीं कांहीं क्षण असें बोलिला, "मी तुझी प्रार्थना करितों कीं, त्या सार्वभौम राजाजवळ तूं मनापासून मजविषयीं बोल; त्याचा स्वभाव राजासारिखा आहे; आणि त्याचें हृदयही राजासारिखेंच आहे. तो आपलें अर्धे राज्य घालवील, परंतु आपली मर्जी मोडणार नाहीं. मी तुला सत्य सांगतों कीं, त्याचा वाईट बेत मोडावा ह्मणून मी त्याचे पुढें एक प्रहरभर गुडगे टेंकून उभा होतों; पण कांहीं साधलें नाहीं.

जशी चित्त देऊन मीं राजाची सेवा केली, तशीं जर ईश्वराची केली असती, तर त्यानें मला ह्मातारपणीं अंतर दिलें नसतें. परंतु ईश्वराचें ध्यान सोडून राजाचे सेवेकरितां इतके श्रम केले, त्यांचें योग्य फळ हें मला भोगिलें पाहिजे." त्याला असा बहुत पश्चात्ताप होऊन तो पुढें लवकरच मृत्यु पावला. त्यानें आपलें सर्व जन्म लोभानें आणि हलकी सेवा करून नीच केलें.

राजाचा धर्माशीं जो संबंध होता तो या रीतीनें सुटतांच त्यानें निश्चय केला कीं, आतां **पोपाची** पर्वा करायाचें कांहीं प्रयोजन नाहीं. मग त्यानें त्या **आनाबलेनेला पेंब्रोकाची मार्शनस** असें पद देऊन, तिशीं चोरून लग्न केलें. त्या समारंभांत तिचा बाप, **नार्फोकाचा ड्युक**, आणि **डाक्तर क्रामर** हे मात्र होते. पुढें ती बायको गरोदर झाली; तेव्हां त्यानें लग्न केलें अशी गोष्ट कबूल केली; आणि असा **पोपाचा** आज्ञाभंग केला हा विजय लोकांस प्रसिद्धपणें कळावा ह्मणून, आपली सुंदर बायको बरोबर घेऊन मोठा समारंभ करून सारे शहरभर मिरविला. **हेनरीनें** या रीतीनें **रोमन** धर्माचा त्याग केला खरा; परंतु दुसऱ्या कोणत्याही मताचा स्वीकार तंवपर्यंत केला नव्हता. तो कालपर्यंत धर्माचा कोणताच संप्रदाय ठरला नव्हता, आणि ज्यांचीं मतें परस्पर विरुद्ध होतीं त्यांचींही चित्तें केवळ उदास होऊन गेलीं होतीं; ह्मणून प्राचीन आणि नवीन धर्म व्यवस्थेचे विवादापासून कइकांचे प्राण गेले असतील, अशी गोष्ट सहज ध्यानांत येते.

महंतांनीं राजाशीं फार वांकडें आरंभिलें होतें, ह्मणून पुढें ते एखादा अपाय करितील तो होऊं नये, याकरित

राज्ञानें प्रयत्न आरंभिला. त्या वेळेस राज्यांत **सेक्रतारी*** **टामस क्राम्वेल** होता, त्यास राजानें आज्ञा केली कीं, **इंग्लंडांतले** प्रांतोप्रांतीं **कमीशनर**† नेमून पाठवावे. आणि त्यांनीं मठाचा शोध करून त्यांतील लोकांचा जो आचार असेल तो यथास्थित येऊन सांगावा. हें काम दरबारांतील कितीएक लोकांनीं पत्करिलें; त्यांचीं नांवें– **लेटन**, **लंडन**, **प्रेस**, **केज**, **पीत्री**, आणि **बेलसीस**. ते त्या धर्मशाळा पाहूं लागले तेव्हां त्यांस फार गोंधळ दृष्टीस पडला असें सांगतात. महंतीनींचे मठांचे मठ व्यभिचाराविषयीं प्रवृत; त्या कर्माविषयीं सहाय्य महंत; लोकांची भक्ति आणि उदारपणा अधिक वाढवायाकरितां उगीच भक्तीच्या मिषानें ठकबाज्या सर्वत्र चालिल्या आहेत; आणि त्या संस्थानांतून बहुत ठिकाणीं आंतले आंत विरोध पडून पक्ष झाले आहेत; असें त्यांनीं पाहिलें. हें खरें किंवा खोटें असो, परंतु या वर सांगितलेल्या दुष्कर्मांचा त्यांवर आरोप आल्यामुळें लोकांमध्यें त्यांजविषयीं तिरस्कार उत्पन्न झाला.

पुढें दुसरे लोक चौकशीस पाठविले, त्यांनीं येऊन नवीं नवीं अन्यायाचीं वर्तमानें सांगितलीं; तेणेंकरून राजा **हेनरीनें** जें क्रूर कर्म आरंभिलें तें लोकांस चांगलें वाटून सिद्धीस गेलें; आणि दोन वर्षांचे आंत महंतांचे स्वास्थ्याकरितां नेमून दिलेला सर्व वसूल राजास मिळाला. ते सर्व मिळून सहाशें पंचेचाळीस महंत होते. त्यांतून अट्ठा-

---

* सेक्रतारी ह्मणजे राज्यांतील कागद पत्र व चौकशी ठेवणारा चिटणिसासारिखा कारभारी असतो तो.

† कमीशनर ह्मणजे राजा मुखत्यार देऊन कांहींगोष्टीची चौकशी करायास मुलुखांत पाठवितो त्या अंमलदाराचें नांव.

वीस मुख्य महंत पार्लमेंटांतील सभासद होते. सर्व प्रांतांत एकंदर नव्वद शाळा, दोन हजार तीनशें भक्तिगृहें, आणि एकशें दाहा आस्पितलें ह्मणजे रोगिशाळा, इतकीं मोडिलीं. या सर्व संस्थानांचा वसूल मिळून एक लक्ष एकसष्ट हजार पौंड जमला. हा, सगळे राज्याचे वसुलाचा सुमारें विसावे हिशाइतका होता. त्या प्रसंगीं कितीएक लोक आंतून फार कुरकुरूं लागले; ह्मणून हेनरीनें असें केलें कीं, जे आपल्यास उपयोगीं पडतील, किंवा बिथरले असतां जाचतील असे होते, त्यांस लुटीचा वांटा दिला. त्यानें ती मठांतील कांहीं संपत्ति आपले मुख्य सरदारांस दिली; कांहीं हलके किमतीनें विकली; आणि बाकी उरली ती देऊन मनास येईल तशी दुसरी भूमि विकत घेतली.

शेवटीं हेनरीचें मत लिहून एक नियम केला; त्यापासून मनुष्यांचा बहुत नाश झाला, ह्मणून त्याचें पुढें लोकांनीं रक्तमत असें नांव ठेविलें. तो नियम असा कीं, जो कोणी बोलून किंवा लिहून द्रव्यांतर* मत असत्य ह्मणेल, किंवा दोन्ही प्रकारचें सहभोजन, ह्मणजे तें मद्य-मांस धर्मपक्ष्यांनीं आणि इतर लोकांनींही अवश्य भक्षिलें पाहिजे, असें बोलेल; अथवा असें बोलेल कीं, धर्मपक्ष्यांनीं लग्न केल्यास चिंता नाहीं; किंवा ह्मणेल कीं, शरीरशुद्धीचे नवस मोडिले तर कामास येतात; अथवा बोलेल कीं मांस[†] ह्मणून पूजा करीत असतात ती उगीच; किंवा धर्मोपदेशकाकडे पापांचा उच्चार करणें हें व्यर्थ; त्यास

*द्रव्यांतरमत ह्मणजे एशू क्रिस्ताचें रक्त आणि पाव हें त्याचें मांस असें जें मत तें.

† मांस ह्मणून प्राचीन क्रिस्ती धर्मांत एक जातीचें कर्म असे.

पाखंडी ह्मणून दंड केला जाईल; आणि न्यायाधीशाच्या मर्जीप्रमाणें तो जाळिला किंवा फाशीं दिला जाईल. त्या काळीं लोकांत दोन भेद होते; कितीएक **लुदराचे** मार्गीचे, आणि दुसरे **पोपाचे** मताचे. आतां या **हेनरीचे** नियमानें आणि पूर्वीचे हुकुमानें दोघांसही संकट पडलें; आणि तेणेंकरून लोकांस दुःख द्यावयाची एक दुसरी वाट झाली. त्याप्रमाणें त्याचीं फळेंही पुढें झालीं. **बेनान** आणि **बिसनी** या नांवांचे दोघे पुरूष होते, ते **पोपाचे** मताशीं विरूद्ध ह्मणून त्यांस जाळिलें; आणि **बिशप फिशर** ह्मणून होता, त्यानें राजाचें प्राधान्य नाहीं ह्मटलें ह्मणून त्याचा शिरच्छेद केला. पुढें दुसरा एक विश्वासू आणि थोर असा **सरटामस मोर** ह्मणून गृहस्थ होता, त्यास मारिलें. राजाचे प्राधान्याविषयीं त्यानें कांहीं संशयीत उत्तर दिलें, तितकेंच मनांत धरून वाईट रीतीनें त्याचा जीव घेतला. त्याचे वयाचे त्रेपन्नावे वर्षीं संन् पंधराशें पस्तिसांत **जुलै** महिन्यामध्यें त्यावर आरोप ठेवून त्यास मारलें. **पोपाचे** मतावर जो त्याचा अतिशय प्रेमा तो वर्ज्य करून, बाकी पाहिलें असतां, त्यामध्यें गुण बहुत सरस होते. त्याचें मन दृढ, शौर्ययुक्त आणि यथायोग्य, असें होतें.

अशा दुष्कर्मांत एक भयंकर गोष्ट झाली, ती व्हायास क्रूरतेवांचून कांहीं निमित्त नव्हतें. ती अशी, **आनाबुलेन** ह्मणून जी राजाची राणी सांगितली, तिला धर्मांतरव्यवस्थेची फार आवड असे, ह्मणून तिचे शत्रु तिचेवरचा विश्वास नाहींसा करून तिचा घात करायाची वाट पाहत होते. तसें करायास त्यांस लवकरच संधि सांपडली. तेव्हां राजाचें मन तृप्त झाल्यामुळें तीवरून केवळ उतरलें

होतें, आणि त्यास, पूर्वी कांहीं दिवसांपासून, **जेन सैमोर** ह्मणून राणीची आश्रित होती ती मिळावी, अशी इच्छा उत्पन्न झाली होती.

हें पाहून त्या **आनेच्या** शत्रूंनीं तीवर एक आरोप ठेविला. तो असा, **नार्फोकाचे ड्युकास पोपाचे** धर्मीविषयीं बहुत आवड होती, ह्मणून त्यानें कितीएक शायदी पैदा करून असें शाबूद केलें कीं, राणी दरबारांतील हलके चाकरांबरोबर रमते. तिचे जार मुख्यत्वें चार आहेत. त्यांचीं नांवें, राजाचे पागेतला एक खासदार **हेनरी नारिस**, राजाचे जवळचे कामगार **वेस्तन** आणि **ब्रेरिटन**, आणि चवथा एक **मार्क् स्माटिन** ह्मणून गवयी. मग **नारिस**, **वेस्तन**, **ब्रेरिटन** आणि **स्माटन** या चवघांची **वेस्तमिनिस्तर** वाड्यांत चौकशी झाली. या चौघांतून **स्माटनास** मथिवला; तो असा कीं, तूं आपण राणीशीं अन्याय व्यवहार केला असें ह्मण, ह्मणजे तुला सोडून देऊं. परंतु जीवर त्यानें असा आरोप ठेविला, तिनें पुढें येऊन त्याचे सांगण्यावर कांहींच भाषण केलें नाहीं. तेव्हां पुढें लवकरच बाकीच्यांबरोबर त्याचा शिरच्छेद झाला, तेणेंकरून तिचेवरचा आरोप गेला. **नारिसावर** राजाची फार कृपा होती, ह्मणून त्यास सांगितलें कीं, मीं राणीशीं दुष्ट व्यवहार केला असें तूं कबूल हो, ह्मणजे तुला क्षमा करून सोडितों; परंतु त्यानें त्या निंद्य कर्माचा तिरस्कार करून तसें केलें नाहीं; आणि ती राणी व मी हीं दोघेंही निरपराधी असें ह्मटल्यामुळें तो मृत्यु पावला.

सभासदांची जुरी ह्मणजे नियुक्त सभा करून राणी आणि तिचा भाऊ यांची चौकशी केली; आणि त्या दो-

घांकडे अशास्त्र संबंध हा अपराध ठरविला; परंतु यास कोणती साक्ष पाहिली, आणि सबब काय सांगितली, हें कांहींच विदित नाहीं. इतकी गोष्ट मात्र लागू झाली कीं, **राचफोर्ड** कितीएक लोक जवळ असतां राणीचे पलंगावर आडवा झाला होता. तिचेवर अन्याय ठरविला त्याविषयीं दुसरा इतका शोध लागला कीं, राणी आपले कितीएक सेवकांशीं असें बोलिली होती कीं, माझें हृद्गत कधीं राजास प्राप्त झालें नाहीं. हा तिनें राजाची निंदा केली, आणि तिनें राज्याचा कायदा मोडिला असें ठरविलें. त्या कायद्यांत असें लिहिलें होतें कीं, राजाची, राणीची, आणि त्याचे मुलांची, जो कोणी निंदा करील तो अपराधी. त्या हतभाग्य राणीस कोणी मसलत सांगितली नसतां तिनें स्थिर मनानें आपल्यावरचा आरोप जाण्याविषयीं बहुत वाद केला. तेव्हां जे जवळ तमासगीर होते तेहि तिला पाहून ती केवळ निरपराधी असें बोलूं लागले. तिचेवर जेवढे आरोप ठेविले, त्या सर्वांचीं तिनें सयुक्त उत्तरें दिलीं; परंतु अशांनीं राजाचें समाधान झालें नाहीं. आणि तिजवर अपराध ठरवून शासनाचा निश्चय केला. तो असा कीं, राजाचे मर्जीप्रमाणें तिला जाळावें, किंवा तिचा शिरच्छेद करावा. राजाचा निश्चय टळायाकरितां तिनें एक दोन वेळ प्रयत्न केला, आणि सांगून पाठविलें, "हे राजा, आपण मला हलके दशेपासून बाईसाहेब केलें; बाईसाहेबांची **कौंटेस**, आणि **कौंटेसची** राणी; आणि राणीपासून आतां लवकरच मी आकाशांतली भक्तीण होईन." शेवटीं कृपा करून तिचें शासन शिरच्छेदावर आणिलें. तें व्हावयाचे दिवशीं प्रातःकाळीं **किंग्स्तोन ह्मणून** त्या

किल्ल्याचा रखवाली होता, त्यास तिनें बोलावूं पाठविलें. तो बंदीशाळेंत आला तेव्हां ती बोलिली, "**किंग्स्तोन** साहेब, माझे प्राण आज दोन प्रहर दिवसपर्यंत जायाचे नाहींत असें मी ऐकिलें, ह्मणून मला वाईट वाटलें. कारण, माझ्या मनांत असें होतें कीं, लवकर मरून अशे दुःखी जन्मांतून एकवेळ सुटावें." तो किल्लेदार तिला धीर देऊन बोलिला कीं, कांहीं चिंता नाहीं; तुह्मांस तेव्हां विशेष दुःख व्हावयाचें नाहीं. त्यावर तिनें आपला गळा दोन्ही हातांत धरून हंसत उत्तर दिलें. "होय, मला ठाऊक आहे कीं, शिरच्छेद करणाराचा हात भारी जलद आहे; आणि माझी मानही बारीक आहे." जेव्हां तिला शिरच्छेदाचे जागेजवळ नेलें, तेव्हां ती जवळ होते त्यांपाशीं आपले शत्रूंस अप्रिय असें कांहींच बोलिली नाहीं. कारण, तिची **इलिझाबेथ** ह्मणून मुलगी होती, तिचें आपले मागें बरें व्हावें असें तिनें मनांत आणिलें. ती त्या वेळेस इतकें मात्र ह्मणाली, "कायद्याप्रमाणें मला शासन ठरविलें तेव्हांच मला कळलें कीं मी मरायाची." ती कोणास वाईट बोलिली नाहीं, किंवा माझा न्याय खोटा केला असेंही ह्मणाली नाहीं. राजाविषयीं तिनें मनापासून देवाची प्रार्थना केली, आणि ह्मणाली, "राजा फार दयाळू आणि भला आहे; त्यानें माझेवर सर्वदा कृपादृष्टि ठेविली; आतां यानंतर जर कोणाचे मनांत येईल कीं माझे अन्यायाची चौकशी करावी, तर माझी विनंती इतकीच कीं, वास्तविक काय आहे त्याचा शोध करावा." **इंग्लंडांत** कोणी चपळ आणि जलद शिरच्छेद करणारा मिळेना,

ह्मणून **क्यालेइस** शहरांतून एकास बोलावून आणून तिचा शिरच्छेद केला.

तिचेवर थोडे दिवसांपूर्वीं राजाची अत्यंत प्रीति होती, तिची अशी दशा झाली ती पाहूनही राजाचे निर्दय हृदयास कांहीं विकार न होतां, त्यानें दुसरेच दिवशीं **जेन सेमोर** ह्मणून जी पूर्वीं बायको सांगितली, तिशीं लग्न केलें. त्यानें **पार्लमेंटास** हुकूम केला कीं त्या बायकोस शासन ठरविल्यापासून तिचा शिरच्छेद केला त्यावेळेपर्यंत जो काळ गेला, त्या काळचें तिजविषयींचें त्यागपत्र मला करून द्या. हा प्रयत्न त्यानें, तिची एकटी मुलगी **इलिझाबेथ** होती तिचा असलपणा बुडवायाकरितां केला. असेंच त्यानें **क्याथेरीन** राणीची मुलगी **मेरी** तिजविषयींही केलें होतें.

अशी गडबड चालिली होती तेव्हां **स्मिथफील्ड*** ठिकाणीं आग जळतच असे. जे कोणी **पोपाचे** पक्षास अनुकूळ होते, तसेच जे **लुदराचे** मतास अनुसरले होते, त्या दोघांवरही राजाची गैरमर्जी होती, आणि त्यांच्या धर्मपक्षपात्यांवर कोप होता. सर्व लोकांचे धर्मव्यवस्थेत **हेनरी** राजा स्वतः आपण वारंवार बहुत फेरफार करीत असे, त्यामुळें मनांत काय आणावें, आणि कोणत्या पद्धतीस अनुसरावें हें कोणासच कांहीं कळेना. त्याचें मत कसेंही विपरीत आणि असत्य असतें तरी तें लोक घ्यायास सिद्ध होते, परंतु तो नेहमीं तें बदलीत असे, ह्मणून पूर्वींच लोकांस तें कसें समजावें! **टामसक्राम्वेल** ह्मणून एक लोहाराचा मु-

* स्मिथफील्ड ह्मणून एक ठिकाण आहे, तेथें त्या वेळीं अपराधी मनुष्यांस जाळीत असत.

लगा होता, त्यास राजानें आपला मित्र केला होता तो (असे मूर्ख राजे नीच लोकांवर फार प्रीति करून त्यांस वाढवितात.) आणि **क्रामर**, ज्यास **क्यांतर्बरीचे आर्चबिशपाचें** स्थान मिळालें होतें तो, हे दोघे धर्मांतरव्यवस्थेविषयीं फार प्रयत्न करीत होते. इकडे **विंचेस्तराचा बिशप, ग्यार्डिनर** आणि **नार्फोकाचा ड्युक** यांच्या मनांत राजास पूर्वींचे अति भक्तींत आणावें असें होतें; परंतु त्या दोघांसही **हेनरी** वश झाला नाहीं. तो फार दिवस खुशामत करून घेऊन असा चढला होता कीं, सर्व लोकांचा धर्म आपले मर्जीप्रमाणें चालवावा असें तो इच्छीत असे.

पुढें थोडेच दिवसांनीं रक्तस्रावी नियमांत जें मत स्थापिलें होतें, त्यास मान्य नाहींत ह्मणून सुमारें पांचशें लोकांस कैद केलें. परंतु ते **क्राम्वेलाचे** कृपेनें मुक्त झाले. **लांबर्ट** ह्मणून एक पंतोजी होता तो, आणि **डाक्तर बार्नेस**, ज्यानें मुख्यत्वें **लांबर्टाचा** शिरच्छेद करण्याचा उद्योग केला होता तो, या दोघांवर फार गैरमर्जी झाली, आणि कांहीं चौकशी न करितां **पार्लमेंटाची** संमति घेऊन त्यांस जाळिलें. तेव्हांही ते धर्मसंबंधी विचारच करीत होते. **बार्नेस** याबरोबर **जिराड** आणि **जेरोम** यांचाही शिरच्छेद केला. **एबेल फेदस्तोन** आणि **पवेल** यांस त्याच जाग्यावर मारिलें; ते त्या वेळेस ह्मणाले कीं, मरते वेळेस असे पाखंड्यांचा आमचा योग झाला हें आह्मांस शासनापेक्षां अधिक वाईट वाटलें.

राजा **हेनरीची** बायको **जेन सैमोर** ह्मणून जी पूर्वीं सांगितली, ती बाळंतपणींच मेली. मग महाद्वीपांत कितीएक ठिकाणीं संधानें करून शेवटीं त्यानें **क्लीव्हस्** शहरांत **आन**

**ह्मणून** बायको होती तिशीं विवाह केला. तो असें इच्छीत होता कीं, त्या आपले बायकोचे संधानानें **जर्मनीचे** राजाशीं आपण सख्य करावें. पुढें दिवसानुदिवस त्याची त्या बायकोवर अप्रीति होत चालली; ह्मणून त्यानें आपली बायको आणि आपला मुख्य मंत्री **क्राम्वेल**, या दोघांस जवळून काढून टाकण्याची युक्ति केली. आपलें शेवटचें लग्न जमवून दिलें ह्मणून त्यावर त्याची गैरमर्जी होतीच, तशांत त्यानें दुसरें एक कारण उपटून काढिलें. तें असें, **क्याथेरीन हावर्ड** ह्मणून **नार्फाकाचे ड्युकाची** भाची होती, तिचेवर राजाची प्रीति जडली. मग ती तृप्त करायाचा उपाय त्यानें असा केला कीं, पूर्वीची आपली बायको टाकिली. इकडे **नार्फोकाचे ड्युकाचें** आणि **क्राम्वेलाचें** वांकडें होतें, तो **ड्युक** त्यास आपला प्रतिस्पर्धी असें मानीत असे, ह्मणून त्याचा घात करायास ही संधि त्यास सांपडली. मग त्यानें आपले भाचीचे हातून होईल तितका प्रयत्न करून त्याचा नाश आरंभिला; आणि त्यानें कावा केला होता तो सिद्धीस गेल्यानंतर त्यास धरायाकरितां राजाची परमानगी घेतली.

त्याची ती विपत्ति समजतांच सर्व मित्रांनीं त्यास सोडून दिलें. **क्रामरानें** मात्र सोडिलें नाहीं. त्यानें राजास **क्राम्वेला**विषयीं एक पत्र लिहिलें, तें असें कीं, कोणासही तसें लिहायास हिम्मत व्हायाची नाहीं. तथापि **पार्लमेंटा**करवीं त्यावर पाखंडी आणि राजद्वेषी असा आरोप ठेविला आणि त्याचे तोंडून कांहींच वाक्य न ऐकतां हुकूम केला कीं, राजाचे इच्छेस येईल त्याप्रमाणें त्यास मारावें. त्याचा **शिरच्छेद** केला तेव्हां तो आपले पुत्राकडे लक्ष देऊन आ-

पले निरपराधीपणाविषयीं कांहीं बोलला नाहीं; आपले पातकाकरितां आपणास असा मृत्यु आला ह्मणून त्यानें ईश्वराची स्तुति केली; आणि कबूल झाला कीं, माझ्या मनांत बहुतवेळ धर्माविषयीं कुतर्क आले होते खरे, परंतु आतां मी **क्याथोलिक** धर्मांत मरतों.

**हेनरी** राजाचे दुष्कर्मांचा वृत्तांत आझून संपला नाहीं. त्यानें नवें लग्न केलें त्यामुळें तो प्रथम फार संतोष पावला; राणीचे गुणांनीं अतिशय मोहित झाला, आणि असें आपणास देवानें खुशी केलें ह्मणून उघड चवघांत त्याविषयीं देवाची स्तुति करूं लागला; परंतु हा आनंद फार दिवस राहिला नाहीं. ती गोष्ट अशी, **स्काट्लंडचे** राजाशीं कांहीं मसलत करायाकरितां राजा **यार्कास** गेला होता; तेव्हां त्याचे मागें **लासेलस** ह्मणून कोणीएक पुरुष **लंडनास** येऊन **क्रामरास** भेटला; त्याची बहीण **नार्फोकाचे** विधवा **डचेसे** जवळ चाकरीस होती; त्या बहिणीचे सांगण्यावरून त्यानें राणीचे लग्नाआधींच्या विचित्र विचित्र गोष्टी सांगितल्या. त्या गोष्टींविषयीं राणीची चौकशी करूं लागले, तेव्हां प्रथम तिनें नाहीं ह्मटलें, परंतु आपली साथी मंडळी फितूर झाली असें पाहून, ती कबूल झाली कीं, लग्नाचे पूर्वीं या देहाकडून कांहीं दुष्कर्में घडलीं असतील तीं असोत, परंतु लग्न झाल्यावर आपण राजाचा पलंग कधीं विटाळिला नाहीं. ती ज्यांजवळ आपल्या गुह्यगोष्टी सांगत असे, अशा तीन बायकांनीं तिजवर यापेक्षां विशेष गुन्हा लागू केला. त्या वेळचे क्रूर **पार्लमेंटास** इतकी बातमी समजतांच त्या सभेनें राणीवर गुन्हा लागू केला; आणि राजास विनंती केली कीं, तिला ठार मारावें, व तिचे

दुराचरणाविषयीं जी राच्फोर्ड ह्मणून बायको साक्षी होती ती आणि तिची विधवा आजी नार्फोकाची डचेस, तिचा बाप, आई, आणि दुसऱ्या बायका पुरुष मिळून नऊ यांसही तेंच शासन करावें; कारण त्यांच्या मसलतीनें राणीनें दुराचरणें केलीं. अशी अर्जी पाहून राजास फार संतोष वाटला, आणि त्यानें त्या कर्मास संमति दिली. मग त्या सर्वांचा वध केला. दुसरें असें केलें की, पुढें राजा एखादे बायकोशीं लग्न करीत असला, आणि तिचें दुराचरण कोणास ठाऊक असलें तर तें त्यानें येऊन जाहीर करावें; नाहीं केल्यास तो सरकारचा गुन्हेगार. अणखी असा कायदा केला कीं, एखादी बायको दुराचरणी असून ती राजाजवळ कबूल झाली नाहीं, आणि राजानें ती कुमारी ह्मणून तिशीं लग्न केलें, तर ती सरकारची गुन्हेगार. हा विपरीत आणि निष्ठूर कायदा पाहून लोक थट्टा करूं लागले, आणि असें बोलूं लागले कीं, आतां पुढें राजानें विधवेशीं मात्र लग्न करावें ह्मणजे निर्दोष लग्न होईल. त्या वेळेस फार चमत्कारिक गोष्ट ही होती कीं, अनेक पुरुषांची संमति जेव्हां पाहिजे तेव्हां मिळत असे. हे सर्व कायदे झाल्यावर, किल्ल्यांतील बुरुजावर राणीचा शिरच्छेद केला, आणि लेडी राच फर्डचाही वध केला. तिनें पूर्वी फार रक्त पाडिलें होतें, ह्मणून तीवर कोणी विशेष दया केली नाहीं.

ही बायको मेल्यानंतर सुमारें एक वर्षानें त्यानें शेवटची साहावी बायको केली. तिचें नांव क्याथरीन पारलोक ह्मणत आणि वास्तवीकच ती विधवा होती. तिचा पूर्वीचा नवरा लार्ड लातिमर ह्मणून होता. ती बायको

फार सदाचरणी आणि चतुर होती. तिचें वयास पहिली पंचविशी होऊन गेली होती. परंतु तिनें त्या दुष्ट राजाचें मन मोठ्या चतुरपणानें राखिलें. तरी प्रजांविषयीं राजाचे क्रूरपणांत कांहीं अंतर पडलें नाहीं. कांहीं दिवसपर्यंत त्याचे पायांस सूज आली होती, त्याचे पोटांत विकृति होती, आणि दुसरीं दुखणीं; यामुळें तो असा त्रासदायक झाला कीं, त्याचे सेवक त्याजवळ मोठे भयानें जात; मग जे त्याचे मताशीं विरुद्ध होते, त्यांस क्षमा व्हावी ही आशा कोठून?

पुढें त्याची शरीर प्रकृति जरी उत्तरोत्तर क्षीण होत चालिली, तरी त्याचे दुष्कर्मांत खळ पडेना. इतकें मात्र झालें कीं तो सर्वांचा सारिखा द्वेष करूं लागला. एखादे वेळेस प्रातेस्तंट आणि एखादे वेळेस क्याथोलिक या उभयतांसही तो शासन करी. त्या दुष्ट राजापासून शेवटीं निरर्थक क्लेश पावले असे दोघे. नार्फोकाचा ड्युक, आणि त्याचा मुलगा सरेचा अर्ल. ड्युक राजाची मोठ्या विश्वासूपणानें चाकरी केलेला असा गृहस्थ होता. त्याचा मुलगा लहान असून सर्व गुणांत त्यापेक्षां अधिक शूर, दरबारी, तसाच विद्वान असून त्याकाळीं ज्या शौर्यकळा विदित होत्या, त्या सर्वांमध्यें त्यासारिखा कोणीच नव्हता. तो आपले आचरणानें कळा कौशल्यें वृद्धिंगत करीत होता. त्यामध्यें सर्व गुणांपेक्षां विशेष हा होता कीं, त्यानें नाना प्रकारचे पद्यरूप ग्रंथ करून इंग्रेजी भाषा किंचित् सुरूपतेस आणिली.

इतक्याही गुणेंकरून त्याचें हेनरी राजापासून संरक्षण झालें नाहीं. तें वर्तमान असें, बोलोन प्रांताचे मामलती-

वरून त्यास काढिलें ह्मणून तो राजाचे मंत्र्यास कांहीं अपशब्द बोलिला, आणि **क्याथेरीन हवार्ड** ह्मणून जी पूर्वी राणी सांगितली, ती व्यभिचारी निघाली ह्मणून तिचा शिरच्छेद केला. या दोन कारणांवरून त्या सर्व कुटुंबावर राजाची गैरमर्जी झाली. नंतर त्या उभयतां बापलेकांस धरावें ह्मणून आंतून सरकारचा हुकूम झाला. मग त्या दोघांस धरून एके दिवशींच किल्ल्यावर टाकिलें. **सरे** हा प्रतिनिधींतला सभासद होता, ह्मणून त्याची चौकशी व्हावयास उशीर लागला नाहीं. या कृत्यास शायदी पाहिजे होते, तर विश्वासघात करणारे आणि एका रक्ताचे असून दालंटास येऊन गुह्यगोष्टी सांगणारे दुष्ट त्यावेळीं बहुत होते. **रिच्मंडाचा** विधवा **डचेस** त्याची प्रत्यक्ष बहीण, तिचेंही नांव त्यावर आरोप ठेवणारांत होतें; आणि त्याचा परम मित्र **सौथ्वेल** ह्मणून होता, तोही, त्यानें राजाजवळ लबाडी केली, असा पुरावा करायास सिद्ध झाला. यावरून असें वाटतें कीं, त्या भयंकर समयीं सारे राज्यांत कोठेंच विश्वास आणि थोरपणा ह्मणून राहिला नव्हता.

हा अन्याय आपलेपासून झाला नाहीं असें **सरेनें** ह्मटलें, आणि प्रतिज्ञा केली कीं मजवर जो अपराध ठेवितो, तो आणि मी पैजेनें युद्ध करूं. तसें त्यास करूं दिलें नाहीं, आणि असें स्थापिलें कीं, त्यानें आपले ढालेवर **एड्वर्ड दि कन्फेसर** राजाचें चिन्ह काढून राज्याविषयीं संधान आरंभिलें आहे. यावर त्याच्यानें जबाब करवेना, आणि जबाब करायाचें कांहीं प्रयोजनही नव्हतें. कारण, **पार्लमेंट** आणि **जुरी** तेव्हां राजाचे मर्जीप्रमाणें वर्तत असत. तो गृहस्थ आपलेवरचा आरोप जायाकरितां फार

शहाणपणानें बोलिला, परंतु त्यास सरकारचा गुन्हेगार ठरवून क़िल्ल्याचे घांटावर त्याचा शिरच्छेद केला. त्या-काळीं त्याचा बाप **ड्युक** राजास नम्रतेचीं पत्रें पाठवून आपली क्षमा व्हावयाचा प्रयत्न करीत होता, परंतु राक्ष-

इ०स०१५४६ साचे हृदयास द्रव कोठून येणार? **जानुआरी** महिन्याचे चवदावे दिवशीं **पार्लमेंटाची** स-भा झाली, त्यावेळीं कांहीं विचार न करितां प्रथमच **नार्फोकावर** सरकार गुन्हेगारीचें पत्र केलें. कारण, सभा-सदांनीं त्याची चौकशी केली असती तर, त्यावर अन्याय ठरताच असें प्रमाण नव्हतें. मग मृत्यूचें शासन ठरविलें, आणि तें काम क़िल्ल्याचे **लेफ्टिनेंटास** सांगितलें. **ड्युकानें** मरणाची सर्व तयारी केली. दुसरे दिवशीं सकाळीं त्याची समाप्ति व्हावयाची इतक्यांत राज्यामध्यें एक त्यापेक्षां मोठें वर्तमान घडलें, आणि त्याचा शिरच्छेद राहिला.

तें असें, याचे पूर्वींच कांहीं दिवस राजाचा अंतकाळ जवळ आला, असें चिन्ह दिसूं लागलें होतें; आणि जवळ जे होते त्या सर्वांचा निश्चय झाला होता कीं, तो आतां फार दिवस वांचायाचा नाहीं. त्याचे पायांत कांहीं दुःख होतें तें उत्तरोत्तर वाढत चालिलें; आणि त्याचें दोंद फारच मोठें सुटलें होतें, ह्मणून त्याच्यानें जाग्यावरून हालवेना. यामुळें जसा एखादा सिंह पाशांत सांपडतो तसा तो झाला. मरायाच्या पूर्वीं सुमारें चार वर्षें तो अशा आवस्थेंत होता. तो असा कीं, सर्वांस त्रासक आणि आपणास दुःखदायक; त्याचे दरबारी लोकांत परस्परांस मारायाचा उद्योग चालिला होता, ह्मणून त्यास मारायाचा उद्योग कोणी करीना. या रीतीनें त्यास कोणी मृत्यु जवळ आला ह्मणून न सांगतां तो तसाच

पडून दुःख पावत होता. कारण, त्याच्या मृत्यूचें भविष्य ज्यांनीं केलें, अशा बहुत लोकांचा त्यानें शिरच्छेद केला. शेवटीं **सर आंथनिडेनी** नामें पुरुष होता, त्यानें धीर करून त्याचे जवळ जाऊन सांगितलें कीं, तुह्मी आतां बहुत दिवस वांचत नाहीं. हें वर्तमान राजानें उदासीनपणेंकरून श्रवण केलें; हा त्या वेळेस मोठा चमत्कार झाला. त्यास तेव्हां जें दुःख आणि पश्चात्ताप झाला तो सांगतां येत नाहीं. त्यानें ह्मटलें कीं, **क्रामरास** माझे जवळ घेऊन या; परंतु तो यावयाचे पूर्वींच त्याची वाचा बंद झाली. **क्रामरानें** त्यास सूचना केली कीं, आपण **ख्रिस्ताचे** धर्मांत मरतां याचें आह्मांस कांहीं चिन्ह दाखवावें. तेव्हां त्यानें **क्रामराचा** हात आपले हातानें घट्ट धरून प्राण सोडिला. त्यानें सदतीस वर्षें नऊ महिने राज्य केलें. त्याचे वयास तेव्हां छपन्नावें वर्ष होतें. कितीएक राजे शत्रूंनीं उपद्रव करून त्रास आणिला ह्मणजे दुष्ट स्वभाव धरितात; कितीएक लुच्चांचे बुद्धीस लागून, कितीएक अभिमानास पडून, परंतु **हेनरी** राजा मुळापासूनच दुरात्मा, राज्यकामांत दुष्ट, धर्मांत क्रूर, आणि कुटुंबांत घातुक, असा होऊन गेला.

## प्रकरण २४.

### साहाव्या एड्वर्ड राजाची कथा.

संन् १५४६ पासून १५५३ पर्यंत.

राजा **हैनरी** मृत्यु पावल्यावर त्याचा पुत्र नऊ वर्षांचा होता तो राज्य करूं लागला. **हेनरीनें** मृत्युपत्रांत लिहून

ठेविलें होतें कीं, तो अठरा वर्षांचा झाला ह्मणजे त्यानें **स्वेच्छेनें** राज्य करावें. तोंपर्यंत मृत्युपत्राप्रमाणें सर्व बंदोबस्त चालविणारे असे सोळा असामी नेमिले आहेत; त्यांत मुख्य संरक्षक **सामर्सेटाचा ड्यूक** होय.

तो संरक्षक **ड्यूक** धर्मांतरव्यवस्था दृढ व्हावयाविषयीं **क्रामराचे** मसलतीनें यत्न बहुत करीत असे. तो **क्रामर** विचारी आणि चतुर होता, ह्मणून एकाएकींच एखादी गोष्ट करीत नसे. त्याची अशी मसलत होती कीं, हळूहळू लोकांत नवे प्रचार पाडून शेवटीं आपलें इच्छित संपादावें. त्यानें देवभजनाचे रीतीचा निश्चय करायाकरितां एक मंडळी नेमिली; तिनें तें काम विचारानें यथास्थित केलें. पुढें एक राज्य नियम केला; तो असा कीं, धर्मपक्ष्यांनीं लग्न केल्यास चिंता नाहीं. त्या नियमानें आपल्या पातकांचा उच्चार करायाचा संस्कार केवळ मोडिला गेला नाहीं, परंतु लोकांचे मर्जीवर राहिला. अशा आपले गुरूचे जुलुमापासून मुक्त झाल्यामुळें लोकांस असंतोष झाला नाहीं; आणि त्यांनीं द्रव्यांतरमत स्वेच्छेनेंच सोडून दिलें. शेवटीं **क्रिस्तियनाचे** धर्मशास्त्राशीं विरुद्ध जीं **क्याथोलिक** धर्मांत मतें आणि आचरणें चालिलीं होतीं, त्यांचा लोकांणीं त्याग केला; आणि आतां जसा धर्म **इंग्रेजांत** चालिला आहे, तसा बहुधा सर्व **इंग्लंडांत** चालूं लागला. या सर्व नवे गोष्टींवर लोक आणि सर्व धर्मपक्षी, यांची संमति पडली, **ग्यार्डिनर** आणि **बार्नर** या नांवांचे दोघे पुरुष मात्र त्यांस केवळ प्रतिकूळ होते; ह्मणून त्यांस किल्ल्यावर पाठविलें; आणि असें भय दाखविलें, कीं आज्ञेप्रमाणें वर्तला नाहीं तर तुह्मांवर सरकारची गैरमर्जी होईल.

अशा कर्मांनीं त्या संरक्षकाची लोकांत फार कीर्ति झाली; परंतु त्याप्रमाणेंच त्यास शत्रुही बहुत झाले. **टट्ली** ह्मणून **वार्विकाचा अर्ल** मंत्री होता, तो फार कावेबाज, लोभी, आणि दुर्गुणी असे. कसें तरी करून राजाजवळचे प्रथमस्थानीं आपली स्थापना करून घ्यावी असा त्याचा निश्चय होता; तो सिद्धीस न्यावयास उपाय कोणते करावे, हा त्यानें कांहींच विचार केला नाहीं; आणि बाहेरून चांगलेपणा दाखवून अनेक दुष्ट कर्में केलीं. **सौथंप्तनाचे अर्लाशीं** सख्य करून त्यानें आपला एक पक्ष जमविला; त्यांतील लोकांनीं अशी दृढ प्रतिज्ञा केली कीं, आपल्यावर संरक्षक अंमल करितो, हा याचा नाहींसा करावा. गोष्ट अशी झाली कीं, राज्यामध्यें जो पक्ष मोठा जबरदस्त होऊं लागला होता, त्याशीं त्या संरक्षकाचें वांकडें पडलें. तो डौल आणि सत्ता फार करी, ह्मणून मंत्रीमंडळीचा त्यावर रोष होता. नूतन धर्मावर त्याची भक्ति होती ह्मणून **क्याथोलिक** त्याशीं वांकडे होते. त्यानें आपले भावास दुःख दिलें ह्मणून बहुत लोक त्याचा तिस्कार करीत. दुसरें, त्यानें राज्य आणि धर्मसंस्थानें हीं बुडवून आपण बहुत संपत्ति मिळविली होती, ह्मणून सर्व त्यास वाईट ह्मणत असत. त्या वेळेस तो नाना प्रकारचीं अयोग्य कर्में करून **स्त्रांड** रस्त्यांत एक मोठा शोभायमान वाडा बांधीत होता. हेंही एक कारण लोकांस त्याची निंदा करायास झालें. वाडा बांधायास जमीन आणि सामान पाहिजे ह्मणून त्यानें **सेंतमेरीचें** एक देऊळ आणि धर्माध्यक्षांचीं तीन घरें मोडिलीं होतीं.

पुढें थोडे दिवसांनीं त्यावर मुख्यत्वें असा आरोप ठेवि-

ला कीं, सर्व सत्ता आपले हातीं ठेवून राज्यापहार करावा असी याची मसलत आहे. दुसरे कितीएक अपराध त्यावर लागू केले, परंतु ते सर्व मिळून तो सरकार गुन्हेगार ठरला नाहीं, असें ह्मणतात. असो, कसें तरी करून त्यास किल्ल्यावर टाकिलें. पुढें त्यावर **लार्डांचे** सभेंत गुन्हेगारीचें पत्र केलें, परंतु **सामर्सेटानें** तें चुकविलें. कारण पूर्वीं तो गुडघे टेंकून मंत्र्याजवळ आपले सर्व अपराध कबूल झाला होता. मग इतकें मात्र केलें कीं, त्याकडचा सर्व अंमल काढिला, आणि त्याची स्थावरजंगम सर्व संपत्ति जप्त करून सरकारांत नेली. परंतु पुढें राजानें ती त्याची त्यास परत दिली, आणि तो **सामर्सेट** पुनः संकटांतून मुक्त झाला. असें होईल हें कोणाच्या मनांतही नव्हतें. त्यास पुनः मंत्र्याचें पद प्राप्त झालें; आणि जर त्याचे मुक्ततेबरोबर लोभाचें येणें झालें नसतें; तर तो दैववान् खरा होता. तो केव्हां केव्हां राजा व सरकार यांचा धिक्कार करीत असे. तें **वार्विकाचे अर्लाचे** कानावर लागलेंच जाई. तो **अर्ल** पुढें **नर्थंबर्लंडाचा ड्युक** झाला होता. त्या **ड्युकाजवळ** **सामर्सेटा** जवळचे लोक असत, ते आपण ज्या मसलती सांगत त्या येऊन त्यास कळवीत, त्यामुळें तो रागावून आपला नाश करील, हें **सामर्सेटास** कळलें. **नर्थंबर्लंडाचे** आज्ञेनें त्यास आणि त्याचे साथी दुसरे कितीएक होते त्यांस धरिलें; आणि त्याचे बायकोसुद्धां त्यास बंदींत ठेविलें. पुढें त्यावर आळ घेतला कीं उत्तर प्रदेशांत बंड करायाचा त्याचा बेत होता; तो, रखवालीचे शिपायांची एक टोळी हजिरीचे दिवशीं मारून, **लंडनांत** दंगा करून, किल्ला आपले स्वाधीन करून घ्यावयाचा बेतांत होता. हा

आळ त्यानें आपल्यावरचा घालविला; परंतु इतकें कबूल झाला कीं, **लार्ड पाजेट** मेजवानी करणार होता, तेथें **नर्थ-पटन**, **नर्थंबलंड**, आणि **पेंब्रोक**, यांस मारायाची माझी मसलत होती खरी. पुढें **नर्थंबलंड**, **नर्थंप्टन**, **पेंब्रोक** आणि दुसरे मिळून सत्तावीस सभासद एकत्र जमले; त्यांत मुख्य **विंचेस्तराचा मार्कुइस**, यानें मुख्यस्थानीं बसून त्यास गुन्हेगार ठरविलें. त्याचे शत्रु आणि चौकसदार दोन्ही तेच गृहस्थ होते.

त्यास मारावयास नेलें तेथें बहुत लोक पाहावयास मिळाले होते; परंतु त्याचें चित्त किमपि व्यग्र झालें नाहीं. लोकांची त्यावर प्रीति होती. तो त्यांस मोठ्या धैर्यानें ह्मणाला कीं, राजा आणि सत्य धर्म यांचें प्रतिपालन करायाविषयीं मीं यथाशक्ति प्रयत्न केला. लोकांनीं तें सत्य ह्मटलें, आणि बोलिले "वास्तविक केला खरा." त्या वेळेस लोकांत गडबड होऊं लागली; परंतु **सामसेंटानें** त्यांस सांगितलें कीं तुह्मी स्वस्थ राहा; माझे अंतकाळाच्या विचारांत आक्षेप आणूं नका; आणि माझेबरोबर ईश्वराचें भजन करा. असें ह्मणून त्यानें डोकें खालीं करून शिरच्छेद करून घेतला.

**नर्थंबलंड** बहुत दिवस प्रथम स्थान मिळायाची आशा करीत होता; तशांत राजास दुखणें लागलें असें पाहून त्यास अतिशय लोभ उत्पन्न झाला. त्यानें त्या राजपुत्रास समजाविलें कीं, **हेनरीनें** आपले मृत्युपत्रांत असें लिहिलें आहे कीं, राज्याचा सरळ अधिकारी नाहींसा झाला असतां तुमच्या बहिणी **मेरी** आणि **इलिझाबेथ** आहेत, त्यांनीं राज्य करावें. परंतु **पार्लमेंटानें** असें ठरविलें कीं त्या दोघीही

असल नव्हत; त्यांची आत **स्काट्लंडाची** राणी आहे खरी; परंतु तिचें नांव मृत्युपत्रांत नाहीं, आणि ती परकुळींची ह्मणून तिला अधिकारही नाहीं. या रीतीनें त्या राजकुमारींस राज्याधिकार नाहीं, सबब आतां राज्य **डार्सेटाची मार्शनेस लेडी जेनग्रे** आहे तीस प्राप्त व्हावें.

त्यानें राजास समजाविलें कीं, ती राज्य करायास परम योग्य, शरीरानें सुंदर, विद्वान, आणि गुणींही तशीच आहे. राजपुत्र अमात्यांची मसलत सर्वदा मान्य करीत असे, ह्मणून त्यानें त्या गोष्टीचा विचार मंत्र्यांवर टाकिला. त्यांजवळ आपले इच्छेप्रमाणें करून घ्यावयाजोगी त्याची भीड होती, ह्मणून ती गोष्ट सिद्धीस गेली.

पुढें राजाचें शरीर अशक्त होत चालिलें, तशांत **नर्थंवर्लंडानें लेडी जेनग्रेचा** बाप **डार्सेटाचा मार्कुइस** होता त्याचें हित साधिलें–तें असें कीं, पूर्वी कांहीं दिवस **नार्फोकाचे ड्युकाची** पदवी नाहींशी झाली होती ती त्यास दिली. असा त्या गृहस्थावर उपकार करून आपला चवथा मुलगा **लार्ड गिल्फर्ड डड्ली** होता, त्याचें **लेडी जेनेशीं** लग्न केलें, जिचें हित साधायाकरितां त्यानें इतका प्रयत्न केला होता–आणि आपली मुलगी **लार्ड हेस्टिंग्साला** दिली. हीं दोन लग्नें मोठ्या समारंभानें केलीं. पुढें **एड्वर्ड** राजा दिवसानुदिवस क्षीण होत चालिला; शरिरीं मृत्यूचीं चिन्हें दिसूं लागलीं; कितीएक असें बोलूं लागले कीं, **डड्ली** त्याचे जवळ आल्यापासून तो अधिक अशक्त झाला. असें दिसतें कीं, **नर्थंवर्लंडाचें** आचरण पाहून असे तर्क लोकांचे मनांत उत्पन्न झाले असतील; आणि त्यानें राजाजवळचे जुने लोक सर्व काढून आपले तेथें ला-

विले हें पाहून ते तर्क अधिक वाढले असतील. असे लोकांचे संशय पाहून **नर्थंबर्लंडास** कांहीं वाईट वाटत नसे; तो उत्तरोत्तर राजाचे सेवेंत विशेष दक्षता दर्शवी; आणि तो कसा तरी बरा व्हावा अशी बाहेरून चिंता करी; परंतु आंतून असें इच्छींत होता कीं, कसें तरी होवो आणि माझे सुनेस एकवेळ राज्य मिळो. एक अज्ञान बायको राजपुत्रास औषध देत असे, तिच्या औषधापासून त्याचें दुखणें अधिक झालें; त्याच्यानें बोलवेना, स्वास बंद झाला, नाडी मेली, पायांस सूज आली, तोंडावर फिकेपणा दिसूं लागला, आणि सर्व मृत्यूचीं चिन्हें होऊं लागलीं. मग तो सोळावे वर्षी **ग्रीनिच** शहरांत मरण पावला. त्यानें सात वर्षे राज्य केलें. त्याचे मरणेंकरून सर्वांस दुःख झालें. कारण, त्यानें लहान वयांतच बहुत शाहाणपण दाखविलें, त्यामुळें तो लोकांचें उत्तम रीतीनें परिपालन करील अशी सर्वांची आशा होती. त्यानें इतकें लहान वय असतां बहुत विद्यांचा अभ्यास केला होता अशी कथा सांगतात.

सन १५५३ जुलै तारीख ६

## प्रकरण २५.

### मेरी राणीची कथा.

संन् १५५३ पासून १५५८ पर्यंत.

राजा **एड्वर्ड** मरण पावल्यानंतर राज्याधिकाराविषयीं दोघी बायकांचा तंटा लागला. त्यांचीं नांवें, एक **मेरी** आणि दुसरी **जेनग्रे**. **मेरी** ही **हेनरी** राजास **क्याथेरीन** राणीपासून झालेली कन्या; तीस राज्याधिकार प्राप्त होण्या-

विषयीं केवळ आपले पक्षाचे वास्तवीकपणाचा मात्र आधार होता. दुसरी **लेडी जेनग्रे**, इचें **एडवर्ड** राजाचे मृत्युपत्रांत नांव होतें; आणि तिचा सासरा **नर्थंबर्लंडाचा ड्युक**, त्याचेंही तिला पाठबळ होतें. **मेरीची पोपाचे** ढोंगमतावर फार भक्ति असे; आणि तिचा असा समज होता कीं आपला प्राणही द्यावा, परंतु पुरातन धर्म मिथ्या मानूं नये. ती सर्वदा परतंत्रतेनें वर्तत असे, ह्मणून तिचा स्वभाव एकलकोंडा होता. बाप जीवंत असतांही ती आपलें मत संरक्षुन त्याच्या नवे धर्मास अनुसरली नाहीं. असा धर्माविषयीं अतिशय पक्षपात होता यामुळें तिला लोक आग्रही मानीत असत. इकडे **लेडी जेनग्रेची** धर्मांतर संस्थापकांवर बहुत प्रीति होती; त्या वेळेस तिचें वय सोळा वर्षांचेंच होतें खरें; परंतु तिच्या बुद्धींत जितकी प्रौढता होती तितकी असणारीं अशीं मनुष्यें बहुत आढळत नाहींत. सर्व ग्रंथकारांचे लेख या गोष्टीविषयीं एक मिळतात, कीं तिची बुद्धि स्वभावतः तीव्र होती; आणि तशांत व्यासंगेंकरून ती बहुतच सूक्ष्म झाली होती. हे तिचे गुण पाहून सर्व लोक विस्मय करीत असत.

**राजर अस्काम** ह्मणून तिचा गुरु होता, तो एके दिवशीं तिला भेटायास गेला; आणि घरांत पाहूं लागला तों सर्व मनुष्यें पारधीस गेलीं होतीं, आणि ती मात्र एक **ग्रीक** भाषेचा ग्रंथ वाचीत बसली होती. त्यानें तिला पुसलें कीं, सगळीं पारधीस गेलीं आणि तुह्मी कां नाहीं गेलां? तिनें उत्तर केलें कीं त्यांला तशांपासून सुखाचे कण प्राप्त होतात; परंतु मला विद्येपासून सुखाचे सर्व ओघ येऊन मिळतात.

तिचे स्वार्थाविषयीं लोकांचे प्रयत्न चालिले होते हें वर्तमान तिला पूर्वीं कांहींच टाऊक नव्हतें, आणि तें कळलें तेव्हां ती चकित झाली. तिला दुःख झालें; नेत्रांपासून अश्रुपात येऊं लागले; तिचें समाधान होईना; शेवटीं मोठ्या संकटानें आपला सासा आणि बाप यांचे प्रार्थनेस ती अनुसरली. सर्व राज्यांत तिची दंवडी पिटायाचा हुकूम केला, परंतु तो थंडपणानें फर्माविला गेला.

राजा मेला अशी बातमी समजल्यावर, **मेरी नार्फोक** प्रांतांत **केनिंग्हाल** या नांवाचे वाड्यांत राहावयास गेली होती; तिनें राज्यांतील सर्व प्रमुखांस व अमात्यांस पत्रें पाठविलीं; त्यांतील सारांश हा कीं, मी राज्याची वास्तवीक अधिकारी, हें तुमचे ध्यानांत असावें; आणि तुह्मी उशीर न लावितां माझी दंवडी पिटावी. मग लवकरच ती अजिंक्य झाली; आणि तिचे जवळ चाळीस हजार फौज जमली. इकडे **नर्थंबर्लंडा**जवळ जे कांहीं थोडेसे लोक होते, त्यांचाही निश्चय दृढ नाहीं असें पाहून तो युद्धाची तयारी करायास मनांत भिऊं लागला.

**लेडी जेननें** दाहा दिवस राज्य करून पुढें भयंकर समय आला पाहून संतोषानें तें सोडून दिलें, आणि आईस बरोबर घेऊन आपण पूर्वींचे ठिकाणीं जाऊन राहिली. **नर्थंबर्लंडानें**ही पाहिलें कीं आपले सर्व उद्योग निष्फल झाले. मग तो राज्यांतून निघून जावयाचे बेतांत होता; परंतु शिपायांची एक टोळी येऊन तिनें त्यास आडविलें, आणि धमकाविलें कीं तूं चाललीस कोठें? तूं आमच्या वास्तवीक धन्यावर आमच्या करवीं शस्त्र धरविलें, याचा जापसाल तुजपासून आह्मी अगोदर करून घेऊं. या री-

तीनें तो चहुंकडून निरुपाय होऊन शेवटीं **मेरीस** शरण गेला; पुढें थोडे दिवसांनीं त्याचा शिरच्छेद झाला. **लेडी जेनग्रे**, आणि **लार्ड गिल्फर्ड डड्ली** या दोघांसही तेंच शासन ठरविलें, परंतु तें त्या वेळेसच करायाची मसलत नव्हती.

अशी गोष्ट झाल्यावर **मेरी लंडनांत** आली, आणि बहुत रक्त न पडतां सुखानें राज्यासनावर बसली. हें लक्षण सुखाचें दिसलें, परंतु पुढें लवकरच अस्तास जावयाचें होतें. ती राणी एकलकोंडी आणि प्राचीन धर्माची अतिशय भक्त होती असें पूर्वीं सांगितलें, ह्मणून तिनें धर्माध्यक्षांस पूर्वींसारिखी सत्ता द्यावयाचा, व ज्या त्रासांतून राज्य नुकतेंच सुटलें होतें, त्यांत पुनः त्यास घालायाचा निश्चय केला. पूर्वींचे राज्यांत **ग्यार्डिनर, तान्स्तल, डे, हीथ** आणि **बिझी** यांस **क्याथोलिक** मताचे अभिमानाकरितां बंदींत ठेविलें होतें, त्यांस मुक्त करून आपआपले स्थळीं नेमिलें, आणि त्यांचे हुकूम चालू केले.

पुढें राणीनें **पार्लमेंटाची** सभा केली; तेव्हां पूर्वीं राज्यांत धर्मसंबंधी जे नियम झाले होते ते सर्व फिरले; ह्मणून **हेनरी** मेला त्या वेळेस जशी धर्माची पद्धति चालली होती तशी पुनः पडली.

या रीतीनें धर्म पुनः पूर्वींचे अयोग्य दशेस पावत असतां, राणीचे मंत्री संधि पाहात होते कीं तिचें एके **क्याथोलिक** नवऱ्याशीं लग्न करून देऊन तिची सत्ता वाढवावी. मग त्यांनीं प्रसिद्ध जो पांचवा **चार्लिस, स्पेन** देशचा राजा, त्याचा मुलगा **फिलिप**, तो ठरविला. लोकांनीं मागून कुरकूर करूं नये याकरितां लग्नाचा करार **इंग्लंडाची**

प्रतिष्ठा राखून आपल्या पक्षास अनुकूळ असा केला; त्यामुळें ते किंचित् शांत झाले. परंतु त्यांनीं हळूहळू शेवटीं एक मोठें बंड बनविलें. त्यांत **सर टामस व्याट** ह्मणून होता त्यास मुख्य केलें होतें. पुढें राणीनें त्यास पकडून त्याचे कितीएक सोबत्यांसहवर्तमान शिरच्छेद केला.

लोकांचे मनांत विशेष करुणा यावयाचें कारण असें झालें कीं, **लेडी जेनग्रे** आणि तिचा नवरा **लार्ड गिल्फर्ड डड्ली** यांचा शिरच्छेद केला. त्यांचा त्या बंडांत कांहीं संबंध नसतां, उगीच शासन मात्र झालें. तें असें. **व्याटाचें** शासन झाल्यावर पुढें दोन दिवशीं **लेडी जेन** आणि **लार्ड गिल्फर्ड** या दोघांस सांगितलें कीं, तुह्मीं मृत्यूची तयारी करावी. हा निरोप ऐकून **लेडी जेन** कांहीं न घाबरतां स्थिर निश्चय करून राहिली. आपले मृत्यूस तीन दिवसांचा अवकाश आहे असें समजून तिला वाईट वाटलें. तिचा शिरच्छेद व्हावयाच्या आधीं तिच्या नवऱ्यानें सागून पाठविलें कीं, मी तुझे भेटीस येतों; परंतु तिनें नको ह्मटलें. कारण, तिला असें वाटलें कीं, हा शेवटचा वियोग उभयतांस परम दुःखकारक होईल. पूर्वी त्याचा किल्ल्याचे बाहेर शिरच्छेद करावा असें ठरविलें होतें; परंतु त्याचा निरपराधीपणा आणि सौंदर्य पाहून, लोक एखादा अनर्थ करितील असें समजून किल्ल्यांतच करावा असा हुकूम केला.

**लार्ड डड्लीच्या** दैवीं प्रथम मरावयाचें आलें; आणि **लेडी जेन** आपले शिरच्छेद स्थळीं जात होती, तिला वाटेनें रक्तानें भरलेलें नवऱ्याचें धड किल्ल्याचे देवळांत पुरायाकरितां घेऊन चालले होते, ते लोक भेटले. ती कांहीं

वेळपर्यंत विकाररहित मनानें प्रेताकडे पाहात उभी राहिली; आणि शेवटीं सुसकारा टाकून त्यांस बोलली कीं, चला पुढें. शिरच्छेद करायाचे पूर्वी ती ह्मणाली कीं, मीं राज्य स्वीकारिलें हा माझा अन्याय नव्हे; तर मीं विशेष आग्रह धरून त्याचा त्याग केला नाहीं हा माझा अपराध. लोभामुळें माझे हातून चूक झाली नाहीं, तर वडिलांचा बहुत मान राखिला ह्मणून. या रीतीनें राज्याचा जो नाश झाला त्यास प्रायश्चित्त मृत्यु; ह्मणून मी तें मोठ्या उत्साहानें भोगितें. या माझे दाखल्यावरून लोकांनीं समजावें कीं, ज्या कर्मेकरून सर्व लोकांचा अस्वार्थ होतो, तीं कर्में बुध्या जरी न घडलीं तरी त्यांचें शासन होणार नाहीं असें समजूं नये. या अर्थाचें भाषण करून तिनें दासीकरवीं आपले अंगावरचा पोषाग काढविला, आणि शिरच्छेद करणाराचे स्वाधीन झाली.

अशीं दुष्ट कर्में सिद्धीस नेणारांमध्यें मुख्य **विंचेस्तराचा बिशप ग्यार्डिनर** आणि **क्यार्डिनल पोल** हे दोघे होते. **पोल** कांहीं निमित्तानें **इटली** देशास गेला होता तो नुकताच परत आला होता. त्याचें आणि राजाचे कुटुंबाचें जवळचें नातें होतें. त्यास **क्याथोलिक** धर्माचा पक्ष असे; **हेनरी** राजाचें मत त्यास संमत नव्हतें; आणि त्यानें **हेनरीस** लागे, असें कांहीं लिहिलें होतें; ह्मणून त्याची त्यावर गैरमर्जी होती. इतका त्याचा धर्माविषयीं दृढ प्रेमा; ह्मणूनच, **पोपानें** त्यास आश्रय देऊन आपले संस्थानाचा वकील करून **इंग्लंडांत** पाटविलें. **ग्यार्डिनराचा** स्वभाव वेगळे तऱ्हेचा होता; त्याचें लक्ष इतकेंच कीं, कसें तरी राजास प्रसन्न करावें. या रीतीचा त्याचा धूर्तपणा बहुत

वेळ स्पष्ट दिसून आला. मग अनर्थाचा ,उद्भव झाला, आणि प्रथम **ग्लौसेस्तराचा बिशप हूपर** आणि **सेंटपालाचा प्रिबेंडरी* राजर्स** यांचा प्रथम वध केला. राणीनें न्यायाधीश नेमिले; त्यांत **चान्सेलर**† यास मुख्यत्वें बसवून त्यांचीं चौकशी केली.

पुढें तें शासन भोगायाचें **सांडर्स** आणि **क्रेटर** यां नांवाचे दोघे धर्माध्यक्ष होते, त्यांचे दैवीं आलें. कारण त्यांनीं धर्मांतराची संस्थापना व्हायाविषयीं फार प्रयत्न केला होता. **लंडनाचा बिशप बानर** होता तो त्या पराक्रमावरून फार चढून गेला, आणि त्या बिचाऱ्यांचा जीव गेला ह्मणून त्यास हर्ष झाला; तशांत राणीनेंही त्यास पत्र लिहिलें कीं हें धर्माचें कर्म असेंच निर्दयपणानें करीत जावें. पुढें थोडे दिवशीं **लंडनाचा बिशप रिड्ली**, आणि **वोर्सेस्तराचा** बहुमान्य **बिशप लातिमर**, या दोघांचा राणीचे हुकुमावरून शिरच्छेद केला. धर्मांतराची संस्था व्हावयाविषयीं **रिड्लीनें** मुख्यत्वेंकरून बहुत यत्न केला होता; त्याची भक्ति, विद्वता, आणि बुद्धि कौशल्य, हीं पाहून त्याचे स्नेही विस्मय पावत, आणि शत्रुही भीत असत. मरायाचे पूर्वरात्रीं त्यानें **आक्सफर्डाचा मेयर** आणि आपली बायको, यांस भेटावयास बोलाविलें. त्यांच्या डोळ्यांतून अश्रुपात येताहेत असें पाहूनही त्याच्या मनांत कांहीं विकार उत्पन्न झाला नाहीं. तशा दुःखसमयांतही त्यास आंतून स्वस्थपणा होता. जेव्हां त्यास जाळायास नेलें तेव्हां त्याचा जुना **स्नेही लातिमरही** त्याचे दृष्टीस पडला.

---

* धर्मसंबंधी एक पदाचा अधिकारी आहे त्याचें नांव.

† हीं एक राजाचे गृहसंबंधी अमात्यांतली पदवी आहे.

त्या काळीं जितके धर्माध्यक्ष होते, त्यांत **लातिमराची** मात्र भक्ति निष्कृत्रिम होती. दरबारी रीतीचें बोलणें त्यास ठाऊक नव्हतें; तो जें काय बोलायाचें तें उघड बोलत असे; तशा बोलण्याचा मोठमोठे लोकही फार धाक मानीत. त्याचे धर्माविषयींचे वाद अझूनपर्यंत आहेत; त्यांवरून असें वाटतें कीं तो पुरुष फार विद्वान आणि चतुर होता. त्या वादांत सर्वत्र वास्तविकपणा जसा व्याप्त आहे तसा दुसरे कशांत नाहीं. **रिड्ली** त्या आपले मित्राचें समाधान करूं लागला; तेव्हां तो ममतेनें बोलिला; "दादा, स्वस्थ असा; आज आपण जो **इंग्लंडांत** अग्नि प्रदीप्त करूं, तो कधीं विझणार नाहीं, असा माझा निश्चय आहे." त्यास जाळायाकरितां विस्तव पेटत होता, इतक्यांत एक **क्याथोलिक** धर्माध्यक्ष संतप्त होऊन त्यास आणि जवळ लोक होते त्यांस, धर्माच्या गोष्टी सांगूं लागला. तयारी चालली होती ती पाहून कांहीं मनांत न भितां, **रिड्लीनें** त्या गोष्टी शेवटपर्यंत चित्त देऊन ऐकिल्या; आणि त्या धर्माध्यक्षास सांगितलें कीं, जर मला कांहीं वेळ वांचविलें तर मी तुह्मीं बोलिलेत या सर्वांचीं उत्तरें सांगेन. परंतु त्यास वांचविलें नाहीं. शेवटीं ढीग केला होता त्यास आग घातली. दोघांतून **लातिमर** बिचारा लवकरच दुःखांतून सुटला; परंतु **रिड्लीचे** काळिजास अग्नि लागावयाचे अगोदर फार वेळ पाय जळून गेले, ह्मणून तो बहुत कष्ट पावला.

पुढें लवकरच **आर्चबिशप क्रामरची** हीच दशा झाली; त्यामुळें सर्व लोकांस बहुत संताप झाला. पूर्वीं त्यानें देहावर फार प्रीति दाखविली होती; ती अशी, तो कोणे

एके वेळेस बेसावध असतां त्याचे शत्रूंनीं नवा धर्म खोटा असा एक कागद करून त्यावर जबरीनें त्याची सही घेतली. असा त्यास पुरता पातकांत पाडून मग त्याचे नाशाविषयीं उद्योग आरंभिला. जाळायाचे जागेवर त्यास नेलें, आणि सभोंवता विस्तव पेटविला; तेव्हां त्यानें आपला उजवा हात जळेपर्यंत विस्तवांत धरिला; तो जळत असतां कांहीं दुःख किंवा शोक यांचा विकार न दाखवितां तो ह्मणाला, "तोच लबाड हात."विस्तव जेव्हां शरीरास लागला तेव्हांही त्यानें कांहीं कष्ट दाखविले नाहींत. त्याचें मन अन्य जन्मींच्या सुखांकडे लागलें होतें. त्याचें शरीर जळलें तरी काळीज तशाचें तसेंच होतें. त्यानें दुःखें कशीं धीर करून सोसलीं असतील, हें यावरून समजावें.

त्या समस्त वधांत दोनशें सत्तर लोकांस जाळून मारिलें व कैद केलें. दंड घेतला, आणि घरेंदारें जप्त केलीं ते सर्व वेगळेच. जाळून मारिले त्यांत पांच धर्माध्यक्ष, एकवीस धर्मपक्षपाती, आठ दुसरे गृहस्थ, चवऱ्यांशी व्यापारी, शंभर शेतकरी, पंचावन्न बायका, आणि चार पोरें इतकीं एकंदर मेलीं. हें सर्व कर्म भयानक होय; आणि तेव्हां राज्याचीही दशा या रीतीचीच झाली होती.

**फ्रान्स** देशांत **क्यालेइस** ह्मणून एक शहर सुमारें दोनशें वर्षें पर्यंत **इंग्लिशांजवळ** होतें, त्यावर येऊन **फ्रेंचांनीं** हल्ला केला, आणि अकस्मात् वेढून त्यांशीं बोलणें लाविलें. जें शहर तृतीय **एड्वर्डाचे** राज्यापासून **इंग्लिशांजवळ** होतें, आणि ज्यास वेढा घालायास अकरा महिने लागले, तें शेवटीं **गैसीचे ड्युकानें** आठ दिवसांत घेतलें. हा नाश झाला तेणेंकरून सारे लोक कुरकुरूं लागले, आणि रा-

णीसही वाईट वाटलें. ती असें बोलतांना कोणीं ऐकिलें कीं, मी मेलें तरी माझे हृदयावर **क्यालेइस** शहराचें नांव तशाचें तसेंच राहील.

या प्रकारचीं वारंवार दुःखें, लोकांची कुरकूर, पाखंडाची वृद्धि, अयोग्य नवरा, आणि निष्फळ लढाई, अशा गोष्टी मनांत येऊन **मेरीची** शरीर प्रकृति अशक्त झाली. तिचा मृत्यु जवळ आला असें दिसूं लागलें, व तिचें मन धर्माकडे विशेष लागलें, याकरितां लोक पुढें राज्य कोणीं करावें या मसलतीस लागले; आणि पूर्वीपेक्षां **इलिझाबेथ** राणीची अधिक आशा करिते झाले.

पुढें उत्तरोत्तर **मेरी** फार अशक्त होत चालली; तिला जलोदर झालें होतें, परंतु तें गरभारपण असें वांटून तिनें त्याप्रमाणें पथ्य केलें; तेणेंकरून तो रोग वाढला. प्रजा आपला तिरस्कार करितात आणि आपणासअप्रिय जी **इलिझाबेथ** ती पुढें राज्य करणार, हें समजून तिला जीर्णज्वर लागून त्यानेंच ती मेली. त्या हतभाग्य राणीनें पांच वर्षें, चार महिने, अकरा दिव राज्य केलें. त्या वेळेस तिचें वय त्रेचाळीस वर्षांचें होतें.

## प्रकरण २६.

### इलिझाबेथ राणीची कथा.

संन् १५५८ पासून १६०२ पर्यंत.

**मेरी** मेल्यानंतर कांहीं विघ्न न होतां **इलिझाबेथ** राणी सिंहासनारूढ झाली, त्या वेळेस लोक बहुत हर्षयुक्त झाले.

हीं. राणी पूर्वी कैदेंत होती, तेव्हांपासून तिच्या मनांत धर्मांतराची प्रवृत्ति व्हावी ही गोष्ट होतीच; तशांत राज्य प्राप्त झालें; मग ती त्याच उद्योगास लागली. तिनें उद्योग आरंभिला, आणि **पार्लमेंटानें** लागलाच सिद्धीस नेला. धर्मांतर व्यवस्थेस पुष्टिकारक असे हुकुमावर हुकूम होत चालिले; आणि **इंग्रेजलोक** सांप्रत ज्या धर्मानें वागतात तो एकेच **सेशनांत** दृढ झाला.

इतक्यानें सर्वत्र स्वस्थता झाली असेल असें समजूं नये; कारण, पुढें **मेरी** ह्मणून **स्काट्लंडाची** राणी होती तिनें **इलिझाबेथ** राणीचे मनांत भय आणि क्रोध हे उत्पन्न केले. तें वर्तमान असें, सातव्या **हेनरी** राजाची **मार्गारेट** ह्मणून मुलगी होती ती त्यानें **स्काट्लंडाचा** राजा **जेम्स**, यास दिली. त्या **जेम्साची मेरी** या नांवाची मुलगी होती; ती शरिरानें फार सुंदर, आणि बुद्धिवान असे. ती लहान असतां तिचें आणि **फ्रान्स** देशींचा राजपुत्र **फ्रान्सिस** होता त्याचें लग्न झालें. ती एकोणीस वर्षांची झाली त्या काळीं तिचा नवरा वारला. पुढें आपल्यास राज्य मिळावें ह्मणून तिनें उद्योग आरंभिला; परंतु तिची विधवा सासू होती तिचें प्राबल्य पाहून **मेरी** राणी **स्काट्लंड** देशास निघून गेली. तेथें तिनें असें पाहिलें कीं, लोकांचीं मनें धर्मांतराकडे लागलीं आहेत. तिचा विश्वास प्राचीन धर्मावर होता. राजा आणि प्रजा या दोघांचे धर्म भिन्न भिन्न असले तर त्यांचा परिणाम कधीं चांगला व्हावयाचा नाहीं. नूतन धर्मास अनुश्रूत जे धर्मपक्षी लोक ते उपदेश करितात हें राणीला चांगलें वाटेना; तशाच राणीच्या ख्यालीखुशाल्या त्यांस आवडेनात; असें त्या दोघांचें वांकडें उत्तरोत्तर

अधिक होत चालले. मग राणीचे हातून कांहीं तरी निमित्त घडावें आणि आपण उघड तंटा करावा, ही धर्मपक्षी वाट पाहूं लागले; तसें निमित्त तिचेकडून घडायास उशीर लागला नाहीं.

तें असें, **स्काट्लंडांत** आल्यावर **मेरीनें दार्न्लीचे अर्लाशीं** लग्न केलें. तो **अर्ल** भोळा, अज्ञानी आणि धीट; परंतु मनाचा चंचळ, दांडगा, जें सांगितलें तें खरें वाटावें अशा स्वभावाचा, असा होता. तो जवळचे खुशामती लोक जें सांगत तें ऐकत असे, ह्मणून त्याची बायको त्याचा अपमान करूं लागली. तें पाहून **दार्न्ली** कोपला, आणि तिच्या बोलण्या चालण्यांत अमक्यांनीं फेर पाडिला असेल असे जे जे दिसले त्यांचें शासन करूं लागला. **त्युरिन** शहरांत एक गायक होता, त्याचा मुलगा त्याच विद्येंत निपुण असा जो **डेविड रिझिओ**, तो त्या वेळेस दरबारांत असे, व त्यावर **मेरीची** फार कृपा होती. कसा प्रसंग आला तरी ती त्याचे मसलतीनें चाले; त्याचे मध्यस्थीवांचून कोणाचें काजकाम होत नसे; आणि जर कोणाची कांहीं अर्जी असली तर त्यांनीं नजरा देऊन किंवा खुशामत करून पूर्वी त्यास आपलेंसें करून ठेवावें लागत असे.

**दार्न्लीस** कोणीं सांगितलें कीं, राणीचा तुजवरचा प्रेमा **रिझिओनें** हरण केला. हें त्यास लागलेंच खरें वाटलें, आणि तो व त्याचे स्नेही कितीएक **लार्ड** यांनीं मसलत ठरवून ते सर्व मिळून तो **रिझिओ** राणीचे खोलींत होता तेथें गेले, आणि त्यास तेथून ओढून काढून जवळचे खोलींत नेलें आणि मारिलें. त्याचे शरिरावर छपन्नवार बस-

ले. असें ते करीत असतां राणी फार शोकाकुल होऊन रडूं लागली. त्याची समाप्ति झाली असें समजल्यावर, **मेरी** डोळ्यांचीं आंसवें पुसून बोलिली कीं, आतां मी फार रडत नाहीं, झालें याचा सूड उगवीन.

असा तिनें सर्व दुःखशोक नाहींसा दाखवून आपल्या नवऱ्यास भुरळें पाडिलें. तें इतकें कीं तो विश्वासानें तिचेजवळ राहूं लागला. असें झाल्यावर त्यास समजाविलें कीं, तुमची शरीरप्रकृति ठीक नाहीं, याकरितां तुह्मी **एडिंबर्ग** शहरास गेलां तर प्रकृतीस मानेल. हें त्यास खरें वाटलें, आणि तो तिला बरोबर घेऊन तेथें गेला. प्रथम तीं दोघें एका वाड्यांत होतीं; परंतु त्या घराची जागा अल्प आणि **मेरी**जवळ येणार जाणार लोकांची दाटी फार, तेणेंकरून गडबड होईल ह्मणून तिनें त्यास दुसरे एके वाड्यांत* स्वतंत्र जागा करून दिली. तेथें **मेरीनें** त्याचा फार समाचार घेतला, आणि प्रीति दाखविली. ती त्याशीं प्रीतीनें भाषण करी, आणि तो होता त्या खोलींत एखादे वेळेस सारे रात्रभर निजे. पुढें **फेब्रुवारी** महिन्याचे नववे तारिखेस तिनें आपले नवऱ्यास सांगितलें कीं, आज माझे वाड्यांत एके चाकराचें लग्न व्हावयाचें आहे तेथें मला गेलें पाहिजे. असें ह्मणून ती गेल्यावर अडीच प्रहर रात्रीस ज्या घरांत राणीचा नवरा होता तेथें मोठी गडबड झाली. ती पाहून गांवचे लोक घाबरले, आणि येऊन पाहातात तंव त्या घरावर दारू घालून आग लाविली आहे, आणि **डार्न्लीचें** प्रेत जवळचे शेतांत पडलें आहे. त्या प्रेतावरून त्यास कांहीं अपघातानें मारिलें असें दिसत नव्हतें; परंतु

---

* त्या वाड्याचें नांव हालिरूड हौस.

सर्व लोकांचे मनांत संदेह आला कीं, त्यास कोणीं तरी मारिलें खरें; आणि ज्यावर **मेरीची** नुकतीच कृपा झाली होती, असा **बाथ्वेल** ह्मणून जो गृहस्थ होता, त्यानेंच हें काम केलें असावें, अशी बातमी उठली. प्रथम एक अपराध घडला ह्मणजे पुढें त्या हातानें दुसरे व्हावयास उशीर लागत नाहीं. **डार्न्लीस बाथ्वेलानें** मारिलें असें जरी लोक ह्मणत होते, आणि त्याचा फार तिरस्कार करीत होते, तरी तशांतही त्यास दुसरें एक दुष्ट कर्म करावयास धीर झाला. तें असें, राणी आपले मुलास भेटायास **स्तर्लिंग** शहरास जात होती; तिला वाटेनें त्यानें आठशें घोडेस्वारांनिशीं येऊन धरिलें आणि **डन्बार** शहरास नेलें. तेथें त्यानें तिचेपासून जबरदस्तीनें आपलें काम करायाचें होतें तें करून घेतलें. त्या वेळेस लोकांचे मनांत आलें कीं, आतां **बाथ्वेलाचा** अपराध पुरा झाला. कारण, ज्यानें राणीचा नवरा मारिला, आणि तिचेवर जुलूम केला, त्यास क्षमा कशी होईल? असें त्यांचे मनांत आलें होतेंच तशांत **बाथ्वेलावर** पहिलेपेक्षां राणीची अधिक कृपा झाली, आणि त्यानें आपली बायको सोडून देऊन राणीशीं लग्न केलें; हें पाहून ते फारच विस्मय पावले. या लग्नापासून **मेरीची** बहुत विपत्ति झाली. तिचीं दुराचरणें पाहून लोक तिच्या अधिकारास अगदीं मोजीनात असे झाले. मग लोकांची एक जमात होऊन **मेरीला** धरून कैद करून ठेविलें, आणि सरोवरांत **लाकिविन** ह्मणून किल्ला होता त्यावर नेऊन टाकिलें, तेथें ती बहुत दुःख भोगून पश्चात्ताप पावली.

मोठ्यांस वाईट कर्मामुळें संकट प्राप्त झालें तरी, लोकांस त्यांची दया येऊन ते त्यांस साहाय्य करितात. असें आहे

ह्मणून **जार्ज डौग्लास** या नांवाचा एक पुरुष होता, त्यानें तिचीं वचनें आणि स्वरूप यांस भुलून, युक्तीनें तिला दुसरा वेष देऊन होडींत बसविलें, आणि आपण स्वतः वल्वून कांठावर नेऊन ठेविलें. ती बंदींतून मुक्त झाली ही बातमी समजतांच लोक तिच्या पक्षास अनुसरले; आणि थोडे दिवसांनीं तिचे जवळ सहा हजार सैन्य जमलें.

मग **ग्लास्गौ** शहराजवळ **लांग्सैड** या नांवाचे ठिकाणीं तिची आणि तिचे शत्रूंची लढाई झाली; तींत ती **मेरी** केवळ पराजित झाली. असा सर्व प्रकारें तिचा नाश झाल्यावर, **इलिझाबेथ** राणी आपलें संरक्षण करील, अशा आशेनें ती, लढाई सोडून थोडेसे सेवक बरोबर घेऊन मोठ्या त्वरेनें **इंग्लंडाकडे** चालिली. परंतु तें काहींच न करितां **इलिझाबेथ** राणीनें तिला कैदेंत ठेवायाचा हुकूम केला; परंतु तशांतही ममतेनें तिचा साधेल तितका समाचार घेतला. त्या हुकुमाप्रमाणें तिला धरून **स्ताफोर्ड** प्रांतांत **टुब्दरी** किल्ल्यावर ठेवून **श्रूस्बेरीचे अर्लांचे** स्वाधीन केलें. तेथें तिला आशा वाटत होती कीं, राणीची माझेवर केव्हां तरी खचित कृपा होईल; आणि वास्तवीक शेवटीं त्या दोघींचें ऐक्य झालें असतें; परंतु **मेरीच्या** आग्रहीपणामुळें तें झालें नाहीं. इ०सं०१५६८

त्या वेळेस मंत्री लोकांमध्यें मुख्य पदाचा अधिकारी **नार्फोकाचा ड्युक** होता; त्याचे गुण मोठे पदास योग्य असे होते. तो उदार, दयाळू, आणि सज्जन होता; ह्मणून लोकांची त्यावर प्रीति असे; आणि तसाच त्याचा स्वभाव मध्यम होता, ह्मणून प्रभूच्या मनांतही त्याविषयीं शंका येत नसे. त्याची बायको मेली होती; आणि त्याचें वय

**मेरीशीं** लग्न करायास योग्य होतें; तीही सुंदर आण तिशीं लग्न झालें असतां त्यांत त्याचा स्वार्थ होता; अशा अनेक गोष्टींमुळें तो तिशीं आपलें लग्न व्हावयाचा उद्योग करूं लागला. त्या दोघांचें लग्न झालें असतां आपल्यास वाईट, अशी शंका **इलिझाबेथ** राणीचे मनांत येऊन, तिनें त्या **ड्युकास** धरून किल्ल्यावर ठेविलें. तो कैदेतून सुटल्यावर राणी आणि नूतन धर्म, यांचे जे वैरी होते, त्यांचीं आंतून संधानें चालू झालीं. त्यांत **रोमन** दरबारचा वकील **रोडाल्फो** होता; आणि **मेरीचा** वकील **बिशप रास** तोही होता. त्यांनीं असें संधान केलें कीं, **नार्फोकानें मेरीशीं** लग्न करून तिला राज्याधिकारावर स्थापावें. हा बेत **नार्फोकाचे** मनास आला; मग कामामुळें किंवा लोभामुळें, काय असेल तें असो. तो सभ्य गृहस्थ प्रथम लोभामुळें त्यांचे बुद्धीस लागला; परंतु पुढें त्याचे हातून कितीएक अपराधही घडले. ते राणीस कळतांच तिनें त्यांचा पुरावा करायाकरितां त्या **ड्युकाचे** चाकरांस शायदीस नेलें; त्यांनीं सर्व वर्तमान उघड केलें. असें पाहून **रासाचे बिशपानें**ही ती सारी गोष्ट खरी ह्मटली. मग **ड्युकास** लागलाच किल्ल्यावर टाकून हुकूम केला कीं, तुझी चौकशी होणार आहे, त्यासाठीं तूं तयार असावें. मग पंचवीस सभासदांची जुरी होऊन त्याचा छिरच्छेद करावा असें ठरविलें. पुढें चार महिने झाल्यावर राणीनें मोठ्या संकटानें त्या शिरच्छेदाचे पत्रावर सही केली. तो **ड्युक** स्वस्थ चित्तेंकरून मरण पावला. त्यानें असा पुरावा केला कीं राणीचे सत्तेस अनिष्ट असा मी कांहीं बेत करीत नव्हतों; परंतु तो कबूल झाला कीं मला शासन केलें हें योग्य.

लोक अशीं लचांडें करीत त्यामुळें व्यर्थ **मेरीस** दुःख होई; कारण, तिला जितकीं मोठीं संकटें प्राप्त झालीं, तितकीं शत्रूच्या दुष्टपणामुळें झालीं नाहींत, तर स्वपक्षी लोकांचे उतावळीमुळें. **इलिझाबेथ** राणीचे मंत्री वाट पाहात होते कीं, **मेरीचे** शत्रुत्वाचें कांहीं चिन्ह दिसून यावें. तें वर्तमान असें झालें, **जान बालार्ड** ह्मणून एक **पोपाचे** मताचा पक्षपाती होता, तो **रीम्स** शहरांतले **इंग्रेजी** शाळेंत जन्मला होता; त्यानें प्रतिज्ञा केली कीं, राणी **इलिझाबेथ** आपले धर्माची वैरी ह्मणून कोणता तरी उपाय करून मी तिचा प्राण घेईन. असा अविचाराचा बेत करून तो शिपायाचें सोंग घेऊन **इंग्लंडांत** आला. त्यानें तेथें आपलें नांव **कप्तान फार्टेस्क** ह्मणून सांगितलें; आणि असा बेत आरंभिला कीं, राणीस मारावें, राज्यांत दंगा करावा, आणि तेव्हांच बाहेरून येऊन शत्रूंनीं चढाव करावा. **डर्बी** प्रांतांतले **डेथिक** गांवांत राहाणारा, पैकेवान् मोठ्या कुळांतला, असा **आंथनी बाबिंग्तन** या नांवाचा एक गृहस्थ होता, त्याजवळ तो **बालार्ड** प्रथम गेला. **बाबिंग्तन क्याथोलिक** धर्माच्या पक्षाचा आहे, आणि **मेरीचा** त्यास अभिमान आहे, ही गोष्ट सर्वत्र प्रसिद्ध होती; ह्मणून त्यानें तो बेत मान्य केला, आणि त्या भयंकर उद्योगास कितीएक दुसरे लोक साहाय्य करून घेतले. हा सर्व उद्योग **मेरीचे** स्वार्थाकरितां होत होता; याकरितां प्रथम त्यांनीं तें वर्तमान **मेरीला** कळवावें, असा बेत केला. मग **मेरीचे** खोलींत भिंतीला एक भोंक होतें त्यांतून तिला दारू जो देत असे, त्याचे हातून पत्रें पाठवायास लागले. अशा युक्ती करून **बाबिंग्तनानें** तिला कळविलें कीं, आह्मी असा बेत केला

आहे कीं, बाहेरून शत्रूंनीं चढाव करावा, देशांत बंड करावें, तुला मुक्त करावें, आणि **इलिझाबेथ** राणीस मारावें. त्यानें तिला आणखी असें कळविलें कीं, माझे जिवलग साहा मित्र आहेत, त्यांस **क्याथोलिक** धर्माचा आणि आपले पक्षाचा अभिमान आहे, ते राणीस मारायाचें हें काम करितील. यावर **मेरीनें** उत्तर पाठविलें कीं, तुमचे सर्व बेत मला मान्य आहेत; तुह्मी राणीस मारायाचें काम जे गृहस्थ करितील ह्मणून लिहिलें, त्यांनीं खचित समजावें कीं, जर माझे हातीं तितकी सत्ता आली, तर त्यांचे उपकारास योग्य अशीं त्यांस इनामें मिळतील. आणखी दुसरी गोष्ट माझी मोकळीक व्हावयाचा प्रयत्न, किंवा आंतलेआंत बंड करायाची मसलत करायाचे पूर्वीं, प्रथम **इलिझाबेथ** राणीस मारिल्यावांचून परिणाम नाहीं.

**बालशिंगम** ह्मणून **इलिझाबेथ** राणीचा मंत्री होता, त्यास या सर्व गोष्टींची बातमी लागली होती. त्यानें, त्यांची मसलत तयार झाली, आणि बंडवाल्यांकडे खचीत गुन्हा लागू होईल असें झालें, ह्मणजे त्यांचें शासन करावें असा निश्चय केला होता. मग **बाबिंग्तन** आणि त्याचे सोबती यांस धरायाचा हुकूमनामा लिहिला; तेव्हां ते नाना प्रकारचे वेष घेऊन चोरून राहूं लागले. परंतु लवकरच त्या सर्वांस धरून कैदेंत ठेवून चौकशी करायास नेलें. त्यांचा तपास होऊं लागला तेव्हां एकएका तऱ्हेचें सोंग, दुसरा दुसरे प्रकारचें घेऊं लागला. असें होऊं लागलें ह्मणून त्यांतून मुख्य मुख्य होते त्यांस मुळापासून सर्व गोष्टी कशा झाल्या त्या पुसून घेतल्या. त्यांतून चवदा असामींचा शिरच्छेद केला, आणि सात असामी आपला अन्याय कबूल

होऊन मेले. हे दुष्ट लोक मेल्यावर, पुढें त्यांपेक्षां मोठ्या मनुष्याचा शिरच्छेद झाला. तो ज्यांनीं केला त्यांस दुसरा कशाचा अधिकार नव्हता; एक जबरदस्तीचा मात्र.

तें वर्तमान असें, **इलिझाबेथ** राणीनें चाळीस सभासद आणि त्यांत मुख्य पांच न्यायाधीश, असे नेमून त्यांस काम सांगितलें कीं, तुह्मी **मेरीची** चौकशी करून तिला शासन काय करावें तें ठरवा. त्यांतून छत्तीस असामी **फाथरिंगे क्यास्तिला**जवळ गेले; आणि तिनें चौकशीस हजीर व्हावें ह्मणून **इलिझाबेथ** राणीनें पत्र दिलें होतें तें त्यांनीं **मेरीस** दिलें. नवेंबर ता. ११ सन् १५८६.

**सर्जांट गार्डी** ह्मणून एक पुरुष होता त्यानें तिचेवर मुख्य आरोप ठेविला कीं **बाबिंग्तनाचें** बंड तिला ठाऊक होतें; तें तिला मान्य झालें, आणि तिनें त्यास संमति दिली. **बाबिंग्तनानें** कबुलात करून दिली होती, आणि त्या दोघांचीं कागदपत्रें सांपडलीं होतीं, त्यावरून तो आरोप खरा असा पुरावा झाला.

त्या राणीचे अपराध काय असतील ते असोत; परंतु इतकें खरें कीं, तिला शासन बहुत झालें. तिनें प्रार्थना केली कीं माझे चौकशीचे अगोदर जे कागद मी तयार केले होते ते मला द्या, परंतु त्यांनीं दिले नाहींत; मग ती ह्मणाली कीं माझे प्रतिज्ञेची नकल तरी मला द्या, तीही त्यांनीं दिली नाहीं; पुढें तिनें विनंती केली कीं इतके विद्वान् तसेच वक्ते पंडित आहेत, यांशीं माझा पक्ष घेऊन वाद करील असा मला एक वकील तरी करून द्या; परंतु तिचें ह्मणणें कांहींच ऐकिलें नाहीं. पुढें कांहीं थोडे दिवसांचा विलंब करून शेवटीं तिचा शिरच्छेद करावा असें

शासन **वेस्तमिन्स्तरांत** ठरविलें. तेथें त्या मुकत्यारांतून दोन मात्र नव्हते—बाकीचे सर्व होते.

**मेरीचा** शिरच्छेद करायाचें **इलिझाबेथ** राणीचे मनांत नव्हतें हें ती उगीच बाहेरून मात्र दाखवीत असे. पुढें मागें जर **मेरी** राज्यासनावर बसली तर ती आपल्यावर राग काढील, अशी मनांत भीति आणून राणीचे प्रधान अनेक युक्ती करून तिचे हातून तें निर्दय कर्म कसें तरी घडावें, असा उद्योग करीत होते. यामुळें राज्यामध्यें नेहमीं बंडें, कावे, यांच्या बातम्या उठूं लागल्या; तेणेंकरून राणीचें मन भयग्रस्त झालें. जसा एखादा मोठ्या संकटांत किंवा आपत्तींत पडतो तशी ती दिसे; बहुधा एकांतीं बसे, आणि अस्पष्ट अक्षरें बोले तीं केव्हां केव्हां ऐकायास येत; त्यांतला भावार्थ हा कीं मला मोठें संकट प्राप्त झालें, आतां पुढें काय करावें? तशा विपत्तींत तिनें एके दिवशीं **डेविसन** ह्मणून **सक्रेतारी** होता त्यास बोलावून आणिलें आणि सांगितलें कीं **मेरीची** मोकळीक व्हावयाकरितां लोक कांहीं प्रयत्न करितील; ह्मणून मी शिरच्छेदपत्र लवकर करणार तर तें तूं तयार कर. त्यावर तिनें सही केली, आणि सांगितलें कीं, मोहर करायास तें **चान्सरा**जवळ पाठवावें. परंतु दुसरे दिवशीं सकाळीं **डेविसना**जवळ दोनवेळ दोन गृहस्थांबरोबर निरोप पाठविले कीं, तुमची माझी भेट व्हावयाचे पूर्वीं तो हुकूम मोहर करायास नेऊं नका. त्यानें तिला सांगून पाठविलें कीं, हुकुमावर मोहर झाली. अशी त्यानें त्वरा केली पाहून, राणीस राग आला. **डेविसनाचे** मनांत होतें कीं, कसें तरी करून **मेरीस** शासन ठरविलें आहे, तें सिद्धीस जावें;

मग त्यानें तें सर्व वर्तमान अमात्यांस विदित केलें; त्यांनीं असा विचार ठरविला कीं तो हुकूम लागलाच सिद्धीस न्यावा. त्यांनीं **डेविसनास** अश्वासन दिलें कीं, राणीजवळ आह्मी तुझेविषयीं पुरावा करूं. मग तें भयानक आज्ञापत्र, **बील** ह्मणून पुरूष होता त्याचे स्वाधीन केलें. त्या पत्रावर **श्रूस्बेरी, डर्बी, केंत** आणि **कंबर्लंडाचे अर्ल** यांचीं नांवें लिहिलीं होतीं. त्यांस **बीलानें** बोलावून आंणिलें; आणि ते सर्व मिळून दोन शिरच्छेदे बरोबर घेऊन **फार्थरिंगे** किल्यास निघाले.

त्यांनीं जातांच **मेरीला** सांगून पाठविलें कीं उद्यां सकाळीं पांच घटिका दिवसास मृत्यूची तयारी करावी. मग त्या दिवसाकरितां तिनें रेशिमाचा व मखमालेचा पोषाक राखून ठेविला होता, तो अंगावर धारण केला. त्या प्रांताचा **शेरिफ टामस आंड्नुस** ह्मणून होता, त्यानें तिला सांगितलें कीं, वेळ झाली, आतां तुह्मी माझे बरोबर चला. ती बोलिली, माझेकडून सिद्धता आहे. असें ह्मणून तिनें आपले चाकरांचा निरोप घेतला. मग दोन शिपायांचे खांद्यांवर हात देऊन, हातांत हस्तिदंताचा एक शूळ घेतला आहे, अशी स्वस्थ चित्तानें डोक्यावर बारीक कापडाचा पदर घेऊन **शेरिफाचे** मागून जाती झाली.

जे गृहस्थ आले होते ते आणि **शेरीफ**, हे पुढे चालिले आहेत; आणि तिचे घरचा कारभारी **मेल्विल** तिची स्वारी चालवितो आहे; अशी ती, जेथें शिरच्छेद करायाकरितां काष्ठ पुरून त्यावर काळें फडकें घातलें होतें, तेथें जाऊन बसली. नंतर तो **बील** राणीचा हुकूम वाचूं लागला.

तेव्हां **फोटरबेरो** गांवचा **डीन**, **फ्लेचर** नांवाचा होता, तो गराजांचे बाहेर उभा राहून बहुत स्तुतीच्या गोष्टी बोंलूं लागला. त्यास **मेरी** ह्मणाली, मला, **क्याथोलिक** धर्मांत सांगितलें आहे, त्या रीतीनें मरायाचें; तुह्मी उगीच मध्यें आक्षेप करूं नका. त्या खोलींत बहुत तमासगीर लोक आले होते, त्या सर्वांस तिला पाहून करुणा आली. ती जरी वयातीत झाली होती आणि फार दिवस विपत्तींत होती, तरी त्या वेळेस तिच्या शरिरावर तेज फांकत असे. मग ते दोघे शिरच्छेत्ते, तिच्या पायां पडून क्षमा मागूं लागले; तेव्हां ती ह्मणाली, जशी ईश्वरापाशीं माझ्या अपराधांची मी क्षमा मागतें अशी तुह्मांला आणि दुसरे जे कोणी माझे मरणास कारण असतील, त्यांस मी क्षमा करितें. असें बोलून पुनः एकवेळ ती आपण निरपराधी असें ह्मणाली, आणि डोळ्यांवर रुमाल घालून निर्धास्तपणें जमिनीवर निजली. मग तिनें थोडासा ईश्वराचा स्तव केला. तो झाल्यावर शिरच्छेत्त्यांनीं दोन वार करून तिचें मस्तक तोडिलें. मनुष्यमात्राचे परस्पर वैराचा विचार केला असतां, असें दृष्टीस येतें कीं उभय पक्षांचा कांहीं तरी अन्याय असतो. आतां एथें पाहा, **मेरीनें** शासन करायास योग्य असे अपराधही बहुत केले; आणि तिला शासन करायास कांहींच अधिकार नसतां, **इलिझाबेथ** राणीनें तिचें पारिपत्य केलें.

**स्पेन** देशचा **फिलिप** नामें राजा बहुत दिवस **इंग्लंडाचा** नाश करायास पाहात होता; त्यानें या समयीं आपले उद्योगाचा आरंभ केला. इतका प्रयत्न करून त्याला सिद्द करायाची गोष्ट ही होती कीं, नवीन धर्म ना-

हांसा करून, पुरातन **क्याथोलिक** मत स्थापावें. **नेदलेंड** देशांत त्याच्या प्रजांनीं बंड केलें, तें करायास **इंग्लिशांनीं** भर दिली होती, ह्मणून त्यास संताप आला होता, हेंही एक दुसरें कारण. तो पूर्वीं कांहीं दिवस **इंग्लंडांत** येऊन जबरदस्त हल्ला करायाचे तयारींत होता, त्याकरितां त्याचे विशाल राज्यांत सर्वत्र **आरमाराचा** डंका पडला, आणि अनेक युक्तींनीं प्रजांवर कर बसवून तें तयार केलें. त्या **आरमारांत युरोप** देशांत पूर्वीं कधीं पाहिलीं नव्हतीं अशीं मोठीं १३०० गलबतें होतीं. **साटाक्रौसाचा मार्कुइस** होता त्यास त्या **अरमाराचा** सरदारपणा दिला. त्या गृहस्थानें समुद्रांत लढाई करून बहुत कीर्ति मिळविली होती. जमिनीवरचे फौजेचा सरदार **पार्माचा ड्युक** केला होता. त्यांतली वीस हजार फौज गलबतावर चढविली होती, आणि चवतीस हजार **इंग्लंडांत** जायास **नेदलेंडांत** तयार होती. तें अरमार जय पावून येईल असा **स्पानियार्डांचा** निश्चय होता, ह्मणून त्याचें नांव अजिक्य आरमार असें ठेविलें होतें.

तें भयानक आरमार निघून **इंग्लंडावर** येतें आहे, ही बातमी समजून **इंग्लंडांतले** सर्व लोक पराकाष्ठेचे घाबरे झाले; कारण, त्यांशीं लढायास **इंग्लिशांजवळ** सगळीं गलबतें तीस होतीं; तींही त्यांचेपेक्षां फार लहान. हें समुद्रांतलें; आतां जमिनीवरून तर **इंग्लिशांचा** कांहींच उपाय चालणार नाहीं असें लोकांस भय होतें; कारण, शत्रूंचे फौजेंत बंदोबस्त अधिक, आणि त्यांस विपत्तीची संवय होती. अशी **स्पानियार्डांचीं** गलबतें पुष्कळ, आणि **इंग्लिशांचीं** थोडीं दिसत मात्र; परंतु **इंग्लिशांचे** खलाशी लोक

कुशळ, आणि शूर ह्मणून त्यांचा जितका बंदोबस्त होता तितका **स्पानियार्डांचा** नव्हता. **एफिंगम** शहरांत राहाणारा **लार्ड हवार्ड** ह्मणून पुरुष त्या वेळेस मुख्य नौकाधिकारी होता, त्यानें **इंग्लिशांच्या** आरमाराचा सरदारपणा आपण पत्करिला.

**युरोप** देशांत ज्यांची मोठी कीर्ति असे **ड्रेक, हाकिन्स**, आणि **फार्बिशर**, इत्यादिक पुरुष त्याचे हाताखालीं चाकरीस होते. **इंग्लशांचीं** आणि **फ्लेमिशांचीं** मिळून चाळीस गलबतें जमवून त्यांचा सरदारपणा **लार्ड सीमोरास** देऊन **पार्माचे ड्युकाचें** निवारण करायाकरितां तीं **डंकर्क** बंदराजवळ पाठविलीं. या रीतीची **इंग्लिशांनीं** सिद्धता केली तेव्हां, **युरोप** देशचे सर्व **प्राटेस्तंट** राजे कोणत्या धर्माचा विजय होतो हें पाहावयास उत्सुक झाले होते.

**स्पानिश** नौकासमुदाय निघून यावयाच्या बेतांत होता, इतक्यांत त्याचा मुख्य नौकाध्यक्ष **सांटाक्रोस** आणि उपनौकाध्यक्ष **पालिआनो** हे दोघेही मरण पावले. ह्मणून त्या कामाची सरदारी **मेसिदोनियाचे ड्युकास** दिली; त्यास समुद्राचे कामांत कांहीं कळत नव्हतें. असो ; तीं गलबतें **लिज्बन** बंदरांतून निघालीं, त्याचे दुसरे दिवशीं समुद्रांत मोठें तुफान झालें; आणि कित्येक लहानसान गलबतें बुडालीं. त्यांस परत यावें लागलें. मग त्यांतील कांहीं मोडलें तुटलें होतें तें नीट करून पुनः निघाले; तंव वाटेनें त्यांस एक कोळ्यानें अशी बातमी सांगितली कीं, **स्पानिश** तारवांची फुटाफुट झाली; असें ऐकून **इंग्लिशांनीं** आपलीं गलबतें परत **प्लिमौथ**

बंदरास नेलीं, आणि बहुतकरून माणसेंही दूर केलीं **स्पानिश** नौकाध्यक्षास असा हुकूम होता कीं, **फ्लांडर्स** देशास जाऊन तेथचे लोक आंत घ्यावे आणि मग **इंग्लंडांत** जावें; परंतु त्यानें या खोट्या बातमीवर विश्वास ठेवून, तें सोडून दिलें; आणि समोर **इंग्लंडास** गेला. इकडे **इंग्लिशांचा** नौकाध्यक्ष **एफिंगम** सर्व सिद्धता करून **स्पानिशांची** वाट पाहात होता, अशांत **स्पानिश** गलबतें अर्ध चंद्राकृती करून येत आहेत असें त्याचे दृष्टीस पडलें. त्या अर्ध चंद्राकृतीची एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत लांबी सात मैल होती. असें असतां ही **ड्रेक, हाकिन्स** आणि **फार्बिशर** यांचे हिमतीवर **इंग्लिशांचा** नौकाध्यक्ष जाऊन दुरून **स्पानिश** गलबतांवर हला करून, त्यांचे मंद बाजूचा नाश करिता झाला, हा मोठा चमत्कार.त्यास जवळ जाऊन लढायाचा धीर होईना. कारण त्याचीं गलबतें थोडीं, तशाच तोफा व इतर सामानही थोडें होतें. **इंग्लिश** त्या मोठ्या गलबतांवर जाऊन पडले त्यामुळें त्यांचाही कांहीं नाश झाला, परंतु शेवटीं **स्पानिशांचीं** दोन गलबतें हैराण करून घेतलीं. मग **स्पानिश** परतले; त्यांचे मागें **इंग्लिश** लागले, आणि **इंग्लिशांस** बाहेरून येऊन दुसरीं गलबतें मिळालीं, त्यामुळें त्यांनीं पाहिलें कीं आतां त्यांवर जाऊन पडलें असतां, कांहीं चिंता नाहीं; मग **स्पानिश** लोक **क्यालेइस** शहरांत जाऊन राहात होते, इतक्यांत **इंग्लिश** जाऊन पडले. त्यांस अधिक घाबरें करायाकरितां, **हवार्डानें** आपलीं आठ गलबतें लवकर पेट घ्यायाजोगें दारू इत्यादि सामानसुमान भरून शत्रूंमध्यें पाठवून दिलीं. **स्पानियार्ड** तीं पाहून घाबरले

आणि पळून गेले; तितक्यांत **इंग्लिशांनीं** त्यांचीं बारा गलबतें पकडलीं आणि त्यांचा नाश केला.

हें वर्तमान घडलें त्यामुळें **स्पेनचे** दरबाराचा फार अपमान झाला. पुढें **मेडिनाचे ड्युकानें झीलंडाचे** कांठावर जाऊन मसलत केली; आणि असा निश्चय केला कीं, सैन्याचें सामानसुमान संपत आलें, गलबतांचा फार नाश झाला, आणि **पार्माचा ड्युक** आपलें सैन्य स्वाधीन करीत नाहीं; या कारणास्तव **स्पेनास** निघून जावें; आणि वारा चांगला नाहीं ह्मणून **आर्क्नी** बेटाचे वाटेनें जावें. त्याप्रमाणें ते उत्तरेकडेस चालिले, त्यांच्या पाठीस **फ्लांबरोहेड** बंदरापर्यंत इंग्लिश लागले. तेथें त्या **स्पानियार्डांचे** गलबतांचा वादळामुळें फार नाश झाला. त्यांतून सत्रा गलबतें ज्यांवर सगळे मिळून पांच हजार लोक होते, तीं पश्चिमेकडचे बेटांवर आणि **अयर्लंडाचे** कांठावर जाऊन पडलीं. त्या सर्व गलबतांतून सगळीं त्रेपन्न गलबतें परत **स्पेन** देशास गेलीं; आणि त्यांचाही फार नाश झाला होता. त्यांतून जे परत तांडेल आणि शिपाई आले, त्यांनीं लढाईच्या गोष्टी सांगून, दुसरे लोकांचे मनास त्या कामाविषयीं अतिशय भय उत्पन्न केलें.

पुढें **इंग्लिशांनीं** जाऊन **स्पानियार्डांवर** हल्ला केला. त्या प्रसंगीं **एसेक्साचे अर्लानें** मोठा पराक्रम केला. तो गृहस्थ शूर, उदार आणि चतुर होता. तो शौर्यगुणेंकरून लढाईंत उच्चपदास योग्य असा असे; तसाच आपलें वक्तृत्व आणि युक्ति यांहींकरून दरबारचें काम चालवायाजोगाही होता. त्या वेळेस जीं नाटकें होत त्यांत तो **अर्ल** आणि **इलिझाबेथ** हीं दोघें सोबत्यांप्रमाणें एकत्र होऊन

वर्तत. तिचें वय साठ वर्षांचें होतें आणि त्याचें तिचे वयाचे अर्धेंही नव्हतें, तरी लोक सांगत कीं त्यास कांहीं चिंता नाहीं, आपण लहान असें मानिलें ह्मणजे झालें; आणि राणीही तसेंच मानीत असे. या रीतीनें राणीची त्या **अर्लावर** जेव्हां कृपा होती तेव्हां त्यास दरबारांत मोठी प्रतिष्ठा मिळायास काय अशक्य? तो सर्व कामें आपले इच्छेस येईल त्याप्रमाणें करीत असे. परंतु तो कसा तरी, तरणा आणि नवा होता त्यामुळें त्यास गर्व झाला, आणि वाटूं लागलें कीं मला लोक बरें ह्मणतात आणि प्रशंसा करितात हें माझे गुणांमुळें; राणीची कृपा आहे ह्मणून नव्हे. एके दिवशीं **अयर्लंडाचा गवर्नर** कोण नेमावा याविषयीं तो **अर्ल** आणि **बर्लीग** ह्मणून एक **लार्ड** या दोघांमध्यें राणीचे समक्ष वाद पडला; तेव्हां तो **अर्ल** इतका संतापला कीं, त्यास देह भान नाहींसें झालें. त्यानें राणीकडे पाठ केली, तें पाहून तिला फार राग आला, आणि तिनें त्याचे कानावर एक बुकी दिली. मग आपण कोण, करतों काय, राणीचा मान किती, या सर्व गोष्टी विसरून त्यानें लागलाच आपला हात तरवारी वर घातला; आणि शपथ केली कीं, असें तुझे बापानें केलें तरी मी सोसणार नाहीं. हें राणीनें मनास आणिलें नाहीं, आणि रागाचे थोडे दिवस गेल्यावर त्याला पूर्वीचे पदावर पुनः स्थापिलें. तशांत त्याचा प्रतिस्पर्धी **लार्ड बर्लीग** तोही मेला, ह्मणून त्याची सत्ता पुनः अप्रतिहत चालूं लागली. तेव्हां **अयर्लंडांतले** लोक केवळ **इंग्लिशांचे** ताबेखालीं आले नव्हते, ह्मणून पुनः पुनः ते शेजारचे सज्ञान लोकांवर हल्ला करून, आपला प्रताप दाखवीत. त्या लोकांस सरकारचे ताबेखालीं

आणावें हा उद्योग आपले लाभास अनुकूळ आहे, असें **एसेक्सास** वाटलें. त्याचे शत्रु जे होते त्यांसही तें वाईट वाटलें नाहीं. कारण तो तेथें होता तोंपर्यंत त्यांस वर येऊं देत नसे, ह्मणून कसा तरी तो एक वेळ दरबारांतून निघावा, अशी ते इच्छा करीत होते. शेवटीं त्या उद्योगानें त्याचा पूर्ण नाश झाला.

शत्रूंचें मुख्य राहायाचें ठिकाण **अल्स्तर**, तेथें जाऊन त्यानें हला करावा तें न करितां त्यानें आपलें सैन्य **मन्स्तर** प्रांतांत नेलें, तेथें उगीच आपलें बळ खर्च केलें; कारण, तो जातांच ते लोक शरण आले; आणि तो परत येऊं लागला तेव्हां मात्र पुनः त्यांनीं शस्त्र धारण केलें. आणि मग त्यांवर उपाय चालेनासा झाला. ज्या उद्योगापासून राणीनें फार आशा केली होती, तो या रीतीनें केला असें पाहून तिला वाईट वाटलें; आणि असें असतांही तो आग्रहानें वारंवार तिला आणि मंत्र्याला पत्रें लिही, ह्मणून तिला विशेष कोप आला. इतकें झालें असतांही आज्ञा न विचारितां, आणि कोणीं न दिली असतां तो स्वतः राणीजवळ बयाद सांगावयास परत आला, ह्मणून तिला फारच संताप आला.

**इलिझाबेथ** राणीस असा त्याचा फार राग आला होता खरा, परंतु तो दृष्टीस पडतांच दया आली; इतका हुकूम मात्र केला कीं, मी आज्ञा करीन तोंपर्यंत **एसेक्सास** त्याचेच घरीं कैदेंत ठेवावें जर कांहीं महिनेपर्यंत
इ० स० १६०० तो तसाच स्वस्थपणें असता तर त्यास पूर्वींचीं सर्व पदें प्राप्त झालीं असतीं. परंतु तो आपणावर जुलूम केला असें ह्मणत असे, त्याचा विचार करून राणी

त्यास मुक्त करणार होती, त्याची त्यानें वाट पाहिली नाहीं; असा त्याचा स्वभाव उतावीळ होता; आणि दुसरें असें झालें कीं, त्यानें पूर्वीं मक्ता करून घेतला होता, तो असा कीं, आपलेवांचून दुसरें कोणीं राज्यांत दारू आणून विकूं नये; तो मक्ता त्याजवळ फार दिवस चालिला होता, तो पुढें चालवावा ह्मणून त्यानें राणीजवळ विनंती केली, ती तिनें मान्य केली नाहीं, यामुळें त्यानें दुष्ट कर्में केलीं. फार दिवस लोक त्याची प्रशंसा करीत होते, त्यांवर भरंवसा ठेवून जे दरबारांत आपले शत्रु आहेत, त्यांचें पारिपत्य करावें असा त्यानें निश्चय केला; तें पारिपत्य राणी करणार नाहीं असें त्यास वाटलें होतें. **लंडन** शहरचे लोकांच्या धर्माविषयींचा बेत त्याचे मनास आवडला होता, ह्मणून त्यांवर त्याचा बहुत विश्वास होता. जे **प्युरिटन*** होते, त्यांस धर्म संस्थेचे बंदोबस्ताविषयीं अगत्य दाखवून तो संतुष्ट करीत असे; आणि जे मोठ्या पदावर होते त्यांचीं दुष्कर्में दाखवून दुष्टांचा संतोष करी. त्याचे आंधळे क्रोधाचा निश्चितार्थ शेवटीं हा ठरला कीं, त्याचा विश्वासू एक **सरक्रिष्टाफर ब्लौंट** ह्मणून होता, त्यानें सरकारचे वाड्याचे दरवाजे आपले स्वाधीन करावे, **सरजान डेविसानें** दिवाणखाना संभाळावा, आणि **एसेक्सानें** स्वतः आपले साथी घेऊन राणीजवळ जावें, आणि प्रार्थना करावी कीं, जे तुझे आणि माझे दरबारांत शत्रु आहेत ते काढून टाकून नवें **पार्लमेंट** करावें, आणि राज्य पुढें चांगलें चालवावें.

---

* प्युरिटन असें त्या वेळेस प्रातेस्तंटांस ह्मणत असत; कारण त्यांचे धर्म इतरांपेक्षां शुद्ध असत. आलीकडे हा शब्द निंदावाचक झाला आहे.

पुढें कोणत्या रीतीनें चालावें, याचा विचार **एसेक्स** करीत असतां, त्यास एक गुप्त पत्र आलें, त्यांत असें लिहिलें होतें कीं तूं आपले जीवाचें संरक्षण करायाविषयीं जपून राहा. तो प्रसंग भयंकर असें पाहून, **अर्ल** आपले मित्रांशीं मसलत करूं लागला; परंतु त्यांजवळ शस्त्रें नाहींत, सामानाचा तोटा, आणि तशांत, वाड्यांतले पाहाऱ्यावर पहिल्यापेक्षां दुप्पट मनुष्य आले; या कारणांमुळें तेथें हल्ला करायाचा कांहीं उपाय राहिला नाहीं. त्यांची मसलत होत असतां, शहरचे लोकांकडून **अर्लास** मदतगारीची सिद्धता आहे, असा कोणेएका पुरुषानें येऊन निरोप सांगितला. हा पुरुष बातमी समजायाकरितां बहुधा त्याचे शत्रूंनींच पाठविला असावा. तशा संकट समयांत शहरचे लोकांस उठविणें, हा बेत अतिशय अविचाराचा खरा, तथापि त्याचा निश्चय झाला; परंतु तो दुसरे दिवसापर्यंत तसाच तहकूब ठेविला.

दुसरे दिवशीं मोठे सकाळीं त्याचे स्नेही **रट्लंड** आणि **सौथंप्टन** एथील **अर्ल**, **लार्ड सांडीस्**, **पार्टीगर** आणि **मौंटीग्ल**, आणि दुसरे प्रतिष्ठित तीनशें गृहस्थ त्याचे कचेरीस जमले. मग कोणी परकी आंत येऊं नये, ह्मणून लागलींच वाड्याच्या दरवाज्यांस कुलपें घालून **अर्लानें** त्या सर्व बंडवाले लोकांस अकस्मात् उठवायाची आपली मसलत कळविली; तितक्यांत **सरवाल्टर रालीगानें** दुसरे एक **सरफर्डिनांडो गार्जिस्** या नांवाच्या बंडवाल्याजवळ निरोप सांगायाकरितां कोणी पुरुष पाठविला; त्याचें आणि **सरफर्डिनांडोचें टेम्स** नदीवर बोलणें झालें. तेव्हां त्या पुरुषास **एसेक्साचे** सर्व मसलतीची बातमी ला-

गली. मग **एसेक्साचे अर्लानें** पाहिलें कीं, आतां सगळी मसलत हातांतून जाये; ह्मणून घरांतून निघून अकस्मात् बंड करायाकरितां बाहेर चालिला. त्यास असें वाटलें कीं, लोक आपल्यास बरें ह्मणतात त्यापेक्षां संकटसमयीं ते उपयोगीं पडतील; परंतु तसें झालें नाहीं. तो तरवारवाले दोनशें लोक बरोबर घेऊन शहरांत जावयास निघाल्यावर, वाटेनें त्यास **बेड्फोर्डाचा अर्ल** आणि **लार्ड क्राम्वेल** हे येऊन मिळाले. तो रस्त्यानें मोठ्यानें बोलूं लागला कीं, माझा जीव घ्यावयाची मसलत आरंभिली आहे. त्यास वाटलें कीं हें ऐकून लोक जमा होतील, परंतु त्यांस **मेयरानें** हुकूम केला होता कीं, कोणी घरांतून बाहेर येऊं नये. ह्मणून त्यास कोणी एकही पुरुष येऊन मिळाला नाहीं. पुढें त्याचे बरोबर होते तेही चोरून निघून गेले, शेवटीं थोड्या लोकांनिशीं तो नदीजवळ आला, आणि एके होडींत बसून **एसेक्स** वाड्यांत येऊन पोहोंचला. मग तो आपले संरक्षणाचा उपाय योजूं लागला. परंतु शौर्येंकरून कांहीं उपाय चालून त्याचें संकट दूर होईल असें नव्हतें, ह्मणून तो, ज्यांनीं वेढा घातला होता त्यांशीं बोलणें लावून ओलीस मनुष्यें मागूं लागला; तें ते कांहींच कबूल करीनात; शेवटीं त्यानें प्रार्थना केली कीं, माझे फार हाल करूं नका, आणि सर्व मजकूर नीट समजून घ्या; अशी विनंती करून तो वेढा घालणारांचे स्वाधीन झाला.

पुढें **एसेक्स** आणि **सौथंप्तन** यांस, **लांबेथ** ह्मणून **लंडन** शहरच्या एके प्रदेशीं **आर्चबिशप** राहात होता, तेथें दुसरे दिवशीं पाठविलें. मग **फेब्रुआरी** महिन्याचे एकोणिसावे तारिखेस सभासदांनीं त्यांची चौकशी

केली. त्यांनीं ठराव काय केला असेल हें ध्यानांत येतें; कारण त्यांचा अन्याय उघड होता ह्मणून क्षमा व्हावयाची शंकाच राहिली नाहीं. **एसेक्साचें** शासन ठरविल्यावर त्यास धर्मसंबंधी भय उत्पन्न झालें, जें पूर्वी त्याचे मनांत नेहमीं असे. तें असें, धर्मपक्षी येऊन त्यानें त्यास बोध केला, तेणेंकरून भय पावून तो आपलें सर्व बंड कबूल झाला. अशी गोष्ट सांगतात कीं, त्याचे शिरच्छेद पत्रावर सही करायाचे वेळेस राणीनें थोडासा अनमान केला, त्यावरून **एसेक्सास** आशा होती कीं, आपणास क्षमा प्राप्त होईल. दुसरें, तिनें पूर्वी त्याला एक आंगठी दिली होती, आणि सांगितलें होतें कीं तुला कसें जरी संकट प्राप्त झालें, तरी हीं माझेजवळ पाठवून दिलीस ह्मणजे त्याचें निवारण होईल. ती आंगठी त्यानें **नाटिंगमचे कौंटेसे** बरोबर राणीला द्यावयाकरितां पाठवून दिली, परंतु ती **कौंटेस अर्लाचा** आंतून द्वेष करीत होती, ह्मणून तिनें ती तशीच मध्यें दाबून ठेविली. इकडे राणीला राग आला कीं, **अर्ल** इतक्या विपत्तींत पडला असतांही क्षमा मागत नाहीं. वास्तवीक पाहातां ती ज्या **अर्लाचे** शासन करीत होती, तो जितक्या संकटांत होता, तिककेंच संकट तिलाही होतें. तें असें, तिनें एकवेळ शिरच्छेद पत्रावर सही केली, पुढें तें फिरविलें; पुनः त्याचा वध करायाचा निश्चय केला, आणि पुनः तिला दया आली. शेवटीं तिनें त्याचे शिरच्छेदाविषयीं संमति दिली; तेव्हांपासून तिला एकही सुखाचा दिवस आला नाहीं.

या रीतीनें राणीचा स्नेही मरण पावतांच तिचीं सर्व सुखें लयास गेलीं, असें दिसून आलें. मग अभ्यास पड-

ला होता ह्मणून ती राज्यकारभार मात्र चालवी; परंतु कोणत्या गोष्टींत सुख राहिलें नाहीं. तिला जें दुःख झालें त्येणेंकरून तिच्या शरिरीं अशक्तता येत चालिली; आणि तिचा अंतकाळ जवळ आला असें स्पष्ट दिसूं लागलें. पुढें लवकरच तिची वाचा बंद झाली, आणि कांहीं घटकापर्यंत किंचित् निद्रा येऊन ती एकवेळही न ओरडतां मरण पावली. त्या वेळेस तिचे वयास सत्तरावें वर्ष होतें. आणि तिनें पंचेताळीस वर्षें राज्य केलें. प्रसंगानुरूप **इलिझाबेथ** राणीचे स्वभावांतही अंतर पडलें. तें असें, ती राज्य करूं लागली तेव्हां तिचा स्वभाव नम्र आणि यथायोग्य होता; परंतु शेवटीं आग्रही आणि क्रूर असा झाला. तिचेमध्यें फार चातुर्य होतें; परंतु आपल्या शरिरांत सौंदर्य नाहीं हें तिला कळत नसे; आणि पांसष्ट वर्षांची होती त्या वेळेसही कोणी तिचे सुंदरपणाची प्रशंसा केली तर ती त्यावर प्रसन्न होई.

**इलिझाबेथ** राणीमध्यें काय दोष असतील ते असोत; परंतु **इंग्लिशांनीं** सर्वदा तिचें स्मरण करून स्तुतीच करावी. तिनें **पार्लमेंटांत** आपला मोठा अंमल चालविला होता, ह्मणून **पार्लमेंटाचे** सभेंत असें ह्मणत कीं, राज्यनियमाचे बाहेर राणी चालते; तिच्या मर्जीस वाटेल त्याप्रमाणें नियम करायास ती समर्थ आहे; अशी मोठी सत्ता ती इच्छीत असे खरी, परंतु ती कोठें भलते ठिकाणीं करीत नसे. हेंही खरें कीं, तिच्या राज्यांत दुसरें कोठचें मोठें राज्य साध्य झालें नाहीं; परंतु दिवसानुदिवस व्यापाराची वृद्धि होत चालली, आणि लोकांस कळूं लागलें कीं, पुढें वास्तवीक युद्ध आणि विजय यांचें स्थळ

समुद्रपृष्ठ होणार. त्या काळपर्यंत ज्या देशावर जो पाहिजे तो हला करून लुटीत असे, तो देश सावरून जे पूर्वीं हला करीत होते, त्यांसच भयानक होत चालिला. **पोर्टुगीस** आणि **स्पानियर्ड** लोक समुद्रांतून दूर देशास जाऊन बहुत द्रव्य मिळवूं लागले, तें पाहून **इंग्लिशांसही** ईर्षा आली, आणि ते हिंदुस्थानास जावयास जवळची वाट शोधून काढायाकरितां नाना प्रकारचे उपाय करिते झाले. **सरवाल्टर रालिग** ह्मणून जो प्रसिद्ध गृहस्थ पूर्वीं सांगितला, त्यानें सरकारच्या मदतगारीवांचून **अमेरिका** देशाचा **न्युइंग्लंड** ह्मणून एक प्रांत आहे, तेथें वस्ती केली. तसाच आंतले आंत व्यापारही बहुत चालिला होता. दुसरें असें झालें कीं, कितीएक **डच** लोक आपले देशांत उपद्रव झाल्यामुळें **इंग्लंडांत** येऊन राहिले, त्यांबरोबर कळा कौशल्यें बहुत आलीं. त्या वेळेस असें झालें कीं, सर्व बेट एकदाच अज्ञान निद्रेंतून जागें झालें काय ? उत्तरोत्तर कळा कौशल्यें, व्यापार, आणि राज्य नीति दृढ होत चालिलीं. **इलिझाबेथ** राणीचे राज्यांत प्रथम विद्या वृद्धिंगत होऊं लागल्या. **सरवाल्टर रालिग** आणि **हूकर** ह्मणून दोन विद्वान होते, त्यांनीं भाषा सुरूपतेस आणायाविषयीं उद्योग केला; **स्पेन्सर** आणि **शेक्सपीयर** या नांवांचे दोन कवि होऊन गेले, त्यांस तर एथें स्तुति केल्यानेंच केवळ विशेष शोभा येईल असें नाहीं. हे सर्व असोत; परंतु या राणीचे राज्यांत **लार्ड विरुलमाचे** पदाचा अधिकारी **फ्रान्सिस बकेन** ह्मणून जो वस्तुविवेचक होऊन गेला, त्याची किती स्तुति केली तरी थोडीच. त्याची लिहिण्याची पद्धति सरळ, आणि शुद्ध; त्याचें चातुर्य, विद्या,

आणि सूक्ष्म दृष्टि, हींही तशींच होतीं. जर सर्व इतिहास पाहून राज्यें कशीं कशीं वृद्धि पावलीं आहेत हें पाहिलें तर, जसे **इंग्लिश** लोक या राणीचे राज्यांत थोडके काळांत चतुर, पराक्रमी, आणि सुखी झाले, असें दुसरें एकही उदाहरण सांपडणार नाहीं. हें खरें की, या राणीचे राज्यांत स्वतंत्रता स्थिर झाली नाहीं, आणि राणीनें आपली सत्ता अतिशय वाढवून स्वेच्छेनें व्यवहार केला: परंतु जेव्हां व्यापाराची लोकांत प्रवृत्ति झाली, तेव्हां सहज स्वतंत्रता झालीच; कारण, ज्या लोकांत चांगला व्यापार चालिला, ते राजाचे सेवकभावांत फार दिवस वागले ही गोष्ट कधीं झाली नाहीं.

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १७ | १७ | प्रक्ररण | प्रकरण |
| ३५ | १३ | मजवून | जमवून |
| ४९ | टिपेंत | पुण्यक्षत्रे | पुण्यक्षेत्र |
| ७३ | १५ | आज्ञेस | आज्ञेनें |
| ,, | १६ | राजानें | राजास |
| ७५ | ४ | हेरनी | हेन्री |
| ८७ | २६ | किमाप | किर्माप |
| ११७ | १८ | करायाचा | करायाचा |
| १६० | १४ | राजाचें मुलांचे | राजाचे मुलांचें |
| १६७ | १९ | नग | मग |
| १६९ | २४ | बातनी | बातमी |
| १७३ | १७ | टांटन | टांकून |
| १७६ | १० | दिवजास | दिवसास |
| २०८ | २२ | हिसं | दिसं |